


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली

लंडन
विशेषांक
मूल्य २॥ रु.

जानेवरि १९७१



अनुक्रमणिका



हा विशेषांक लंडनवासीय लेखक-मित्रांच्या इच्छेनुसार हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेला अर्पण करीत आहो.

# दीपावली

## लंडन विशेषांक

जानेवारी ७१ • वर्ष २६ • मूल्य २॥ रु.

### श्रे य ना मा व ळी



टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**



संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २॥ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay–4.










अनुक्रमणिका



# चार शब्द तिघांचे!

केल्याने होत आहे रे–आधी केलेचि पाहिजे.....समर्थ रामदासांची उक्ती मनात घोळवत दहा जून सत्तरपासून सुरू झालेली धावपळ. यापूर्वी दोनदा इतरांचा 'लंडन विशेषांका'-विषयीचा फसलेला प्रयत्न, आपण यावेळी यशस्वी करावयाचा हा सुरुवातीपासूनचा बांधलेला चंग—! मग त्याकरता दूरध्वनीशी केलेली अलोट सलगी, पत्रलेखनाचा व्याप.... प्रत्यक्ष भेटीकरता झिजवलेल्या वहाणा.... स्वतःचे मानापमान गुंडाळून ठेवून चेहऱ्यावर धारण केलेला कोडगेपणाचा बुरखा–एक ना अनेक! त्यानिमित्ताने कितीतरी अज्ञात व्यक्ती संपर्कात आल्या. नवीन मैत्रीची नाती–नवीन पत्ते केवळ एका दुव्याने सांधले गेले.

विविध परिपत्रके.... बऱ्याचशा योजना.... कित्येकांशी चर्चा–सभा आणि अनेकांकडून घेतलेले उपदेशाचे डोसही. या सर्व अनुभवांच्या मंथनातून हा "लंडन–विशेषांक" आपणापुढे सादर करताना आनंद का होणार नाही?

विषयांच्या व्यापकतेबद्दल म्हणाल तर या अंकातील उणीवांची आम्हास जाणीव आहे. राजकारणाव्यतिरिक्त अंकात अंतर्भूत करण्यासारखे अनेक विषय केवळ त्या त्या विषयातील अधिकारी व्यक्तींना एक तर मराठी लेखनाचा सराव नसल्याने किंवा वेळेचा अभाव असल्याने इच्छा असूनही राहून गेले. या अंकातील अनेक लेख त्या त्या लेखकांशी चर्चा करून, त्यांच्या ज्ञानाचा लाभ घेऊन लिहून काढावे लागले–काही मुद्दाम लिहवून घ्यावे लागले.

नाही म्हटले तरी भारतात बहुजनसमाजामध्ये अजूनही या गोऱ्यांच्या देशाविषयी कुतुहल आहेच आहे. लोकांमध्ये इथल्या जीवनाविषयी, आधुनिक विश्वासंबंधी अनेक भ्रामक कल्पना आहेत. तेव्हा येथील वस्तुस्थितीचे दर्शन घडविणे हाच तर ह्या अंकाचा हेतू. त्या दृष्टीने जेवढे करता आले तेवढे विषय वेगवेगळ्या स्वरूपात या अंकात समाविष्ट करण्याचा आम्ही प्रयत्न केला.

नुसते लंडनच नव्हे, तर मँचेस्टर, बर्मिंगहॅम, ऑक्सफर्ड केंब्रिजपासून ते थेट एडिंबरोपर्यंत वेगवेगळ्या ठिकाणी पसरलेल्या शक्य तितक्या मराठी लोकांशी संपर्क साधला. परिणामी अंकाचे साहित्य इतके जमले–इतके जमले की श्री. दीनानाथ दलालांची पृष्ठमर्यादेची अट शिथील करण्यासाठी एकदा नाकारलेली जाहिरातींची जबाबदारी पुनश्च स्वीकारून कोडगेपणाचा बुरखा आणखी एकदा चढवला आणि लंडनच्या ट्यूब्जमधून, बसेसमधून आणि टॅक्सीतूनसुद्धा वेळीअवेळी हिंडू लागलो–मनात–विशेषांकाचे स्वप्न घोळवत.

प्रयत्नांचा पाया बळकट झाल्यावर मदतीकरता चोहोकडून हात सरसावले. त्या सर्वांचे ऋण अमान्य करून कसे चालेल?

'इंडिया हाऊस'चे श्री. अरविंद देव व बँक ऑफ बरोडाचे श्री. पोतनीस व ब्रिटिश म्युझिअमचे श्री. व्यंकटेश कुलकर्णी–आमच्या पायपिटीने न झालेली कामे ह्यांच्या केवळ शब्दाने झाली. डॉ. द. वि. ताम्हनकर आणि ब्रिटनमधील 'केसरी'चे प्रतिनिधी श्री. प. ग. पेंडसे यांनी वेळोवेळी मार्गदर्शन केले. सर्वश्री बाळ आठल्ये, गोविन्द निपाणे, सूर्यकान्त वाईकर व यशवंत माळी या आमच्या मित्रवर्गाने सजावटीची बाजू यथाशक्ती सावरावयाचा प्रयत्न केला.

लेखक–लेखिकांनी तर अंकाचे सर्वच श्रेय घेतले.

जाहिरातदारांच्या आर्थिक सहकार्याने या अंकाची पृष्ठसंख्या वाढली.

या सर्वांच्या ऋणातून केवळ आभाराच्या शब्दाने मुक्त होण्यापेक्षा ते तसेच राहू देणे यातच खरे समाधान!

कुठल्याही कार्याला थोरामोठ्यांचा आशीर्वाद असल्याशिवाय यश नाही. भाग्य आमचे की ब्रिटनमधील भारताचे सध्याचे राजदूतही मराठी लाभले. पद्मश्री आप्पासाहेब व सौ. नलिनीबाई पन्त यांच्या आशीर्वादाचे पाठबळ होते म्हणूनच इथवर मजल!!

एक विसरता येणार नाही....

सरतेशेवटी वाचकांच्या पुढे आमच्या मेहनतीचे फळ येत आहे ते श्री. दीनानाथ दलाल यांच्यामुळेच....

आभाराच्या शब्दाने कोणाच्याच ऋणातून मुक्त झालो नाही–मग त्यांच्या तरी कशाला!!!

आणखी एक विशेष.... सर्व लेखक–लेखिकांनी स्वतःला मिळणारी मानधनाची रक्कम एकमताने 'हिंगणे स्त्री शिक्षण संस्थे'स देण्याच्या आमच्या कल्पनेचं सहर्ष स्वागत केलं..... म्हणूनच ही सर्व रक्कम 'हिंगणे स्त्री शिक्षण संस्थे'स अर्पण करताना आम्हाला आनंदाबरोबरच एक अपूर्व समाधानही होत आहे.

दहा जूनपासूनची पळापळ आता संपली आहे. लंडनवर पांढऱ्या शुभ्र बर्फाचे आवरण पडले आहे. लोक आपापल्या घरात दारं खिडक्या बंद करून टेलिव्हिजनच्या सांगाती बसले आहेत. आमच्यापुरतं शेवटचं उरलेलं काम एकच–

फाटलेले जोडे सांधून घेणं!

**दिलीप वि. चित्रे**
**माधव जोशी**
**मुकुंद सोनपाटकी**







## दोन शब्द संपादकाचे

'दीपावली'चा हा 'लंडन विशेषांक' वाचकांच्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद आणि अभिमान वाटत आहे. आनंद अशासाठी की गेल्या तीन वर्षापूर्वी लंडन विशेषांकासाठी झालेले प्रयत्न अनेक अडचणींमुळे त्यावेळी सोडून द्यावे लागले होते तरी आता ते यशस्वी ठरले आहेत आणि अभिमान अशासाठी की दरवर्षी काहीतरी नवीन कामगिरी बजावण्याची 'दीपावली'ची परंपरा या अंकाने कायम राखली आहे.

सुमारे तीन वर्षापूर्वी आमचे मित्र श्री. माधव जोशी यांनी 'लंडन विशेषांक' काढण्यासाठी सुचविले होते आणि आम्हालाही ती कल्पना पसंत पडली होती; पण त्यावेळी अशा काही अपरिहार्य अडचणी उद्भवल्या की ती कल्पना सोडून देऊन 'आरंभ शूरत्वा'चा दोष पदरी येतो की काय अशी त्यांना भीती निर्माण झाली होती; तथापि श्री. जोशी यांनी आपले प्रयत्न नेटाने चालूच ठेवले आणि त्यांचे मित्र श्री. दिलीप वि. चित्रे आणि श्री. मुकुंद सोनपाटकी यांचे भरीव साहाय्य त्यांना लाभले. त्यांच्या आणि त्यांच्या इंग्लंडवासी मित्रांच्या अविरत श्रमांचे फळ म्हणजेच हा 'लंडन विशेषांक' होय!

वास्तविक हा 'लंडन विशेषांक' दीपावलीचा फेब्रुवारीचा अंक म्हणून दि. २६ जानेवारीला प्रसिद्ध करण्याचे आम्ही योजिले होते; पण आमच्या लंडननिवासी मित्रांनी हा अंक जानेवारी अंक म्हणून प्रसिद्ध होणार असल्याचे लंडनमध्ये आधीच जाहीर केल्यामुळे पूर्वीची योजना बदलून हा अंक जानेवारीचा अंक म्हणूनच प्रसिद्ध करीत आहो. त्यामुळे डिसेंबरच्या अंकात 'जानेवारीत प्रसिद्ध होईल' असे आश्वासन दिलेले साहित्य पुढील म्हणजे फेब्रुवारी अंकात प्रसिद्ध होत आहे.

'लंडन विशेषांकाची तयारी सर्वश्री माधव जोशी, दिलीप वि. चित्रे आणि मुकुंद सोनपाटकी यांनी लंडनमध्येच केली आणि मुखपृष्ठापासून मलपृष्ठापर्यंतचे बहुतेक सर्व साहित्य व चित्रे लंडनवासीयांकडूनच मिळविली. ते साहित्य किती उत्कृष्ट आणि दर्जेदार आहे याचा प्रत्यय हा अंक वाचूनच येईल. सर्वश्री जोशी, चित्रे आणि सोनपाटकी यांचे आणि त्यांच्या सर्व सहकाऱ्यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत.

या 'लंडन विशेषांका'त इतर काही मजकूर द्यावयाचा नाही असे प्रथम ठरविले होते; पण 'धि गोवा हिंदू असोसिएशन' या थोर सामाजिक संस्थेचा सुवर्ण-महोत्सव नुकताच थाटाने साजरा झाला. त्या संस्थेच्या गौरवशाली कार्यासंबंधी आमच्या वाचकांना आत्ताच माहिती देणे उचित असल्याने श्री. सी. ग. मणेरकर आणि श्री. आदित्य यांचे खास लेख याच अंकात समाविष्ट केले आहेत.

या विशेषांकाचे संयोजक आणि लेखक यांच्या इच्छेप्रमाणे या विशेषांकातील लेखनाबद्दलचे मानधन हिंगणे येथील स्त्री शिक्षण संस्थेला अर्पण करण्यास आम्हांला आनंदच वाटत आहे.

'दीपावली' नेहमी काहीतरी नवीन करीत असते, पण केवळ 'नवीन' हे उद्दिष्ट नसून ते 'भरीव'ही असले पाहिजे यावर आमचा भर असतो हेही या विशेषांकावरून दिसून येईलच.

—संपादक

### महागाईचा कडेलोट झाला....

असे उद्‌गार सर्वत्र ऐकू येतात. 'दीपावली'लाही वाढत्या महागाईची झळ लागू लागली आहे. त्यामुळे केवळ नाइलाजाने वार्षिक वर्गणीत वाढ करणे भाग पडत आहे. मार्च १९७१ च्या वर्षारंभ विनोद अंकापासून 'दीपावली'ची वार्षिक वर्गणी रु. १८ – (दोन वर्षाची एकत्र रु. ३० – व तीन वर्षाची एकत्र रु. ४० –) करण्यात येत आहे. तथापि फेब्रुवारी १९७१ पर्यंत वार्षिक वर्गणी पाठविणारांना रु. १५ – वर्गणीतच अंक पाठविण्याची सवलत देत आहो.

**जुन्या वर्गणीदारांनी खंड न पाडता वर्गणी पाठविली तर त्यांचे वर्गणीचे जुने दरच कायम राहतील.**

**किरकोळ अंकाच्या किंमतीतही वाढ होणार आहे**





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रिज, मुंबई

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑर्डरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.









# इतिहास घडवितो व्यक्ती



**उद्या जर आम्ही इंग्लंडवरील चित्रणात फक्त सोहो-स्क्वेअरमधील व्यभिचारी जग, पिकॅडलीवरील हिप्पी किंवा ईस्ट लंडनमधील स्लम्स इतकेच दाखविले तर ते ब्रिटनचे यथार्थ चित्रण होईल का!...**

ती अनामिक हुरहूर. झपाझप पडणारी आमची पावले. नॉटिंगहिल विभागातला तो ऐश्वर्यशाली गजबजलेला रस्ता. गति वाढली. एका मोठ्या माणसाची नियुक्त भेट. एकेकाळचा राजपुत्र. आताचा राजदूत. दोन भिन्न गावी भिन्न प्रकारचे जीवन. त्यावेळची ती नगरी.. ..तो महान राजा.... ते ऐश्वर्य.... अन् ती सत्ता! सगळंच काळाच्या उदरात गुप्त झालंय्. आता फक्त जबाबदारी व कर्तव्यनिष्ठा. एका मोठ्या राष्ट्राचं दौत्य करायचंय् आणि तेही एके काळी असलेल्या राजाने. केन्सिंग्टन पॅलेस गार्डन्स नावाच्या भव्य-शांत रस्त्यावरील नऊ क्रमांकाच्या आलिशान घराची बेल दाबली आणि आता आप्पासाहेब कसे भेटतील याविषयी मनात तर्क केले.

*　　　*

अमुक एका स्थितीपलीकडे पोहचलेला मनुष्य कसा असतो? तसे भरपूर पाहीले. सर्वसंगपरित्यागी. भगवी वस्त्रे नेसून जिभेवर तत्वज्ञानाची भाषा घोळवणारे. स्वत्वाची जाणीव अनंतात विलीन केलेले. मीपणा हरवून बसलेले. एक ना अनेक. पण आज पाहात होतो ते आप्पासाहेब वेगळेच होते. वस्त्रे काषाय नव्हती, जिभेवर तत्वज्ञानाची भाषा होती. सर्वसंगपरित्याग नसूनही ऐहिक मर्यादेच्या पलीकडे गेलेले. ते सांगत होते, आम्ही ऐकत होतो.

"स्वतःच्या अज्ञानाचे ज्ञान प्रत्येकाला असायलाच पाहिजे. त्यातूनच व्यक्तीचा विकास होतो. नाहीतरी विकास म्हणजे काय? माझ्या दृष्टीने सत्यशोधन हाच विकास. सत्ता वाढविणे, भौतिक सुखाचे प्याले अधिकाधिक भरणे म्हणजे व्यक्तीचा विकास असं सकृतदर्शनी म्हटलं जातं. माझ्या दृष्टीनं ते सव झूट आहे. मनाची शान्ति व अनुभवाचा आनंद हीच यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली आहे. एकतेशी तादात्म्य होता आलं पाहिजे. समाज-कार्यासाठी अहंभाव नष्ट झाला पाहिजे. असा छंद वाढविला पाहिजे की माणूस त्याने झपाटला जाऊन कौशल्याच्या परिसीमा ओलांडल्या जातील!" हे खरे आप्पासाहेब.

"नुसतं कौशल्य असून उपयोगी नाही.." आजुबाजूला कांचेच्या कपाटात निरनिराळ्या देशांतील सुबक वस्तू मांडून ठेवलेल्या होत्या. सिक्कीम, भूतान, इजिप्त, इंडोनेशिया अन् नॉर्वे. आणि त्या छंदाची स्वामिनी सांगत होती, "नुसतं कौशल्य असून उपयोगी नाही. उत्तम चित्रकार, गायक, वादक यांना त्यांच्या कृतींतून आत्मज्ञान मिळाले पाहिजे व त्यातूनच पूर्ण तादात्म्य मिळते!!" टेबलावर अंथरलेले व्याघ्रजिन व त्यावरील औंध संस्थानी शस्त्रे या विरागी वृत्तीशी कर्तृत्वाची सांगड घालताना नलीनीबाईंचा छंदसुद्धा असा चपखल मिसळून जात होता! तशा नलीनीबाईच छंदाची जोपासना अधिक करतात. आप्पासाहेबांना त्यांच्या कार्यबाहुल्यामुळे वेळ अपुरा पडतो.

**दिलीप वि. चित्रे**
**मुकुंद सोनपाटकी**
**लंडन**

नलीनीबाई कथाकादंबऱ्या वाचतील. मग त्यातील निवडक भाग आप्पासाहेबांकडे सुपूर्द होईल. नलीनीबाई केसरी नियमित वाचतात. अगदी परवा परवा प्रसिद्ध झालेली रणजीत देसायांची 'श्रीमान योगी'ही त्यांनी वाचली आहे. आप्पासाहेबांच्या वाचनाचा ओढा बालवाङमय नाही तर अध्यात्मिक ग्रंथ. दोघांनाही लिहिण्यासंबंधी आता उत्साह नाही; केवळ अनेक व्यापांमुळे. आप्पासाहेबांना मात्र हॉबीज्विषयी विचारलं की ते छंदाची व्याख्याच सांगतील. कारण स्वतःविषयी फारसं बोलायचं नाही हा स्वभावधर्म आहे ना! त्यांच्या फोटोग्राफीविषयी विचारा त्यांना, उत्तर तयार. "अहो बाबांजवळ सदतीस कॅमेरे होते. ते १९२२ साली Coloured Photography करीत. फ्रान्समधून तऱ्हेतऱ्हेची उपकरणे आणवून. बाबा काय करीत नसत? ते प्रिंटिंग करीत, ब्लॉक-मेकींग चाले त्यांचे. चित्रकला त्यांच्या अंगी मुरलेली. नमस्काराचे व्रत तर त्यांनी अवघ्या संस्थानास घ्यायला लावले." अरे हे तर श्रीमंत बाळासाहेबांच्या छंदांविषयी सांगणे झाले. मग सौ. नलीनीबाई मदतीला पुढे. "इथे आल्यापासून ह्यांना टेनिस खेळायला कुठे वेळ मिळतो? पूर्वी ग्लायडिंग करायचे, गिर्यारोहण चालायचे. समुद्रकिनाऱ्यावर तासन्तास भटकणे हा तर ह्यांचा आवडता क्रम होता. नाही म्हणायला पूर्वीपासून चालत आलेली फोटोग्राफी तेवढी अजून कायम आहे, स्टिल आणि मुव्हीसुद्धा! पण खरं सांगू का, आता मुख्य छंद उरलाय् दुसऱ्यांनी केलेले प्रयोग बघण्याचा." मग आठवलं











अनुक्रमणिका



**श्री. आप्पासाहेब आले अन् कलाकारांचा सन्मान होऊ लागला—**
(डावीकडून) **सौ. नलिनीबाई पंत, श्री. सुधीर फडके, श्री. आप्पासाहेब पंत व सौ ललिता फडके**

'इंडिया हाऊस'मधील परिवर्तन. आप्पासाहेब आले आणि वेगवेगळ्या चित्रकारांची प्रदर्शनं भरायला लागली तिथं. भारतीय गायक-वादकांचे कार्यक्रम योजले जाऊ लागले. पूर्वसंस्कारांच्या वाटचांतून समाजाकरता जगण्याचे मिळालेले बाळकडू अशा रीतीने साकार झालेले !

"कां हो तुम्ही सोमवार करता ना ?" छोटामोठा भेद पंढरीला नष्ट होतो त्या दृष्टीने हा प्रश्न बरा. कुठे तरी साधर्म्य सापडायचं. प्रश्न नलीनीबाईंना. उत्साहानं उत्तर मात्र आप्पासाहेब देणार.

"हो त्या करतात सोमवार—शनिवार. मी मंगळवार करतो. नवरात्राचे नऊ दिवस एकभुक्त राहतो. कारण एकच. इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते। हे जे आपले शरीर आहे ना ते एक Experimental Laboratory आहे. मन व शरीर यावर प्रयोग करीत करीत सत्याचा अनुभव घ्यायचा. सत्यतत्वे शोधणे हाच खरा धर्म. मग त्याकरता मी रोज पहाटे चारला उठून गीता वाचतो, बुद्ध धर्माचा अभ्यास करतो. सत्यशोधनात बायबल अन् कुराणही अभ्यासतो. अहो टाळ वाजविणे, मूर्तिपूजा करणे म्हणजे धर्म नव्हे."

"पण मग हा धर्माचा विशाल अर्थ तुम्ही टाळ वाजविणाऱ्या लोकांच्या धर्मसम्मेलनाला जाता तेव्हा सांगता ?" रोख आजीबाईंच्या देवळावर ठेवून !

"हो सांगतो ना. पण त्याचं असं आहे, एकदम सांगितलं तर माणसं तुटतात. त्यांच्या कलानं घ्यावं लागतं. हायकमिशनरला बहुरूपी व्हावं लागतं म्हणत होतो ना ते असं ! अहो धर्म ह्या नावाखाली केवढा प्रचंड पैशाचा चुराडा चालवलाय् ह्या लोकांनी. परवा कोण ते साधू आले होते; त्यांना म्हणे स्त्रिया पाहायच्या नसतात. आमच्या संभाषणात मी सांगितले, हाच पैसा समाजाकरता लावा म्हणून. भारतीय लोकांकरता लंडनमध्ये होस्टेल बांधा. 'इंडिया सेंटर' उभं करा. तो धर्म होईल. आता मी आपलं सांगून बघतो. बाबांची शिकवण आहे ना पाठीशी. माझ्या लहानपणी औंधला शिवजयन्ती आणि आजोबांच्या पुण्यतिथीला बाबा निरनिराळ्या पंडितांना बोलावित. ज्ञानसत्र चाले मग बरेच दिवस. ती व्याख्यानं, त्या बैठका, ते परिसंवाद. त्यात पूर्वसुकृताची शिकवण—

ईशावास्यमिदं सर्वं यत्किंचजगत्या जगत् ।
तेन त्यक्तेन भुन्जीथा मा गृध कस्यस्विद्धनम् ॥

बाबा सांगायचे ते आठवतंय् अजून. इंग्लंडला जाऊन बॅरिस्टरी घेऊन आलास. आता कर्तव्याचे पालन हेच मुख्य काम. त्याची वंचना करू नकोस. मात्र एक लक्षात ठेव. हे जे आहे ते सर्व समाजाचं आहे, जे करायचं तेही समाजाकरता. तू समाजाचा आहेस. समाज पुरुषाची पूजा बांध. तो खरा धर्म. जो समाजाकडून घेतो व समाजाला देत नाही तो चोर—





अनुक्रमणिका

–तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ।

असा प्रचंड वडलोपार्जित वारसा. सांस्कृतिक, अध्यात्मिक व सामाजिक. त्यात भर घातली म. गांधींनी. नलीनीबाई कौतुकानं सांगू लागल्या. त्यांनी सर्व पाह्यलं होतं, ऐकलं होतं. "महात्माजी म्हणायचे, राजा व प्रजा हे भेद आता संपले आहेत. तुझ्या संस्थानातल्या गरीब माणसाप्रमाणे तुला राह्यले पाहिजे. गांधीनी मांगितलं अन् तेव्हापासून हे महिना पन्नास रुपयांवर राहात होते. पूर्ण दहा वर्षे. खादीशिवाय दुसरं काही वापरलं नाही ह्यांनी." कदाचित् म. गांधींचा आपल्यावरील प्रभाव आप्पासाहेबांनी सांगितला नसता. नलीनीबाईमुळे एवढे तरी कळले. मग म. गांधींनी स्वतंत्र लोकसत्ताक औंध-संस्थानची राज्यघटना कशी लिहिली, १९३९ मध्ये म्हणजे भारत स्वतंत्र होण्यापूर्वीच औंध संस्थान आप्पासाहेबांनी वडिलांच्या सल्ल्याने आपल्या प्रजेच्या हाती कसे दिले ह्या सर्वांविषयीचे किस्से सांगणार नलीनीबाईच. म. गांधींनी आप्पासाहेबांना मारून टाकलेच–एका राज्यावर तिलांजली देणे ही तर किस झाडकी पत्ती. त्यापुढची अवस्था गाठायला हवी. अहिंसा ! कुठलीही जगातली समस्या केवळ अहिंसेनेच सुटेल. आपल्यात अहिंसा पेलण्याची ताकद नाही. म्हणूनच आजचे विस्कळीत संघर्षित जीवन आपल्याला दिसते. संघर्ष सुरू होण्यापूर्वीच; मग ते संघर्ष जातीयवादाचे असोत, वर्णभेद, राष्ट्रभेदाचे असोत; त्यावेळीच अहिंसक मार्गे खटपट केली तर काय वहार उडेल?–बाबांनी औंध संस्थानच्या सेवेची संधी दिली तर म. गांधींनी अवघा हिंदुस्थान सेवेकरता दिला.

स्वातंत्र्यानंतर पंख फुटले त्या कर्तृत्वाला. स्वतंत्र भारताचा संदेश घेऊन हा राजदूत निरनिराळ्या देशी गेला. म. गांधींची व वडिलांची शिकवण घेऊन. तू प्रजेचा आहेस. समाजाची उन्नती कर आणि अशी सेवा करता करता साम्राज्यपिपासू ब्रिटिश राज्यशासनाची त्यांच्यावर इतराजी होणारच.

"आफ्रिकी स्वातंत्र्याकरता तुम्ही खूप प्रयत्न केले म्हणतात....."

"त्याचं असं आहे. नेहमी इतिहासाच्या केंद्रस्थानी व्यक्ती गोवली जाते आणि मग खुळा समाज म्हणतो, व्यक्तीने इतिहास घडविला. अहो व्यक्ती कधीच इतिहास घडवीत नाही. इतिहास व्यक्तीला बनवीत असतो. नदीच्या ओघवती प्रवाहात झाडाचे पान चाललेले असते; पण मग आपण म्हणतो का की पान पाण्याला वाहवून नेत आहे? भारतीय स्वातंत्र्यानंतर स्वतंत्रदेवतेचा सूर्य आफ्रिकेत उगवणारच होता. आफ्रिकेच्या पूर्वेला भारत देश, म्हणून तिथे तो अगोदर उगवला इतकेच. मी त्यावेळी आफ्रिकेत होतो हा एक योगायोग. असे इतिहासाच्या केंद्रस्थानी जाण्याचे प्रसंग माझ्या जीवनात आले, पण म्हणून मी हे केलं, मी ते केलं हे म्हणणं साफ चूक."

"पण तुम्ही माओ माओ चळवळीला पाठिंबा दिला. रशियाकडून शस्त्रास्त्रे मिळवून दिली, ते तर खोटं नाही ना? ह्या बाबतीत तुमचं विवेचन हा तुमचा विनय जरी म्हटला...."

"छे छे विनय नव्हे सत्यपरिस्थिती आहे सत्यपरिस्थिती !"

"सिक्कीमला असताना तुम्ही पं. नेहरूंना भारतावरील संभाव्य चिनी आक्रमणाविषयी जागरूक केले––"

"पण त्यावेळी ह्यांचं ऐकलं कुणी?" नलीनीबाईंनी मध्येच अडविले. त्या स्पष्ट बोलतात. आप्पासाहेब जे सांगत नाहीत–किंबहुना जे सांगण्यात त्यांना प्रौढी वाटते म्हणून कदाचित् ते टाळतात, ते सत्य नलीनीबाई एक स्वतंत्र नागरिक ह्या नात्याने सांगतात. त्यात पतीविषयीचा अभिमान तर असतोच पण निर्भीडता अधिक असते.

"मी त्यावेळी जे केलं ते माझ्या जागी दुसरा कुणी असता तर त्यानेही केलं असतं. चीनच्या होऊ घातलेल्या आक्रमणाविषयी चीनमधील भारतीय राजदूताने दिल्लीला कळविले. रशियाहून, जपानहून अन् सयाम–बर्माहून आपल्या दूतावासातून त्यासंबंधीच्या बातम्या पं. नेहरूंकडे पाठविल्या जात होत्या. त्याचप्रमाणे माझे निदान मी सिक्कीमहून कळविले. त्या सर्व बातम्यांवरून पं. नेहरूंची पॉलिसी ठरत होती. चीनचा तर भारत सरकारवर आरोप होता की पं. नेहरूंनी आप्पासाहेबांना सिक्कीम भूतानमध्ये पाठवून दलाई लामांना चीनविरुद्ध बंड करायला लावले ! दलाई लामांना ल्हासाहून भारतात पळून जाण्यास मी मदत केली. आरोप काय काहीही करता येतात. पण सगळे थोडेच खरे असतात. आता माझी दलाई लामांशी प्रत्यक्ष ओळख आहे, स्नेह आहे. त्यांच्याकडील जी क्रान्तिकारी लोकांची यंत्रणा होती त्यातील भूमिगत नेता ( बहुधा Chine Youngdong ) मला भेटत असे, आमच्या वाटाघाटी होत. पण म्हणून सर्व मी केलं हे साफ खोटं. तिबेटी लोकांना चिथवून, दारूगोळा पुरवून चीनविरुद्ध उठविले ह्यात खरेपणाचा अंश कमीच. वास्तविक पं. नेहरूंचे धोरण, तिबेट शांत व्हावा असे होते. तिबेटच्या उन्नतीकरता भारत–चीन या दोन्ही देशांनी त्याला मदत करावी, तिबेटी संस्कृती, त्यांचे जीवन व समाजव्यवस्था ह्यावर चीनने आक्रमण करू नये असे सत्तावन्न सालीच नेहरू व चौ एन लाय यांच्यात ठरले होते. मुद्दामहून त्यावेळी दलाई लामा दिल्लीला उपस्थित होते. चीनने दिलेल्या अभिवचनामुळेच ते त्यावेळी तिबेटला परतले. चीनने काही केले तर तिबेटमध्ये केवळ सुधारणाच घडतील ह्या आश्वासनामुळे! दलाई लामांची इच्छा तिबेटला परतून तुरुंगात पडण्यापेक्षा भारतात राहावे अशीच होती."

गेल्या फेब्रुवारीमध्ये रीडर्स डायजेस्टमध्ये आलेला नोएल बार्बरचा लेख. The Rape of Shangrila. सर्व वाचल्यावर मनाला येणारी उदासीनता. एका छोट्या राष्ट्राचा संहार. विद्येचं पुनरुज्जीवन करणाऱ्या लामांशी दाणादाण.

अनुक्रमणिका






## भारताचे ब्रिटनमधील हायकमिशनर पद्मश्री आप्पासाहेब पंत व सौ. नलिनीबाई पंत यांचा ह्या खास अंकाकरता संदेश

**भारताच्या कानाकोपऱ्यातून क्रांतीची चाहूल लागलीच आहे. ती क्रांती मानवीमूल्ये नाहीशी करणारी न होता अखिल भारतीयांना कार्यतत्पर, संवेदनाक्षम व मानवता-प्रवर्तक करो येवढीच ह्या दीपावलीच्या 'लंडन विशेषांका'-निमित्त परमेश्वराजवळ प्रार्थना!**

**आज हिंदुस्थानातील स्त्रियांना कायद्याने सर्व हक्क मिळालेले आहेतच. अनेक व्यवसायांत तसेच राजकारणात त्या चमकू लागल्या आहेत. तरीसुद्धा ही सुधारणा वर-वरची व काही थोड्याच व्यक्तींपुरती आहे असे वाटते आपली सामाजिक बैठक अजून अठराव्या शतकातलीच आहे व ती जोवर बदलणार नाही तोवर सर्वसाधारण स्त्रीवर्गाची आपल्या समाजात कुचंबणाच होत राहणार. स्त्रीशिक्षण हे स्त्रीस्वातंत्र्याचे, तिला एक व्यक्ती ह्या नात्याने जगायला शिकविण्याचे साधन आहे. ह्या शिक्षणाचा पाया सतत रुंदावण्याचे काम 'हिंगणे स्त्री शिक्षण संस्था' आज-वर करीत आहे व करणार आहे. त्याकरता म्हणून ब्रिटन-मधील मराठी लेखकांच्या मानधनाची रक्कम हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेस 'भाऊबीज' म्हणून जावी ही आपली कल्पना अतिशय स्तुत्य वाटते!**

सर्व यस्य वशाद्गात स्मृतिपथम् कालय तस्मै नमः।

"तो नोएलचा लेख तुम्ही वाचलाय?"

"वाचलाय ना. फारच अप्रतिम!"

"मग भविष्यात त्या राष्ट्राच्या स्वातं-त्र्याची काही आशा?"

"अं–अं–तो पुढचा प्रश्न. त्याचं विवेचन इथं करता येणार नाही." नलीनीबाईनाही त्याबद्दल खंत आहे. त्यांचाही पतीबरोबर तिबेटी लोकांशी संबंध आलेला.

"ते तिबेटमधील पोस्टग्रॅज्युएट स्कूल-मधले सगळे लामा आता भारतात धरम-शालेजवळ गुंफा बांधून राहात आहेत. त्यांचं पूर्वीचं तिबेटमधील जीवन जसंच्या तसं परत सुरु झालंय. भारत सरकारने त्यांच्याकरता पुष्कळ केलंय. अहो, बाहेरच्या देशांनी तिबेटी लोकांना मदत केली तर त्याचा गाजावाजा किती होतो! पण आपण त्यांच्या पुनर्वसनाकरता जे जे केलं त्याची कल्पना इतर देशांना किती आहे? कारण आम्हाला आमची पब्लिसिटी करता येत नाही ना?" व्यक्तीने आपल्या कर्तृत्वाचा डंका पिटू नये हे योग्य पण राष्ट्राने मात्र सोवळं राहून चालत नाही. नलीनीबाई भारतीय शासनातील उणीवा चोखपणे सांगतात!

पुनर्वसनावरुन निघाले. सध्यांचा पूर्व-आफ्रिकी भारतीय बंधूंच्या पुनर्वसनाचा प्रश्न. भारतीय आणि विशेषतः ब्रिटिश सरकारचा डोकेदुखीचा प्रश्न. तो सोडवि-ण्याच्या बाबतीत आप्पासाहेबांचा सिंहाचा वाटा. त्यांनी कितीतरी कृष्णशिष्टाई केली. आपले त्यांच्याविषयी स्पष्ट मत सांगताना ते म्हणतील–"तनमनधन! त्या भारती-यांचे तन आहे ईस्ट आफ्रिकेत, धन आहे ब्रिटनमध्ये आणि मन आहे भारतात. अशी ही त्रिस्थळी यात्रा. मग केविलवाणी परिस्थिती नाही होणार तर काय? आमचं मात्र असं स्पष्ट सांगणं आहे की कोणत्याही भारतीयाला, मग त्याचा पास-पोर्ट कुठल्याही देशाचा असो, हिंदुस्थानचे दरवाजे उघडे आहेत. आताचं हें नवीन कॉन्झर्वेटीव्ह सरकार आलय् ना इथं, त्याचंही धोरण, आपल्याला वाटतंय त्यापेक्षा ह्या लोकांकरता अधिक मवाळ राहील. आणखी एक लोक लंडनमध्ये पदन्यास करतील–!" एक आशावाद. आपल्या निळचा कोल्ह्यासारखी अवस्था झालेल्या लोकांविषयी आत्मीयता. सडेतोड विवेचन मात्र नलीनीबाई सांगणार–अहो अॅसेटस् इंग्लंडमध्ये ठेवून जर हे लोक लायबिलीटीज् फक्त भारतात घेऊन जाऊ लागले तर हा आतबट्ट्याचा व्यवहार कोणता देश सहन करील? आणि खरं सांगू का त्यांचा कित्येक वर्षांत भारताशी संबंध नसल्याने त्यांना आपल्या देशाविषयी तितकीशी आत्मीयता वाटत नाही!

सध्याचा भारत! तिथली बिकट परि-स्थिती. स्वदेशाविषयीच्या निष्ठा अन् प्रेम. राष्ट्रीयत्वाचे आवाहन. एक ना अनेक. मोहरा वळतो मग बी. बी. सी. कडे. आप्पासाहेब रागावले आणि परिणामी बी. बी. सी. च्या दिल्लीतील कार्यालयाची उचलबांगडी झाली. कारण एकच. अहिंसेचे पुजारी झालो म्हणून काय झाले? आता-पर्यंतचा बी. बी. सी. चा इतिहास पाहिला तर भारताची केवळ काळी बाजूच दाखविण्याची क्लृप्ती!

"अहो उद्या जर आम्ही इंग्लंडवरील चित्रणात फक्त सोहोस्क्वेअरमधील व्यभि-चारी जगच दाखविले. पिकॅडलीवरील हिप्पीज् तेवढे टिपले किंवा ईस्ट लंडनमधील स्लम्स फक्त दाखविल्या तर ते ब्रिटनचे यथार्थाने चित्रण होईल का? ब्रिटिशांना अजून वाटते, भारत हा 'म्युझिअम पीस' आहे. एक तर साधूसन्तांचा देश नाही तर दारिद्र्य–रोगराई यांनी किडलेले राष्ट्र! आणि ह्या पंकजातून आम्हाला वर काढ-ण्यास ह्यांची 'चर्च अॅण्ड चॅरिटी' तेवढी उपयोगी पडणार! आमचं आता स्पष्ट



बर्फ आणि धुके
गोठलेले, दाटलेले
आकाश करडे
निळाई हरवलेले
सारे कसे चिडीचिप्प
झाडे सुद्धा धास्तावलेली
रोडावलेली, कंटाळलेली
ओल्या नव्या ताज्या
पालवीला विसरलेली
पावसाच्या सरी
कोसळत नाहीत
पाण्याचे ओघळ
वाहात नाहीत
अंगावर काटा
सरसरत नाही
इशारा नाही
शहारा नाही

ही तर सदाची
मांडलेली आरास
गौरीला आमंत्रण...
...नसलेली.

—ललिता भावे, लंडन.

सांगणं आहे की, ब्रिटिशांनी ही चर्च-चॅरिटीची वल्गना टाकून द्यावी. आमच्याकडे त्रुटी आहेत; पण त्या निवारण्याकरता आम्ही काय योजना करीत आहोत त्या दाखवा की. कसे केले आम्ही अस्पृश्यता-निवारण? रोगराई कशी हटविली? कोटी कोटी लोकांच्या देशात अन्न पुरविण्याचे कार्य आम्ही कसे करत आहोत? देवळे अन् मटजीशाही तेवढी दाखवतात. पण त्या देवळांमार्फत ठिकठिकाणी चाललेल्या युनिव्हर्सिटीज यांना काय दिसत नाहीत? पंगू लोकांच्या, अंधांच्या शाळा यांना आढळत नाहीत? पुढल्या वीस-पंचवीस वर्षात हिंदुस्थानची क्रयविक्रय शक्ती प्रचंड वाढणार आहे. कुणी काहीही केलं, कुठल्याही पक्षाचं सरकार आलं तरी भारत संपन्न होणार! मग त्यावेळी ब्रिटिश आमच्याशी कसे वागणार? भागीदार म्हणून की तटस्थतेने? गेल्या एक वर्षाच्या माझ्या लंडनमधील वास्तव्यावरून असं सिंहावलोकन करता येईल की ब्रिटन-भारत संबंध पुढील कार्याच्या दृष्टीने सुधारणार आहेत. तांत्रिक, शास्त्रीय, औद्योगिक अन् सांस्कृतिक सर्व सर्व दृष्टीने. कितीतरी कमिट्या स्थापन होऊन कामाला लागल्यात. आम्ही आमच्या उन्नतीकरता कुणाशीही सलोखा करू. चीन किंवा पाकिस्तानशीसुद्धा! पण आता थांबणार नाही. बी.बी.सी.च्या लोकांना ह्या दुर्दम्य आशावादी भारताची ओळख पटून त्यांची चूक त्यांना समजली तर आम्ही त्यांच्याविषयी पुनर्विचार करण्याचा प्रयत्न जरूर करू!"

न बोलणारे आप्पासाहेब 'राष्ट्र' ह्या विषयावर उन्मेखून बोलले. आता एखादा माणूस स्वतःविषयी काही बोललाच नाही तर काय करणार तरी काय? आम्ही भरपूर प्रयत्न केला. वेगवेगळ्या तऱ्हेने एकच प्रश्न विचारून. नेमकं उत्तर काढण्याची शिकस्त केली. पण आप्पासाहेब आपले तटस्थ. तसे बोलले भरपूर, मनमोकळं, हसतखेळत. पण स्वतःविषयी फारच थोडं सांगून. अगदी सुरवातीलाच लक्षात आलं की हे काम काही वेगळंच आहे. आत्मस्तुती नको, पण स्वतःचं कर्तृत्व दुसऱ्याने प्रश्न विचारल्यावर मग सांगायला काय हरकत आहे? टेपरेकॉर्डरने शब्दन् शब्द टिपला म्हणून ठीक. त्याची अनेकदा उजळणी तरी करता आली. पण तो 'बोलका ढलपा' बोलणं मुद्रित करीत होता. म्हणून आप्पासाहेब संकोच करीत होते असं मुळीच नव्हतं. वास्तविक अशा गप्पात टेपरेकॉर्डरची मदत अवश्य असावी ह्याकरता त्यांचाच उत्साह अधिक. नाहीतरी त्यांचे सहकारी श्री. अरविन्द देव नव्हते का म्हणाले, "Appasaheb will never speak a word which can not be recorded!" मग अडचण कुठे होती? एवढं तोलून मापून बोलायचं कारण काय? वाटलं, त्यांच्यातला हायकमिशनर तर जागा झाला नाही ना? तसे हायकमिशनर आप्पासाहेब अनेकदा पाहिले..... त्यांची व्याख्यानं ऐकली... समारंभातून भेटलो.... टेलिव्हिजनवर बऱ्याच प्रसंगी पाहिले. गेल्या एक वर्षाच्या काळात ते किमान दोनशे ठिकाणी तरी गेले असतील. मनात जाणीव होती की आप्पासाहेबांना समाजपुरुषाला भेटताना बुरखा घ्यावा लागतो. अन् इतक्यात ते स्वतःच म्हणाले होते, हायकमिशनरला बहुरूपी व्हावं लागतं, वेगवेगळी रूपं घ्यावी लागतात. समाजातील ज्या ज्या प्रकारच्या व्यक्तींना भेटायचं त्यांच्या पातळीवर अंशतः तरी यावं लागतं. आम्हांला पाहायचे होते ह्या बुरख्यापलीकडचे आप्पासाहेब! त्यांच्या प्रचंड व्यक्तिमत्वाचे पापुद्रे उलगडून बघण्याची इच्छा होती. हाती आले मात्र एक प्रसिद्धीपराङ्मुख आणि तरीही अनुभवसमृद्ध-कर्तबगार जीवन!

* * *

अस्वस्थता वाढविणारी घड्याळाची गती. तरी समाधान एकच.... आप्पासाहेब "पाहिल्याचे"—नलीनीबाई "दिसल्याचे" जिभेवर रेंगाळणारी ती उपाहाराची चव. मनात घोळणारे ताजे तत्त्वज्ञान. तेवढ्यासाठी केलेल्या अनंत खटपटी, प्रचंड तयारी. देव—ताम्हनकरांसमवेतची पूर्वचर्चा. टलिफोन, पत्रे अन् प्रश्नमालिका. सगळ्यातून हाती आलेला समाधानी निःश्वास. राजदूताचा निवास सोडताना जड झालेली पावले. रस्ता अजूनही गजबजलेला. वीजनळ्यांच्या मंद-प्रखर उजेडात झगमगणारे स्वच्छंदी पाश्चिमात्य जीवन. आणि या एकंदर समाधानाच्या जाणीवेत आमची पवकडे वळणारी पावले बस्स इतकंच!!

● ● ●

**(भारताचे ब्रिटनमधील सध्याचे हायकमिशनर पद्मश्री आप्पासाहेब पन्त व सौ. नलिनीबाई पन्त यांच्या मुद्दाम घेतलेल्या मुलाखतीवरून)**














—प्रा. इयन रेसाईड, लंडन

# आणि मी मराठीचा प्राध्यापक झालो

डॉ. ईयन रेसाईड हे गेले एक तप लंडन युनिव्हर्सिटीत मराठी भाषेचे अध्यापन करतात. 'मिस् लॅबर्ट' नावाच्या मिशनरी बाई पूर्वी तिथे मराठी शिकवीत. मग डॉ. रेसाईड यांनी—त्यांच्याच शब्दात—"पोटाकरता" तो व्यवसाय सुरू केला. युनिव्हर्सिटीत मराठी प्राध्यापकाची जागा भरावयाची होती हे पाहून त्यांनी १९५५ सालीच मराठी शिकण्यास सुरुवात केली; परंतु पुढे "पोटाकरता" स्वीकारलेल्या भाषेने व ती भाषा बोलणाऱ्या "मऱ्हाठी" संस्कृतीने त्यांना मोहवून टाकले. त्यामुळेच ते तीनदा भारत भ्रमण करून आले. कोकणात 'गारंबीच्या बापू'च्या गावी केळीच्या पानावरला वरणभात चाखून राहिले. त्याच आकर्षणातून "Wild Bapu of Garabmi" ही 'गारंबीच्या बापू'ची आंग्ल बहीण नुकतीच साहित्य अकादमीतर्फे त्यांनी जन्माला घातली.

डॉ. रेसाईड इटालियन भाषेमधून बी. ए. झाले आहेत. फ्रेंचमधून त्यांनी डॉक्टरेट मिळविली आहे. ते गुजराती भाषाही शिकवितात—शिकतात.

'दीपावली लंडन विशेषांका'करता ह्या मराठीच्या प्राध्यापकाने लेख लिहिला हे आम्हा मराठी सारस्वतांचे भाग्यच होय!!

कदाचित चुकीचे असेल, पण माझ्या माहितीनुसार पश्चिम युरोपातील विद्यापीठांमध्ये मराठी भाषा व साहित्य या विषयांचा विशेष अभ्यास करणारा फक्त एक प्राध्यापक आहे आणि तो म्हणजे मीच. म्हणून इंग्लंडमध्ये मराठीच्या अध्ययनासंबंधी काहीतरी सांगायचे असले तर माझ्यावरच हे काम सोपवणे उचित आहे हे कबूल करावे लागते.

मी असा दुर्लभ प्राणी असल्यामुळे माझा धंदा कधीकधी गर्वाचे पण त्यापेक्षा अधिक वेळा संकोचाचे कारण असतो. माझी स्थिती किती एकाकी आहे हे ओळखायला महाराष्ट्रीय लोकांना स्वभाविकपणे कठीण जाते. माझ्या नावावर पत्रे येऊन त्याचा पत्ता "मराठी विभाग—लंडन विद्यापीठ" असा दिलेला, आणि मराठी विभाग म्हणजे एक इसम हे उत्तरात कबूल करतेवेळी कससंच वाटतं. वीस पंचवीस वर्षापासून लंडन युनिव्हर्सिटीच्या कॅलेंडरमध्ये मराठीत बी. ए. पदवीचे वर्णन पाहायला मिळते. पण आजपर्यंत कोणी कधी या सुसंधीचा फायदा घेतला नाही हे मान्य करावे लागते. खरे तर दोन तीन वर्षांनी या दुर्दशेत थोडी सुधारणा होईल. ह्या वर्षी अगदी पहिल्यांदाच एका धाडसी इंग्रजी (नव्हे वेल्शच्या) तरुणाने मराठीची पदवी घेण्याकरता उदक सोडले. तो पास होईल तर (अरे, 'तेव्हा' म्हणणे अधिक रास्त ठरेल.) पुढे पोस्टग्रॅज्युएट अभ्यासक्रम तो खात्रीने पत्करील. पण तो संपल्यावर मग काय करणार? त्याला पुढे मराठीच्या संशोधनात आपले दिवस घालवायचे असतील तर एकच गत्यंतर दिसते. एखाद्या अमावास्येच्या रात्री दडी मारून माझा शक्य तेवढा वेदनारहित (येवढीच अपेक्षा!) खून करणे व मग माझी नोकरी हिरावणे! किंवा अधिक संभवनीय उपाय





अनुक्रमणिका

म्हणजे दुसऱ्या शास्त्राचे (इतिहास किंवा मानसशास्त्र वगैरे) ज्ञान मिळवून त्या संबंधात आपली मराठी भाषा शक्य तितक्या उपयोगात आणणे.

मी वावरतो ते क्षेत्र किती विशाल आहे आणि हेच मला पडलेल्या पेचाचे आणखी एक कारण. ह्या ठिकाणी मराठी वाङ्मयाच्या विस्ताराचे वर्णन करणे अनावश्यक होईल. माझ्या मते भारताच्या सगळ्या आधुनिक भाषांमध्ये, जुने आणि नवे दोन्हीही गृहीत धरून, मराठी साहित्य विपुल आहे. मग ह्या मोठ्या तिजोरीच्या सर्व किल्ल्या जवळ बाळगायला मी कोणत्या रीतीने पात्र होऊ शकतो? मी फ्रेंचचा प्राध्यापक राहिलो असतो तर एकाच शतकाचा, बहुतेक किंवा अर्ध्या शतकाचा, बहुतेक कादंबरी, आधुनिक कविता अशा एकाच वाङ्मयीन स्वरूपाचा स्पेशलिस्ट" झालो असतो. तसा मी झालोही. मराठीचा अभ्यास करण्यापूर्वी मी चौदाव्या शतकातील वर्गंडीच्या गद्य बखर वाङ्मयात प्रवीण झालो. फ्रेंच कवितांविषयी, आधुनिक फ्रेंच गद्याविषयी मला विशेष माहिती नव्हती. अजून सुद्धा. मुकुंदराजापासून मर्ढेकरांपर्यंत, लीलाचरित्र ते वासूनाका, साहित्यिक नियतकालिकांच्या सौंदर्य-शास्त्रासंबंधित अगम्य संस्कृतप्रचुर मराठीत लिहिलेल्या निबंधांपासून प्रथम पुरुषी दुर्बोध बोलीभाषेत कथिलेल्या कोणा प्राण-घातक कुणव्याविषयीच्या लघुकथांपर्यंत, या सगळ्याची घट्ट ओळख पटत नाही, तेव्हा मात्र शरमतो. काय दशा माझी? मराठी माणसाशी वाङ्मयीन चर्चा निघते तेव्हा उषःकाल मी फक्त संक्षिप्त आवृत्तीत वाचलेली, ही गुप्त गोष्ट बाहेर आली तर?

अर्थात प्रत्येक संशोधक काही निवडक गोष्टींचे 'स्पेशलायझेशन' करतोच व थोडा वेळ गंभीरपणे बोलायचे तर ह्या मराठीच्या नवीन आणि विस्तृत विश्वातून आपले आवडते अभ्यासाचे विषय निवडण्याची संधी मिळणे म्हणजे एक अमूल्य सद्भाग्यच होय. त्यामानाने माझा इंग्लंडमधील थोडासा एकान्तवास फार क्षुल्लक वाटतो. पण स्वतःचे संशोधन करण्यासाठी किती थोडा वेळ आहे? तुम्हाला आश्चर्य वाटेल पण आम्हाला अस्सल पदवी घेणारे विद्यार्थी फार विरळ मिळूनसुद्धा प्राथमिक शिकविण्याचे काम पुष्कळ आहे. दरवर्षी काही ना काही लोक मराठी शिकायला येतात. बहुतकरून ते 'पोस्ट ग्रॅज्युएट' असतात. आपले मानसशास्त्र किंवा ऐतिहासिक संशोधन अधिक खोल नेऊ शकू या आशेने ते मराठी शिकायला येतात. वीस विद्यार्थ्यांच्या वर्गाइतका दोनतीन माणसांचा वर्ग घेण्यात शिक्षकाचा वेळ जातो, ही मोठी उपाधीच आहे.

पण सरतेशेवटी माझ्या नोकरीचा महत्त्वाचा फायदा असा आहे की पाच-सहा वर्षांच्या अंतराने भारताला भेट देण्याचे माझे कर्तव्य आहे. पण त्या अविस्मरणीय दौऱ्यात मुंबई, पुणे, बडोदे, औरंगाबाद, नागपूर, नासिक, पैठण, अमरावती व बापूच्या गारंबीजवळील कोकणातील एका सुंदर खेडेगावात मी कमी अधिक दिवस राह्यलो आहे. जेव्हा प्रत्येक गावात नवे-जुने मित्र येऊन माझ्यावर शिक्षण, अन्न, पेय, सल्ला व निवारा या सगळ्याचा प्रेमपूर्ण वर्षाव करतात तेव्हा वाटते की कुणा अनोळखी माणसाला भेटल्यावर मी कोण आहे व काय करतो हे स्पष्ट करण्याचा खूप प्रयत्न करताना नेहमीच पंचाईत पडते. नाही, मी काश्मीर, काशी, अजिंठा अजून पाहिले नाहीत. महाराष्ट्राचे सखोल ज्ञान व्हायला किती जन्म पाहिजेत? मग भारताचे काय? नाही, संस्कृत भाषेत मी फार थोडा रस घेतो. अजून पुष्कळ भारतीय लोक भेटतात. त्यांच्यामध्ये मराठी माणसेही, ज्यांना संस्कृतपुढे दुसऱ्या भाषा हीन वाटतात! मी तरी फ्रेंच आणि इटालीयन भाषांचा पुष्कळ अभ्यास करीत आलो; पण त्यासाठी शाळेत शिकलेली मातृभाषा लॅटिन हिचा फार क्वचित उपयोग पडला, असा माझा अनुभव आहे. नाही, मी काही 'प्रॉजेक्ट' बाळगत नाही. अशा प्रकारच्या योजना अमेरिकन लोक करू शकतात. जर साधा प्रवासी नसला तर प्रत्येक गोऱ्याला कोणते तरी महत्त्वाचे प्रॉजेक्ट पाहिजेच का? मला नुसती मराठी ऐकायची आहे. मराठी शक्य तितके बोलायचे आहे. मराठी लोकांना भेटायचे, मराठी भाकरी खायची व मराठी विहिरीत पोहायचे आहे. जी प्रॉजेक्टस करायची असतात ती साहित्याची, पुस्तकातली. ती मी घरी बसूनच करू शकतो.

बरी आठवण झाली! अभ्यास करण्याची वेळ पुढे ढकलू नये. ही कादंबरी अजून वाचायची राह्यली आहे—आणि आधुनिक कवींचे काय? विन्दा करंदीकरांची ओळख सात वर्षांपूर्वी झाली. पण त्यांच्या कवितांची खरी समज पडली का अजून? छे! प्रस्तुत लेखाचा उणेपणा गोड करून घ्यावा ही विनंती. मी कामाला लागलो तर बरे!

● ● ●

---

(पान १३ वरून—**लंडनची पानपुरी**)

एकदा त्यांच्या कॉलेजमध्ये सगळ्या नव्या विद्यार्थ्यांसाठी खास 'डिनर' होतं. त्यावेळी 'डीरॅक' हे एका विद्यार्थ्याशेजारी बसले होते. काही वेळ शांततेत गेल्यावर त्या विद्यार्थ्यानं हळूच प्रश्न केला.

आपला विषय कोणता आहे?

फिजिक्स—डिरॅक उत्तरले.

आनंदित होऊन तो विद्यार्थी म्हणाला "माझाही तोच विषय आहे. मला फार आवडतो. तो विषय" अन् मग मोठ्या अभिमानाने त्याने सांगितलं "यावर्षी मला शाळेत फिजिक्स"चं बक्षिस मिळालं.

त्यावर डिरॅक म्हणाले "हो का! मलाही या वर्षी त्या विषयाचं एक बक्षिस मिळालं."

त्यांना त्या वर्षीचं 'नोबेल प्राईझ' मिळालं होतं.

* * *



# लंडनची
# पानपुरी

--रँग्लर जयंत नारळीकर व सौ. मंगला नारळीकर

**( ऑक्सफर्ड आणि केंब्रिजची विद्यापीठं सातशे वर्षांहून जुनी आहेत. विविध क्षेत्रातील सुप्रसिद्ध ( आणि कुप्रसिद्ध ) व्यक्ती त्यातून पुढे आल्या. दोन्ही ठिकाणच्या कॉलेजांनी आपल्या शेकडो वर्षांच्या परंपरा जतन केल्या आहेत. देशातील सामाजिक आणि राजकीय परिस्थिती जरी हळूहळू बदलली आणि दोन्ही महायुद्धातून ब्रिटन नव्या स्वरूपात प्रकट झाला तरीही या कॉलेजांनी आपल्या परंपरा सोडल्या नाहीत. साहजिकच त्यांच्या बंदिस्त वर्तुळातून अनेक मजेदार दंतकथा आणि आख्यायिका यांचा जन्म झाला. या सगळ्या आख्यायिका प्रत्यक्ष घडल्या असतीलच असे नाही पण घडू शकल्या असतील हे नक्की. हे आहेत काही नमुने )**

ऑक्सफर्ड आणि केंब्रिज येथील कॉलेजातील हिरवीगार 'लॉन्स' प्रसिद्ध आहेत. एकदा एक अमेरीकन पाहुणा एका कॉलेजला भेट देत होता. तिथली सुंदर, हिरवी, दाट हिरवळ पाहून त्याने कॉलेज-पोर्टरला तिचं रहस्य विचारलं. वेटरनं ते चटकन सांगितलं. तो म्हणाला "आम्ही उत्तम प्रकारचं बी, उत्कृष्ट मशागत केलेल्या जमीनीत लावलं आहे. त्याला व्यवस्थित खतपाणी वगैरे घालतो."

अमेरीकन पाहुण्याचं एवढ्यानं समाधान झालं नाही. तो म्हणाला, "अमेरीकेतही उत्तम प्रकारचं बी वापरतात, खतपाणी नीट बघतात, पण असं सुंदर 'लॉन' दिसत नाही."

तेव्हा पोर्टर उत्तरला "पण आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. तुम्ही तुमच्या 'लॉन'ची तीन-चारशे वर्षे तरी अशी चांगली निगा राखून त्याचं 'मोईंग' वगैरे केलं पाहिजे, मग बघा तुमचंही 'लॉन' असं होतं की नाही."

• •

ऑक्सफर्डच्या काही विद्यार्थ्यांनी परीक्षेच्या हॉलमध्ये 'बिअर'ची मागणी केली. अर्थातच तेथील अधिकारी चकीतच झाले. तेव्हा विद्यार्थ्यांनी युनिव्हर्सिटीचा एक जुना नियम काढून दाखविला. नियम असा होता "परीक्षा चालू असताना विद्यार्थ्यांनी 'बिअर' मागितल्यास ती देण्यात यावी." परीक्षकांना नाईलाजाने बिअर द्यावीच लागली.

दुसऱ्या दिवशी, त्या विद्यार्थ्यांनी पुन्हा 'बिअर'ची मागणी केली, पण यावेळी मात्र परीक्षकांनी ठाम नकार दिला. कारण तोपर्यंत त्यांनीही सगळे जुने नियम तपासले व एक जास्त जुना नियम काढून विद्यार्थ्यांपुढे फेकला. नियम असा होता : "विद्यार्थ्यांनी तलवारी धारण कराव्यात" म्हणजे ह्या जुन्या नियमानुसार आताचे विद्यार्थी हे विद्यार्थी नव्हतेच मुळी !

• •

केंब्रिजच्या डिग्री परीक्षेचं नाव आहे 'ट्रायपॉस'. पैकी गणिताची 'ट्रायपॉस'ची परीक्षा सर्वात जुनी अन् तिला नेहमीच जास्त महत्त्व असायचं. त्या परीक्षेत पहिला वर्ग मिळविणाऱ्या सगळ्या उमेदवारांना 'रँग्लर' म्हणतात. पूर्वी ह्या रँग्लरमध्येही क्रमांक लावीत असत. अन् त्यातील पहिल्या क्रमांकाच्या रँग्लरला म्हणायचं 'सिनीअर रँग्लर' अर्थात या सिनिअर रँग्लरला खूपच मान मिळावयाचा. त्यामुळे सर्व हुषार विद्यार्थ्यात ह्या पदासाठी विलक्षण चुरस असे. कधी कधी याचे अनिष्ट परिणामही होत. म्हणून १९०९ पासून ही क्रमांक लावण्याची पद्धत बंद करण्यात आली.

एकोणिसाव्या शतकातील सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ मॅक्वेल हा 'ट्रायपॉस'चा विद्यार्थी असताना त्याला 'सिनिअर' रँग्लरचा मान मिळेल असं सर्वांना वाटत होतं. त्याची स्वतःची तर खात्रीच होती तशी. रिझल्टच्या दिवशी स्वतः बोर्डाजवळ जाण्याऐवजी त्यांनी आपल्या नोकराला पाठविलं आणि आपल्या प्रतिस्पर्ध्यांपैकी दुसरा रँग्लर कोण आला आहे ते पाहून यायला सांगितलं. नोकर रिझल्ट पाहून आला आणि म्हणाला "दुसरा रँग्लर आपणच आहात मालक."

• •

केंब्रिजमधील सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ डीरॅक हे लुकेशियनच्या पदावरून नुकतेच निवृत्त झाले. हे पद पूर्वी न्यूटननं भूषविलं होतं. डीरॅक हे मितभाषी म्हणून प्रसिद्ध आहेत.

(पान १२ वर पहा)









अनुक्रमणिका

# सुशिक्षितांची कुचंबणा

—बाळ चान्सरकर, लंडन



**...... भारतापेक्षा परदेशातील जीवन फार चांगले अशा कल्पनेनेच बहुतेक भारतीय इंग्लंडमध्ये येतात.... त्यांना येथे काय अनुभव येतो .... या अनुभवाची कल्पना इथे राहणाऱ्या लोकांनी आधीच द्यायला नको का? ......**

बहुतेक भारतीयांना परदेशी जाण्या-बद्दल फार उत्सुकता असते. परंतु परदेशी जायचे म्हणून तेथील माहिती करून घेतली असे फारसे होत नाही. इंग्रजांच्या भारतातील अंमलामुळे इंग्लंडबद्दलचे आकर्षण भारतीयांना वाटू लागले व आजही ते तसेच आहे. इंग्लंडला यायला मिळते एवढ्या गोष्टीमुळे बाकी कशाचा सारासार विचार केला जात नाही. प्रवासवर्णनातून अथवा इतर तशाच प्रकारच्या लेखनातून फारसे श्रम न करता जुजबी माहिती गोळा केली जाते. त्यामुळे इथे नोकरी मिळण्यास पडणाऱ्या अडचणी व अडथळ्यांची सत्य परिस्थिती यांच्याविषयी, येणारे लोक अनभिज्ञच असतात. अशा सत्य परिस्थितीची दवंडी पिटवण्यास लागणारे धैर्य येथे पूर्वी आलेल्या भारतीयांपैकी फारच थोडयांना असते. काही ना काही कारणास्तव परदेशी जाणाऱ्या प्रत्येकास भारतापेक्षा तेथे बरे असे वाटत असते. सुशिक्षित 'भविष्यकाळा'कडे दृष्टी ठेवून व अशिक्षित 'मुबलक पैसा' म्हणून येथे येतात; परंतु त्यातील बरेच लोक ज्या प्रकारच्या नोकऱ्या भारतात असताना लोकालाजेखातर करू धजणार नाहीत अशा नोकऱ्या Dignity of Labour म्हणून का होईना स्वतःच्या उपजीविकेसाठी स्वाभिमानाला मागे सारून येथे करतात. अशी अनेक उदाहरणे सुशिक्षितांमध्ये देखील आहेत. हे पाहून या लोकांनी इंग्लंडमध्ये येऊन भारतापेक्षा विशेष काय कमावले हा प्रश्न साहजिकच विचारला जातो.

कॉमनवेल्थमधील नागरिकांच्या अनिर्बंधित प्रवेशामुळे येथे येणाऱ्या भारतीयांची संख्या १९६० पासून वाढतच होती. ही संख्या १९६० मध्ये सुमारे ४५,००० होती. परिस्थितीचा आढावा घेतल्यावर जुलै १९६२ मध्ये येथील सरकारने नवीन कायदे अंमलात आणले व त्यानुसार कॉमनवेल्थमधील येथे येणाऱ्या नागरिकांचा प्रवेश पूर्वीइतका सहज राहिला नाही. नोकरीकरता येणारांस नोकरीचे परवाने (Employment Vouchers) व नातलगांस प्रवेश दाखले (Entry Certificate) यांची आवश्यकता भासू लागली. तरीही येणारांची संख्या फारशी कमी होईना. तेव्हा १९६२-चा कायदा १९६५ मध्ये अधिक कडक करण्यात आला. या कायद्यानुसार नातलगांशिवाय फक्त अनुभवी सुशिक्षित व येथे नोकरी मिळाली आहे अशांनाच प्रवेश करू दिला जात असे. येथील सामुदायिक रंगद्वेष व त्यामुळे येणारी सामाजिक अस्थिरता लक्षात घेऊन १९६२ चा कायदा अधिकच कडक करण्यात आला. साहजिकच यानंतर येथे येणाऱ्या भारतीयांची संख्या कमी कमी होत गेली. आता येथे नोकरीकरिता येणारे भारतीय सुशिक्षित असावेत व त्यांना नोकरी मिळण्यास विशेष प्रयास पडू नयेत हा तो कायदा कडक करण्यामागचा हेतू आहे. हा हेतू कितपत साध्य होतो हे समजणे कठीण आहे; पण एवढे खरे की येथे येणारांची संख्या आता जवळ जवळ निम्मी झाली आहे. १९६२ च्या कायद्यानुसार नोकरीकरता येथे येणाऱ्या भारतीयांची संख्या १९६२–६५ मध्ये १६,६०० होती, ती १९६६–६८ च्या काळात ६,५०० झाली व आतापर्यंत १९६९ पासून १८०० झाली. डॉक्टर्सना मिळणाऱ्या परवान्यांचे प्रमाण १९६५-मध्ये २० टक्के होते ते आता ७० टक्के झाले आहे. ह्या उलट शिक्षकांना १९६५ मध्ये ३० टक्के परवाने देण्यात आले ते आता फक्त १ टक्का आहेत. हा सरकारच्या नवीन कायद्यांचा परिणाम होय.

१९६२ पूर्वी तसेच १९६५ चा कायदा अंमलात येईपर्यंत म्हणजे अंदाजे १९६६-पर्यंत येथे येणाऱ्यांपैकी शेकडा ८० भारतीय अशिक्षित होते. त्यांना अतिशय कष्ट करूनही भारतात पैसा कमी मिळत होता. भारतीय आर्थिक परिस्थितीही चांगली नसल्याने जीवनास जरूरी असणाऱ्या दररोजच्या वस्तू मिळण्यास त्रास होतो. त्या दृष्टीने येथील जीवन सुखद आहे. पैसा असल्यास बहुतेक वस्तू येथे सहजासहजी मिळतात. कष्ट करायची तयारी असल्यास कारखान्यात तसेच इतर उद्योगधंद्यात शिक्षणाशिवायही नोकरी मिळणे फारसे कठीण जात नाही. इंग्रज लोक कमी कष्टाच्या आरामशीर नोकऱ्या करीत असल्याने रात्रपाळी करण्याची तयारी व धैर्य असल्यास नोकरीही लवकर मिळते व पैसाही दीडपट मिळतो. अशिक्षित भारतीयांची नोकरीबाबत विशेष उच्च अपेक्षाही नसते. त्यामुळे नोकरी मिळणे फारसे अवघड नाही; परंतु रात्रपाळी करताना थंडीने गारठून व मेहनतीची सवय नसल्याने अंग खिळखिळे होऊन बरेच लोक आजारी पडतात. तथापि अशा तऱ्हेचे मजुरीचे किंवा काही हलके काम कुटुंबातील स्त्री-पुरुष दोघेही करतात.










पैसा कमावून आर्थिकदृष्टचा सुस्थित होतात. त्यांचे जीवनमानही उंचावते. शिवाय भारतात हवी ती नोकरी मिळणे कठीण व तेथील वर्षभराची कमाई येथे दोन महिन्यात होते यामुळे येथे आलेले भारतीय मायदेशी परत जात नाहीत असे आढळून येते. डेनिस ब्रुक यांनी घेतलेल्या आढाव्याचाही हाच निष्कर्ष आहे. भारता-पेक्षा येथे हे लोक अधिक सुस्थित आहेत व एकमेकात अधिक मिसळतात त्यामुळे सामाजिक दृष्टचाही त्यांना भारताची उणीव फारशी भासत नाही.

नोकरीचा परवाना मिळवून येथे येणाऱ्या भारतीयांपैकी ८५ टक्के लोक सुशिक्षित असतात. गेल्या तीन वर्षात येथे आलेल्या एकूण ४५०० भारतीयांपैकी सर्वात जास्त म्हणजे ५० टक्के लोक डॉक्टर्स व सर्वात कमी म्हणजे १४ टक्के लोक शिक्षक होते. येथील सुशिक्षित भारतीयांस नोकरी मिळ-ण्यास अनेक अडचणी येतात याची जाणीव काही काळापासून सरकारलाही होत आहे. त्यातून शिक्षक व सायन्स व टेक्नॉलॉजीच्या पदवीधरांना तर आणखी विशेष प्रकारच्या अडचणी येतात. नेमणुका करणारांना भारतीयांच्या शैक्षणिक पात्रतेविषयी शंका असते. शिक्षकांना तर Department of Education and Science ची परवानगी असल्याशिवाय नोकरी मिळणेही अशक्य आहे. येथे घेतलेल्या आढाव्यावरून असे आढळते की साधारणतः नोकरी मिळण्यास भारतीयांना अंदाजे १० आठवडे लागतात. तसेच भारतीयांना अधिकाराच्या जागां-वर नेमणे हे अपवादात्मक समजल्यास फारसे चुकणार नाही. बहुतेक सुशिक्षित भारतीय मग ते कितीही शिकलेले असोत प्रथम साहाय्यकाच्या दुय्यम श्रेणीच्या हुद्यावर काम करतात. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट एकच की डॉक्टर्स व आर्किटेक्टस् आपापल्या व्यवसायातच नोकरी करतात. काही काही सुशिक्षित मुख्यतः इंजिनियर्स व रसायनशास्त्रातील पदवीधर तर नाईला-जास्तव मजुरीचीही कामे करतात. येथील रीतीनुसार बहुतेक लोक (भारतीयही) कोण कशा तऱ्हेचे काम करतो व किती पैसा मिळवतो इकडे डोळेझाक करतात. अर्थात ही डोळेझाक सोयीस्कर व दुसऱ्याला कमी अवघड वाटावे अशीच आहे; परंतु त्यात धोका असा आहे की, खोटचा स्वाभिमाना-पायी भारतीय अशा प्रकारची माहिती आपल्या भारतीय नातलगांपासून लपवून ठेवतात व त्यांच्याकडून नकळत इतर भारतीयांची दिशाभूल केली जाते. त्याही-पेक्षा महत्त्वाचे म्हणजे जबाबदारीची कामे न मिळाल्यामुळे सुशिक्षितांची मानसिक कुचंबणा होते व जीवनास जरूर म्हणून नोकरी करावयाची असा निष्क्रिय दृष्टि-कोन त्यांच्यामध्ये येतो.

येथे येणाऱ्या भारतीयांपैकी ७५ टक्के लोकांना उच्च शिक्षण घ्यायचे असते. नोकरी करून ते शिक्षण घेण्याचा प्रयत्न करतात. परंतु येथे घेतलेल्या शिक्षणाचाही










# 'प्रसन्न' आणि अक्षरशः 'सुशील' कवळेकर

प्रसन्न व सदा हसते, बहरते व्यक्तित्व, प्रखर व प्रकांड बुद्धिमत्ता, असामान्य वाक्-पाटव, प्रभावी वक्तृत्व, वाद कुशलता, साहित्य कला रसिकता, समाजासाठी हृदयात सतत वसणारी कणव व त्या पोटी अखंड धडपणारे व तळमळणारे मन, त्यांच्या भल्यासाठी व्यावसायिक फायद्या तोटयापलिकडे पाहू शकणारी त्यागी वृत्ती, उद्यमशीलता, आणि समाजसेवेचे कोणतेही काम लहान न मानण्याची व्यापक बुद्धि, कायद्याइतकीच गणितात आणि गणिताइतकीच कायद्यात रमणारी व त्याद्वारा जीवनाची रीत, जीवनाचे गणित उकलवून दाखविणारी वकिली कुशलता आदि अनेक गुणांचा समुच्चय लाभलेले एक सुशील व्यक्तित्व अचानक मूक झाले—हळहळ लावून गेले. अचानकपणे मृत्यु ज्यांना घेऊन जातो त्यांचा तो मृत्यु जवळच्यांना आणि सुहृदांना नेहमीच हळहळ लावून जातो. सुशील कवळेकर वकिली कामासाठी गोमंतकात गेले तेव्हा ते मुंबईकरांना वा महाराष्ट्राला पुन्हा दिसणारच नाहीत असं वाटलं नव्हतं. कारण कवळेकर नुसतेच 'अनेकातले एक' असे वकील नव्हते. तर प्रखर बुद्धीच्या बळावर अनेक खटले गाजवून यशस्वीपणे जिंकणारे वकील होते. अशा वकिलांना नुसती मुंबई पुरत नाही. त्यांचा संचार बहुत असतो. ते पणजीला गेले ते यशस्वीपणे परत येण्याच्या त्यांच्या नेहमीच्याच ईर्षेने ! पण मृत्यू त्या मोटारीच्या चक्रावर फिरत होता. चाक फिरत होते. चाके फिरत होती. आणि कवळेकर यांची गाडीही मृत्यूच्या महालाच्या दिशेने वेगाने पळत होती. शिरली. उलटली. आणि एक गुणी, संपन्न, सेवाभावी व्यक्तित्व मृत्यूने अलगद उचलून महालात बंदिस्त केले ! संपलं ! संपलं सारं ! ! महालाचे दरवाजे ठोकत मराठी माणसे आक्रोशत आहेत. आक्रोशत राहतील. कारण वकील अनेक मिळतील. पण कठिणांची आव्हाने स्वीकारणारा, न्यायासाठी आपले बुद्धि, चातुर्यादि गुण कसोटीला लावणारा आणि ऐहिकतेपेक्षा समाजकल्याणाची मनोमन तळमळ बाळगणारा, सदा प्रसन्न व 'सुशील' कवळेकरांसारखा वकील मिळणार नाही. प्रोत्साहक, प्रेरक व्यक्तित्व आता पुन्हा परत येणार नाही. विद्येत प्रथम श्रेणी संपादणारी माणसे आयुष्याच्या पुढील प्रवासातही आणि वैयक्तिक चरित्र—चारित्र्याबाबत ती प्रथम श्रेणी पाळू—राखू शकतातच असे नाही. कवळेकरांनी बी. ए. एम्. ए., एल्.एल. बी. या पदव्या ज्या श्रेणीने संपादल्या त्याच श्रेणीने "सुशील" हे नावही सार्थ करून दाखविले. सभा, संमेलने, वादपरिसंवाद, अभिरूप न्यायालय आदि सर्व ठिकाणी कवळेकर प्रसन्नपणे वावरले—रमले. विधानसभा—लोकसभेत त्यांनी जावे असाही प्रयत्न झाला—पण तसा योग नव्हता. पण विधानसभा—लोकसभेत गेलं तरच समाजाची सेवा करता येते अशा वरकरणी सेवापरायण भासणाऱ्या पण आतून सत्ताबाज व स्वार्थी असणाऱ्या हेतूंची कास धरणाऱ्या खुज्या व भाबडया माणसातले कवळेकर नव्हते. म्हणून पराभव पचवूनही ते सेवापरायण राहिले. 'राजकारणी कडवटपणा' वा 'दुराग्रह—हट्ट' यांना त्यांनी आपल्याजवळही फिरकू दिले नाही.

असे व्यक्तित्व अचानक मूक झाले आहे. हळहळ लावून गेले आहे. मरण अटळ असतेच. पण असले मरण अनेक वार करीत निघून जाते. त्या जखमा उरी बाळगीत भरल्या डोळयांनी मराठी माणूस म्हणणार आहे—सुशील कवळेकर गेले ! सुशील कवळेकर चिरायु होवोत ! ! अमर होवोत ! !

त्यातलाच हा 'दीपावली'चाही एक आवाज ! !

— संपादक



रंगभेदाच्या जाणीवेमुळे एका ठराविक पातळीनंतर उपयोग होत नाही, हे खरे. अशिक्षितांप्रमाणे हे लोक येथे स्थायिक होण्याचा विचार करीत नाहीत. असे आढळून येते की येथून भारतात परत अथवा इतर देशी जाण्याचा हेतू हा त्यांच्या येथील नोकरीची परिस्थिती, तसेच वैयक्तिक कारणे यांवर अवलंबून असतो. डॉक्टर्सना मायदेशी परतण्यात येणारी मुख्य अडचण म्हणजे त्यांचे येथील Specialization भारतात निकामी राहते. त्यामुळे वहुतेक डॉक्टर्स अमेरिका अथवा कॅनडा येथे जातात. सायन्स व टेक्नॉलॉजीच्या पदवीधरांना भारतात पुरेशी संधी नसते; पण येथेही चांगल्या पगाराच्या नोकऱ्या त्यांना मिळतातच असे नाही व इतर देशी जाण्यासाठी लागणारे शिक्षण नसल्याने तिकडेही त्यांना जाता येत नाही.

येथे नोकरीकरता आलेले कित्येक भारतीय नोकरी न मिळाल्याने परत गेले आहेत. त्यांच्या अनेक कारणांपैकी 'योग्य' नोकरी न मिळणे हे मुख्य. मायदेशी परतणारे भारतीय त्यांच्या शिक्षणामुळे व भारतात असलेल्या हुद्याच्या जाणीवेमुळे येथील परिस्थितीशी जुळवून घेऊ शकत नाहीत. ते गरजेखातर कमी हुद्याची नोकरी करण्यास तयार असतात; परंतु व्यवसायावाहेरील कोणतीही नोकरी त्यांना नको असते.

एकंदरीत आर्थिक परिस्थिती समाधानाची पण हुद्दा व काम यांविषयी नाखुषी असे येथील भारतीयांचे चित्र आहे. भारतातील खडतर परिस्थिती व अडचणी यामुळे त्यांना येथे जबरदस्तीने राहावे लागते. अधिक शिक्षण व पैसा मिळाल्यास त्यांची मायदेशी परतण्याची अथवा अमेरिका / कॅनडा येथे जाण्याची तयारी असते. येथे आलेल्यांपैकी एकचतुर्थांश भारतीय सर्वसाधारण पाच वर्षांनंतर हा देश सोडतात. शिक्षण व अनुभव यांच्या जोरावर अनेक देश व अनेक मार्ग त्यांना खुले असतात. मुख्यत: कुठल्या देशात जायचे हे त्या देशाच्या, तसेच स्वत:च्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीवर अवलंबून असते. ते देशोदेशी जाऊन तेथील जीवनाचा लाभ घेतात व त्याबरोबरच स्वत:ची आर्थिक उन्नती करतात.

इतके असूनही येथे राहणाऱ्या अशिक्षितांची आर्थिक व सामाजिक परिस्थिती, नाईलाजाने येथे राहणाऱ्या सुशिक्षितांपेक्षा वरीच चांगली असते.

* * *

अनुक्रमणिका

## घि गोवा हिंदु असोसिएशन ह्या संस्थेच्या सेवा-रत जीवनातील ही




जे जन्मते त्या प्रत्येकाला स्थिती असते, गती असते आणि लयही असतो. हे झाले वैयक्तिक आयुष्याच्या बाबतीत. संस्थेच्या आयुष्याबाबत जन्मानंतर फक्त स्थिती–गती आणि प्रगतीच असायला हवी. लय-'भोग' तिच्या वाट्याला येऊ नये यासाठी संस्थांना सेवा-योग लागतो आणि तो त्यांना लाभतो तेव्हा संस्था नुसत्याच वयाने वाढत नाहीत. त्यांचे वाढणे संस्थेला आणि समाजाला भूषणभूत होते. त्यांचे वार्षिक अहवाल ह्या पत्रावळी असत नाहीत तर ती असतात–बनतात इतिहासाची सोनेरी पाने! रम्य आणि गौरवास्पद अशी! त्या सोनेरी पानांनी पंचविशी पाहिली की रौप्य-महोत्सवाचे पहिले पर्व पार पडते. पन्नाशी गाठली की 'सुवर्ण महोत्सवा'चे दुसरे भाग्यशाली पर्व सुरू होते. हे भाग्यशाली पर्व लाभलेली, प्रादेशिक वाटणारी पण अवघ्या मराठी माणसांचा अभिमान विषय बनलेली संस्था म्हणजेच **घि गोवा हिंदु असोसिएशन** ही होय! वास्तविक पाहता ही संस्था गोवा-स्थित हिंदूंची. समाजाची विविधांगी सेवा करण्यासाठी तिचा जन्म झालेला; पण आज तिचा 'कलाविभाग' हाच लोकांपुढे सतत आल्यामुळे जनतेला त्याचीच अधिक ओळख झालेली आहे इतकेच! पण केवळ 'कलाविभाग' म्हणजेच 'गोवा हिंदु असोसिएशन' नव्हे! इ. स. १९१९ साली स्थापन झालेल्या ह्या संस्थेला अनेक पंख आहेत आणि त्या पंखात गरुडाची ताकद आहे. उरात आणि स्वप्नात झेप आहे. आणि म्हणूनच सुवर्णमहोत्सवाचे वैभवी भाग्य तिला लाभले आहे. संस्थेने गोमंतकाची व मुंबईतील गोमंतकीयांची बहुविध सेवा केली आहे. शिक्षण हा सुदृढ, सबल व निरोगी समाजाचा पाया आहे. आणि त्या पायावर यशोमंदिरे उभारण्याची हिंमत तरुणात असते. त्या दृष्टीने असोसिएशनने विद्यार्थ्यांसाठी व्याख्याने, चर्चा आयोजित करणे, उत्तेजनार्थ पारितोषिके व शिष्यवृत्त्या देणे, शिक्षणवर्ग चालविणे, खेळांच्या व इतर स्पर्धा भरविणे, बालक-दिनासारखे कार्यक्रम घडवून आणणे आदि मार्गांनी विद्यार्थी तरुणांची सेवा संघटना बांधण्याचा प्रयत्न संस्थेने केला—त्यातूनच १९२३ साली '**गोमंतक हिंदु विद्यार्थी मंडळा**'चा जन्म झाला. शिष्यवृत्त्या व अन्य शैक्षणिक मदतीसाठी संस्थेने स्थायी स्वरूपाचा **शिक्षणनिधी** उभा केला. १९२९ साली फक्त ५३ रुपयांनी तो सुरू झाला. आज ती रक्कम दोन लाखांवर गेली आहे. तसेच गोमंतकातून मुंबई-पुण्याला शिक्षणासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी **वसतीगृहे** चालविण्याचे संस्थेचे स्वप्न होते. गोवा स्वतंत्र झाल्यावर ही संख्या कमी झाल्याने

**आदित्य**

आता पणजीला मीरामारच्या जागेत वसतीगृह बांधण्याची योजना संस्थेने हाती घेतली आहे. तीन वर्षापूर्वी संस्थेने **रुग्ण-साहाय्य व रुग्ण चिकित्साकेन्द्र** सुरू केले असून अल्प फीमध्ये मध्यम व कनिष्ठ-वर्गीयांना उत्कृष्ट वैद्यकीय सल्ला मिळवून देण्याचे कार्य संस्था करीत आहे. या संस्थेने "**पॅथॉलॉजिकल लॅबोरेटरी व स्क्रीनिंगचीही** सोय उपलब्ध करून दिली आहे. नऊ दहा डॉक्टर ह्या केंद्रात काम करतात. निरलस सेवाभावनेने करतात. ज्येष्ठ व वयोवृद्ध डॉक्टरांचे मार्गदर्शन केंद्राला मिळत असते. १९४२ साली इमारत-निधी समिती स्थापन झाली; परंतु संस्थेला आजची लॅमिंग्टन रोड (मडकमकर मार्ग) वरील इमारत १९५९ साली मिळाली. ती हाती आल्यानेच रुग्णचिकित्सा केंद्र, संगीत शिक्षणवर्ग, कला-विभाग, वसतीगृह, वाचनालय, को-ऑप-क्रेडिट सोसायटी, संदर्भ ग्रंथालय महिला समिती आदि कार्ये हाती घेता आली आहेत. शिक्षण निधीतून आजवर आठशेवर विद्यार्थ्यांना पाऊण लाखांवर रकमेच्या शिष्यवृत्त्या देण्यात आल्या. संदर्भग्रंथालयात गोव्याच्या सांस्कृतिक व राजकीय अभ्यासकास उपयुक्त ठरतील अशी इंग्रजी, मराठी पोर्तुगीज भाषेतील शेकडो पुस्तके आहेत त्या अनुषंगाने संस्थेने प्रसिद्ध केलेल्या "**आजचा व कालचा गोमंतक**" या पुस्तकाला तर मुंबई शासनाचे पारितोषिकही

अनुक्रमणिका

मिळाले आहे. यंदा सुवर्ण महोत्सवाचे निमित्ताने श्री. ज. स. सुखठणकर यांनी लिहिलेले **'रुपडी'** व श्री. मलबारराव सर-देसाई यांनी लिहिलेले **'खांब घुमटाच्या सावलीतील संगीत'** ही दोन पुस्तके संस्थेने प्रसिद्ध केली आहेत. संगीत शिक्षणवर्ग चार वर्षापूर्वी सुरू करण्यात आले असून शास्त्रीय, सुगम व नाटयसंगीत तेथे शिकविले जाते.

कलाविभागाने वैयक्तिक व सामुदायिक विक्रम बरेच केले आहेत. प्रायोगिक व व्यावसायिक रंगमंचाला अनेक नटनटी दिल्या. दिल्ली-मद्रासपर्यंत दिगंत कीर्ती दिली व दूरचित्रवाणीवरले पहिले मराठी नाटक सादर करण्याचा मानही संगीत 'मत्स्यगंधे'नेच मिळविला. सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने संस्थेच्या कलाकारांनी तीन नाटके सादर केली. कलाविभागातर्फे **'नटसम्राट'** (वि. वा. शिरवाडकर) व **'मीरा मधुरा'** (वसंत कानेटकर) ही दोन नवीन नाटके थाटामाटात रंगमंचावर आली आहेत. गोमंतकाची परंपरा जतन करून, ती वाढवून मराठीचे भावजीवन व कला-जीवन समद्ध करण्याचे कार्य 'गोवा हिंदु असो.'चा कलाविभाग करीत आहे असे म्हटल्यास वावगे ठरू नये. आज संस्थेची सभासद संख्या **दीड हजार** असून कायम-निधी पासष्ट हजार रुपयांचा आहे. शिक्षण-निधी रु. २,६०,०००|–, कलाविभागनिधी १,२५,०००|– व इमारत व वसतीगृह निधी ३,५०,०००|–इतका आहे. हे आकडे पुरेसे बोलके आहेत असे मला वाटते.

संस्थेच्या कार्यकर्त्यात उत्साह, उमेद व स्वप्ने पाहण्याची व स्वप्नांसाठी धडपडत राहण्याची क्षमता आहे. संघटना आहे. ध्येयवाद आहे. काही निश्चित कल्पना आहेत. सहकाराची भावना आहे. आणि मुख्य म्हणजे कला-साहित्य आणि समाज यांच्या अन्योन्य संबंधावद्दल सुस्पष्ट कल्पना आहे. गोमंतकीय संस्कृतीच्या माध्यमातून भारताच्या चरणी एक सुंदर, कलात्मक आणि मोहक फूल चढविण्याची क्षमता बाळगणाऱ्या ह्या संस्थला अनेक महोत्सवांचे भाग्य लाभो असे या निमित्ताने ईशचरणी मागणे मागतो.



# पाहुणी

**—अरुण मोकाशी, लंडन**

"एक्सक्यूज मी. आर् यू मिस् शैला परांजपे?"––कोच-मवन उतरलेल्या तरुणीला मी विचारले. ती शैला परांजपेच होती याबद्दल मला खात्री होती.

"यस्. आपण डॉक्टर प्रधान?––नमस्ते!" इतका घस-घशीत भारतीय नमस्ते इंग्लंडमध्ये क्वचितच वाटयाला येतो. आणि नमस्ते करताना शैला परांजपेच्या डाव्या मनगटावरची निळी पर्स हात जोडल्यावर कोपऱ्याजवळच्या लघुकोनात खळ्कन् घसरली.

"नाही. मी सतीश कर्णिक. डॉक्टर प्रधान माझे मामेभाऊ. . ." वहिनीने सांगितलेले ते काम करायला मी मँचेस्टरहून आलो होतो.

शरद गोल्डर्स ग्रीनला राहतो. सध्या त्याचा अभ्यास चालला आहे. फुलटाईम कोर्स. वहिनी हायकमिशनच्या ऑफिसमध्ये काम करते. येत्या ईस्टरला माझा स्कॉटलंडमध्ये जाण्याचा विचार होता. मधू नाडकर्णीकडे एडिंबरोला. पण ईस्टरच्या आठवडयातल्या मंगळवारी ऑफीसमध्येच शरदचा लंडनहून टेलिफोन आला.

शरदने फोनवरून काम सांगितले होतेच. दुसऱ्या दिवशी वहिनीचे पण पत्र आले. वहिनीच्या कुंदा गोगटे नावाच्या मैत्रिणीची नणंद येत्या रविवारी लंडनला येणार होती. सहज लंडन पहायला. शैला परांजपे का काहीसे नाव होतं तिचं. परंतु ईस्टरच्या सुट्टीत शरद आणि वहिनीचे पॅरीसला जायचे ठरले होते. मिस्टर आणि मिसेस बॅनर्जीबरोबर. त्यांच्या कारमधून. हॉटेलमध्ये त्यांचे आठव-डयाचे बुकिंग महिन्यापूर्वीच झाले होते आणि ही पुण्याची ठमाकाकू लंडनला येणार असल्याचे त्यांना सोमवारी पत्र आले. वहिनीने लिहिले होते, 'तुम्ही ईस्टरला लंडनला आलात तर, शैला परांजपेची गैरसोय होणार नाही. बघा जमते का. . . . आणि तुम्हाला आता काय बुवा, मोटारगाडीचे पंख फुटलेत! . . . . .'

वहिनीच्या सविस्तर पत्रावरून सर्व परिस्थितीचा अंदाज आला. म्हणजे मला लंडनला जाणे भागच होते. पहिल्या प्रथम मधूला फोन करून कळवायला हवे होते मी येत नाही म्हणून. एक विचार आला, वाटेत बर्मिंगहॅमला उल्हास वैद्यकडे शुक्रवारी रात्री राहून शनिवारी सकाळी लंडनला गेलो तर?

फ्लॅटचे दार उघडले. समोर तारेचे पाकीट पडले होते.

**...'नाही, थोडंसं गरगरतंय,' ती हसून म्हणाली... मी तिला जवळ घेतली. तिच्या हाताची लांबसडक बोटं गरमगरम झाली होती, ती मला बिलगून बसली... तिथून बाहेर पडल्यावर ती हळूच म्हणाली, 'माझा हात धरता का? ... प्लीज'....**

शरदच्या नांवाचा टेलिग्रॅम चट्कन फोडावासा वाटेना. जरा हाश-हुश्श केल्यावर उघडू म्हणून टेलिफोनजवळच्या रॅकवर ठेवला. लिव्हिंगरूममधला हीटर सुरू केला आणि कोट काढून टाय सैल केला.

मला खरं म्हणजे भूक लागली होती. किचनमध्ये आलो. टेबलावर वहिनीची मला लिहिलेली चिठ्ठी मिळाली. वहिनीने कुठे काय ठेवले त्याची यादी होती. तिखट, मीठ, पापड, लोणचे, डाळीचे पीठ.....मजी माझी आवडती डिश् होती. चिठ्ठीत होते, 'फ्रीजमधली चिकन ताजी आहे. तुमच्यासाठीच आणली... स्टेनलेसच्या डब्यात चिवडा आणि बोर्नव्हिटाच्या डब्यात शंकर-पाळ्या आहेत....दुधाची बाटली आठला येईल. दाराजवळ असते....."

गृहदक्ष हेमावहिनीच्या अवधानातून कोणतीच गोष्ट सुटली नव्हती. वहिनीने चिठ्ठीत शेवटी म्हटले होते,

'भावोजी, पुण्याच्या मुली वस्ताद असतात बरं. जरा सांभाळून.

तुमची,

सौ. वहिनी.'

आणि शरदने गिचमिडच्या डॉक्टरी हस्ताक्षरात ता. क. लिहिला होता, 'Best of Luck, Mate !'

वहिनीच्या आणि शरदच्या त्या वाक्यांवर पुनः एकदा नजर फिरवली. हसलो. लगेच लक्षात आलं, शरदला आलेली तार त्या पुण्याच्या ठमाकाकूची तर नसेल? वहिनीचे पत्र तसेच टेबलावर टाकले आणि घाईने टेलिग्रॅम फोडला.

होय. शैला परांजपे रविवारी येण्याऐवजी शनिवारी दुपारीच लंडनला येणार होती. तिचे विमान दुपारी अडीच वाजता विमान-तळावर उतरणार होते. म्हणजे आता राहिला अवघा एक तास. या दुपारच्या गर्दीत विमानतळावर पोहोचायलाच एक तास लागला असता. अंदाज केला, दुपारी अडीच वाजता येणारे विमान बहुतेक एअर इंडियाचे असावे. मग शैला परांजपेला विमानतळावरून व्हिक्टोरिया टर्मिनसवर बोलावून घेतली तर? लगेच एअर इंडियाला फोन करून चौकशी केली. निरोप शरदच्या नावाने ठेवला.

"दुपारच्या अडीचच्या फ्लाईटने शैला परांजपे नावाची तरुणी येणार आहे. तिला कोचने व्हिक्टोरियाला येण्याबद्दल कळवाल का? मी तिची व्हिक्टोरिया कोच स्टेशनवर वाट बघत असल्याचे तिला कृपया कळवा."

'शैला परांजपे. नाव तर मोठं गोड.....पुण्याच्या पोरी कंडा असतात म्हणे.....बडोद्याला माझ्या वर्गात होती एक परांजपे नावाची मुलगी.....शैला परांजपे तिच्यासारखीच असेल?.....घाऱ्या डोळ्याची? ठेंगणी? ज्याडी? फ्याशन म्हणून गंध न लावणारी?....मरीयाच्या कपाळावरचं टप्पोरं कुंकू किती सुंदर दिसत होतं....एलिझाबेथ राणीने सगळ्या इंग्लीश पोरीना कुंकू लावण्याबद्दल फर्मान काढलं तर.....

दोन मिनिटात विचार भरकटत गेले. मनात हसलो.

व्हिक्टोरियाला पोहोचायला तीन वाजले. गाडी जवळच्या तळावर पार्क केली. आत जाऊन चौकशी करून आलो. विमान वेळेवर आले होते. म्हणजे अडीच वाजता शैला परांजपे हीथ्रो एअरपोर्टवर उतरली असेल. व्हिक्टोरिया टर्मिनसला येईपर्यंत तिला साडेतीन चार तरी नक्की वाजतील. कोच येण्याची वाट पहात बसलो.

समोरून एक कोच येताना दिसला. पंधरावीस काळे, दहा बारा गोरे आणि चार पाच मडमा उतरल्या. दोन इंडियन पोरीही गर्दीत दिसल्या. पण ती सरोजबेन सरलाबेन अने कंपनी असल्याचे लांबूनच ओळखले. मी बडोद्याचा. साडीचा उलटा पदर नसला तरी बेनकंपनी तेव्हाच ओळखतो. विचार आला, शैला परांजपेला लांबून ओळखता येईल? पुण्याची मामटी कोणत्या वेषभूषेत असेल कुणास ठाऊक? आणि गेल्या तीन चार वर्षात मराठी पोरींच्या फॅशनमध्ये काय काय भर पडली असेल? इंडियात असतानाच ब्लाऊजची रुंदी पोटाच्यावर सरकताना पाहिली होती. साडीची उंची कमरेच्या खाली घसरताना पाहिली नव्हती. फिल्मफेअरचे अंक चाळताना चित्रांवरून समजली होती. हिप्पी प्रकरण मुंबईला पण चवताळल्याचे ऐकले होते. शैला परांजपे इंग्लंडला जायला निघाली की दोन मैत्रिणी म्हणायच्या,

"अय्या शैले, लंडनला चाललीस. अशी काकूबाईसारखी साडी नेसून कसली जातेस?"——

अन् मग शैला परांजपे लंडनला उतरायची रॅकेल् वेल्शच्या आऊटफीटमध्ये? बाकीच्या गोष्टी रॅकेल् वेल्शसारख्या नसून-सुद्धा.

समोरून दुसरा कोच आला. त्यात एक तरुणी दिसली नि प्रारंभी दिलेला आमचा संवाद झडला. मी पुढे म्हटले, "मिस्टर आणि मिसेस प्रधान पॅरीसला गेलेत, मी सकाळी मँचेस्टरहून आलो, मिसेस प्रधाननी मला आपल्याला भेटायला सांगितले. तुमची तार तीन तासापूर्वी मिळाली हा मजकूर एका दमात बोलून टाकला. वास्तविक हे सर्व कसे बोलायचे याची मनात रंगीत तालीम चालू ठेवली होती. मराठीमधली आणि इंग्लीशमधलीही. पाहुणे म्हणून इंग्लंडला आलेली मराठी माणसे उगाच फाड्फाड् इंग्लीश बोलतात. काय वाटतं त्यांना कुणास ठाऊक? आम्ही मराठी पार विसरून गेलो असू?








शैला परांजपेची फक्त एका स्वेटरवर कशी थंडी भागली असेल ? म्हणजे ही अडीच वाजल्यापासून इथपर्यंत अशीच कुडकुडत आली ? ईस्टरचे दिवस झाले म्हणून काय झालं ? विमानतळावर उतरल्यावर कुणालाही प्रथम हुडहुडी भरतेच. तिच्या लहानशा गोऱ्यापान नाकाचा शेंडा शेंदरी झाला होता.

कोणताही प्रश्न विचारण्याअगोदर माझा ओव्हरकोट काढत म्हटले,

"तुम्हाला खूप थंडी वाजत असली पाहिजे. घ्या हा जरा." कोट तिच्या हातातच दिल्यामुळे कशाला "कुठे आहे एवढी थंडी ?" वगैरे तिने म्हणण्याचा प्रश्नच नव्हता. शैला परांजपेने ओव्हरकोट लपेटून घेतला. ती खरोखरच गारठून गेली होती. मी तिची सूटकेस उचलली.

बी. ओ. ए. सी. इमारतीच्या टॉवरच्या घड्याळात साडेचार वाजले. शैला परांजपेला घेऊन माझी ऑस्टीन मिनी गोल्डर्स-ग्रीनला निघाली.

'कसा काय झाला प्रवास' या प्रश्नाचे उत्तर पाहुणा काय देणार हे यजमानाला माहीत असते. पण प्रश्न यजमानाने विचारायचा असतो आणि पाहुण्याने त्याचे मनापासून उत्तर द्यायचे असते. मी विचारले,

"कसा काय झाला प्रवास ?"

"छान. पाहुण्यांनी स्वागत करणाऱ्यांची एवढी धावपळ उडवून दिल्यावर प्रवास छानच होणार ."



खरं म्हणजे तिचा प्रवास चांगला होण्याचा आणि माझ्या मघाच्या धावपळीचा काही संबंध नव्हता. पण पाहुण्यांना कृतज्ञता व्यक्त करायची होती. मघाशी दार हातात धरून उभा राहिलो त्यावेळी थँक्स मिळाले नाहीत. पण आता सर्वांचेच थँक्स मिळाले. एकदम. शैला परांजपे सुंदर होती. कुरळ्या केसांची. साधी. टंच नसलेली. पोरकट नव्हती पण प्रौढही वाटली नाही. कृत्रिम बोलत नव्हती. तरुण मुली उगीच मोठ्यांसारख्या बोलायला लागल्या किंवा पोक्त बायका लाडात बोलायला लागल्या की कसे चुकीच्या गिअरमध्ये धावणाऱ्या कारसारखे वाटते.

मिस्टर आणि मिसेस प्रधान भेटले नाहीत याबद्दल तिला फारसे काही वाटले नसावे. माझ्यासारखा अनोळखी माणूस अकल्पित भेटल्यामुळे आणि लंडनमधले आतिथ्य करायला असल्या-मुळे बावरलेली दिसली नाही. मलाही हायसं वाटलं. माझा अंदाज अगदी बरोब्बर होता. शैला परांजपे मुंबईला एअर इंडियाच्या ऑफिसमध्ये काम करते. तिच्या वार्षिक पासावर ती लंडन पहायला आली होती आणि वाटेत मॉस्कोला दोन दिवस थांबली होती. मैत्रिणीकडे.

"हा ट्राफालगार स्क्वेअर नं ?"––नेल्सनच्या पुतळ्याकडे बोट दाखवीत तिने विचारले. आम्ही नॅशनल आर्ट गॅलरीजवळून जात होतो.

"होय. अरे वा, तुम्हांला लंडनची खूप माहिती आहे."

वास्तविक मी वन् वे सिस्टीममध्ये रस्ता चुकलो होतो. व्हिक्टोरियाहून गोल्डर्सग्रीनला जायला नाहीतर ट्राफालगारवरून जायची आवश्यकता नव्हती. लंडनमधले सर्व रस्ते मला ठाऊक नव्हते. रस्त्याची खडान् खडा माहिती व्हायला स्कॉटलंडयार्डच्या पोलिस दलात भरती व्हायला हवे. वेस्टमिन्स्टरमध्ये स्वतःची गाडी चालवायचा माझा पहिलाच प्रसंग होता. लक्ष रस्त्यावरच्या पाट्यां-कडे होते. यूस्टन किंवा कॅमडन् टाऊनच्या मार्गाचा बोर्ड मला हवा होता.

कोणत्याशा हिंदी चित्रपटात शैलाने लंडन पाहिले होते.

"तुम्ही 'संगम' पाहिला असेल ?"

"नाही. मी आलो त्यावेळी आमच्या बडोद्याला आला नव्हता."

या माझ्या उत्तरात मी बडोद्याचा आणि तीन-चार वर्षां-पूर्वी इंग्लंडला आलो अशी माहिती तिला मिळाली असावी.

"तुम्हाला इकडे येऊन बरेच दिवस झाले असावेत ?"

"हं."

कॅमडन् टाऊन दोन मैलांवर असल्याची पाटी दिसली. आम्ही ऑल्डविचच्या अर्धवर्तुळाला वळसा घेत होतो.

"ती तिरंगी झेंडा लावलेली इमारत 'इंडिया हाऊस'. इंडियन हायकमिशनचे ऑफिस. हेमावहिनी या ऑफीसमध्ये काम करते"–मी म्हटले.

आता गोल्डर्सग्रीनचा रस्ता सरळ होता! परत चुकण्याची






शक्यता नव्हती. थोड्या थोड्या अंतरावर ट्राफिक सिग्नल्स होते. रस्त्यावर खूप गर्दी होती. सिग्नलजवळ बाजूला, पुढे, मागे मोटार-गाड्यांची मोठी रांग थांबायची. पण गोंगाट नव्हता. हॉर्नचा तर अजिबात आवाज नसल्याचे शैलाला आश्चर्य वाटले.

"आणखी काय तुम्हाला लंडनमधले माहिती आहे?"—काहीतरी विचारायचे म्हणून मी विचारले.

"तो समोरचा पोस्ट ऑफीस टॉवर—" तिने तत्काळ उत्तर दिले. मला मजा वाटली.

'हा टॉवर आमच्या फर्मने डिझाईन् केला' असे ठोकून देण्याचा मला मोह झाला. पण लगेच आवरला. थाप कशाला मारायची?

"वरच्या मजल्यावर टॉवरवरती फिरते रेस्टॉरंट आहे. आपण जाऊ वेळ झाला तर."—मी झट्कन बोलून गेलो. फिरत्या रेस्टॉरंटमध्ये जाण्यासाठी अगोदर रिझर्व्हेशन करावे लागते. नुसत्या रिझर्व्हेशनलाच एखाद दीड पौंड लागत असावा. डिनर वेगळे. शैलाला टॉवरवर डिनरला न्यायला परवडेल?

हॅम्पस्टेड हीथच्या तळयाला वळून थेट गोल्डर्सग्रीनच्या ट्यूब स्टेशनजवळ आलो. समोरच्या झेब्रा क्रॉसिंगवरून एक सरदारजी, सरदारीण आणि त्यांची तीन मुले रस्ता ओलांडत होती.

"हे गोल्डर्सग्रीन. म्हणजे तुमच्या मुंबईची हिंदु कॉलनी किंवा पुण्याचा डेक्कन जिमखाना. चिकार इंडियन्स आहेत इथे. इतके की साहेब लोक दिसतात कधीकाळी फॉरीनर्ससारखे. क्वचित." माझी ही अतिशयोक्ती होती. शैला हसली. खरंही वाटलं असेल तिला कदाचित.

शैलाला घर दाखवले. सूटकेस बेडरूममध्ये नेऊन ठेवली. प्रवासाने ती दमली असेल. मी तिला बेडरूममध्ये सोडून खाली आलो. इतक्या सुंदर तरुणीचा पाहुणचार करायचा माझा पहिला प्रसंग होता. आपण खूप अदबीने आणि विनयाने बोलले पाहिजे अशी मनाशी खूणगाठ बांधली. शैलाच्या जागी मुलगा असता तर एवढे अवघड वाटले नसते. एव्हाना अहो, जाहो वरून मी 'अरे'-वरही आलो असतो. तिला नुसतेच 'ए शैला' म्हटले तर? नको. एखादवेळेस ती मला उद्धट समजायची. शिवाय तिच्याबरोबर अद्याप दोन तीन दिवस जायचे आहेत.

लिव्हिंगरूममधला टेलिव्हिजन सुरू केला. मला चहाची तल्लफ आली होती.

"तुम्हाला चहा चालेल नं?" मी जिन्यातूनच ओरडून विचारले.

"नको"—बेडरूममधून आवाज आला.

"मग कॉफी?"

"अं.... अं.... नको.... चालेल."

बाईसाहेब चहा आणि कॉफी दोन्हीही घेत नसाव्यात. चहा नको म्हटल्यावर कॉफीलाही नाही कसे म्हणायचे म्हणून ती

'चालेल' म्हणाली होती इतकेच. माझ्यासाठी चहा बनवला. शैलासाठी कॉफी करण्याचा विचार रद्द केला. फ्रीज उघडला. कोको कोलाची बाटली होती. लागरच्या पण दोन बाटल्या होत्या. सोनेरी कडा असलेला ग्लास कपाटातून काढला. चहाची किटली भरली. आणि ग्लासमध्ये कोक ओतला. थंडगार कोकचे ग्लासमध्ये तुषार उडत होते. वाटलं, मी दारू पाजतोय् असं तर वामणिणीला वाटणार नाही? काय सांगावं, इंग्लंड जर्मनीमधले लोक पाण्या-सारखी दारू पितात असा पुण्या, मुंबई, बडोद्याला समज असतो लोकांचा. ट्रेमध्ये चहाचा कप, किटली आणि कोकचा ग्लास ठेवला. कोकची रिकामी बाटलीही ट्रेमध्ये ठेवली. म्हटलं, असू द्यावी. सातआठ बिस्किट्स बशीत घेतली आणि ट्रे घेऊन लिव्हिंगरूममध्ये आलो. शैला आवरून लिव्हिंगरूममध्ये येऊन बसली होती. टेलिव्हिजन पहात होती.

"तुमच्यासाठी थंड कोक आणलाय. चालेल?"

टप्पोरे डोळे मोठे करून म्हणाली, "हो. कॉफीही चालली असती."

शैलाने साडी बदलली होती. केस सारखे केले होते. मघांची कुरळ्या केसांची बट आता कपाळावर येत नव्हती. लिपस्टीकची कांडीही ओठांवरून फिरवली असावी. सुंदर दिसत होती.

"टेलिव्हिजन तुम्ही प्रथमच पाहिला असेल?" मी लंडनला पहिल्यांदाच टेलिव्हिजन पाहिला ते आठवून तिला विचारले.



"नाही. दिल्लीला पाहिला होता गेल्या वर्षी."

थोडा वेळ कार्यक्रम पाहण्यात आणि बोलण्यात निघून गेला. असेच बसून राहिलो तर, सबंध वेळ टेली पाहण्यात जाईल. माझी दोन दिवसच सुट्टी होती आणि तेवढ्यात शैलाला आख्खे लंडन दाखवायचे होते.

"तुम्ही खूप दमलायत का?" माझा हा प्रश्न तिला अनपेक्षित होता.

"छे:! इथे काय सर्व प्रवास कारमधून झाला." ती मनापासून बोलत होती.

"रात्री वेस्टएन्डमध्ये फिरायला जायचंय्? का टेम्सवर चलता? रात्रीच्या वेळी टेम्स नदी खूप छान दिसते?"

टेम्सवर जायचे ठरले.

जेवण आणि वॉशिंग संपेपर्यंत आठ वाजले. वेस्टमिन्स्टर-मध्ये गाडी नेण्यात शहाणपणा नव्हता. परत रस्ता चुकलो असतो. गोल्डर्सग्रीनच्या ट्यूब स्टेशनपर्यंत गाडीने गेलो आणि ट्यूब पकडली. चेरींग क्रॉसला ट्रेन बदलून वेस्टमिन्स्टरसाठी सर्कल लाईन घेतली. सव्वेच्या पायऱ्या चढून वेस्टमिन्स्टर पुलावर आलो. बिगबेनच्या घड्याळात नऊ वाजायला पाच मिनिटे होती. वेस्टमिन्स्टर पूल पाहिल्यावर शैलाला वर्डस्वर्थची वेस्टमिन्स्टर पुलावरची कुठली तरी कविता आठवली. कवितेचे शेवटचे कडवे तिने म्हटले. माझ्या डोक्या-वरून गेले. वेस्टमिन्स्टर पुलावरून आम्ही टेम्स ओलांडत होतो. बिगबेनचे नवाचे ठोके पडले. ठण्.... ठण्..... ठण्. ... निळ्या ढगांतून आकाशवाणी व्हावी तसे बिगबेनचे ठोके पुलावरच्या कोलाहलात उमटून गेले.

पुलापलिकडच्या पायऱ्या उतरून सेंट टॉमस हॉस्पिटलच्या मागच्या बाजूला आलो. समोर पार्लमेंट. हाऊसेस ऑफ पार्लमेंटच्या पुढयातली टेम्स शांत आहे. कमालीची. प्रवाह डावीकडून उजवीकडे की उजवीकडून डावीकडे वाहतो ते नवख्याला समजत नाही. काळ-वंडलेली पार्लमेंटची इमारत अंधारात आणखीनच काळी वाटते. कधीही सूर्य न मावळणाऱ्या एकेकाळच्या साम्राज्याची ऐट मारणारी ही इमारत साहेबाने तशीच का काळवंडून दिली कुणास ठाऊक.

"पुलाच्या उजवीकडल्या त्या रस्त्याला व्हिक्टोरिया एम-बॅंकमेंट म्हणतात. व्हिक्टोरिया एमबॅंकमेंटवर क्लिओपात्रा नीड्ल बघण्यासारखी आहे. वेस्टमिन्स्टर पुलावरून सरळ पुढे गेल्यावर डावीकडे वेस्टमिन्स्टर ॲबे आणि उजवीकडे वळले की व्हाईट हॉल. डाऊनिंग स्ट्रीट व्हाईट हॉलला लागून आहे. नंतर जाऊ आपण डाऊनिंग स्ट्रीटवर."

सुंदर व्यक्तीला लंडन दाखवायला कंटाळा येत नाही.

"आपण बसू या का जरा वेळ?" मी विचारले.

"अं.... नको. रॉयल फेस्टिव्हल हॉल कुठला यातला?"

"इथून दिसणार नाही. पुलावरून परत जाताना दिसेल."

(पान ७१ वर पहा)







# फक्त पाहुण्यांसाठी

—माधव जोशी, लंडन



...मागे मी लंडनला आलो असताना आपण माझी उत्तम बडदास्त ठेवलीत त्याबद्दल तुमचे आभार कसे मानावेत ते कळतच नाही...आता माझा भाऊ (किंवा मित्र अगर अन्य कुणीतरी) पुढील महिन्यात लंडनला येत आहे, तरी...

—"चि. अशोक Boeing 707 ने दि. २७ ला लंडन येथे येत आहे, तरी त्यास उतरवून घेण्यास विमानतळावर न चुकता यावे."

—"माझी आणि आपली प्रत्यक्ष ओळख नाही; परंतु आपले मेव्हणे श्री. गोखले यांचे सांगण्यावरून हे पत्र आपणास लिहीत आहे. मी पुढील महिन्यात ३।४ दिवसांसाठी लंडनला येत आहे तरी माझी रहाण्याची सोय आपणांकडे केल्यास फार उपकृत होईन. तसेच काही पौंडांची मदत आपण मला तिथे केल्यास त्याचे पैसे रुपयात मी तुमच्या घरी पोचते करीन.

— as this is my "**First**" **time**, to come to London, I shall be '**grateful**' if you will very kindly come to **airodrome** to take me.

* * *

आम्हा लंडनमध्ये रहाणाऱ्या लोकांना नेहमी येणाऱ्या पत्रांतील काही वाक्ये जशीच्या तशीच वर दिली आहेत. बरेच दिवस लंडनला राहिल्यामुळे आम्ही मराठी भाषा अजिवात विसरलो अशा कल्पनेने किंवा एकदम Impression पाडावे ह्या प्रामाणिक उद्देशाने असेल कदाचित, काही मंडळी एकदम इंग्रजीचा आश्रय घेतात, अर्थात् अशा पत्रात त्यांना होणारा 'पहिल्या खेपेचा' त्रास त्यांच्या Spelling वरून किंवा वाक्यरचनेवरून होतो ही गोष्ट निराळी. इकडे येणाऱ्या व्यक्तींना येथील परिस्थितीची व आमच्या काही अडचणींची जाणीव भारत सोडण्यापूर्वीच व्हावी ह्यासाठी या लेखाचा प्रपंच.

इथे येणाऱ्या व्यक्तींचे आणि ज्यांना पत्र लिहीले असेल त्या व्यक्तींचे संबंध कितीही जिव्हाळ्याचे, नात्याचे किंवा प्रेमाचे असले तरी नुसते Boeing किंवा तारीख लिहून मुळीच चालत नाही तर Flight No., कुठच्या कंपनीचे विमान व लंडनला पोचण्याची वेळ, लिहीणे हे फार महत्वाचे आहे. लंडनला दोन मुख्य विमानतळ आहेत, पैकी भारतातून येणारी बहुतेक सर्व विमाने Heathrow ह्या प्रमुख विमानतळावर येतात आणि हा विमानतळ शहरापासून साधारण १५ मैल लांब आहे. तेव्हा एखाद्याला उतरवून घेण्यासाठी म्हणून तिथे जावयाचे म्हणजे ४।५ तास तरी सहजच मोडतात. शनि-रविवार असेल तर गोष्ट निराळी. दुसरी गंमत अशी की, "आपण येणार असल्याचे" आणखी तीनचार लोकांना तरी, सावधगिरी म्हणून कळवून ठेवतात. त्यामुळे होते काय की Air-Port वर आम्ही ओळखीचे लोक भेटतो; तेव्हा कळते की आपण सर्व अमुक अमुक गृहस्थांना आणण्यासाठी आलो आहोत. तेव्हा शक्य तर ह्या सर्वांना पत्रे लिहीताना एकमेकांचे पत्ते लिहून तसा संदर्भ दिल्यास आम्ही आपसात ठरवू शकू व कुणीना कुणी तरी एक-दोनजण विमानतळावर येऊन इतरांचा वेळ नक्की वाचू शकेल. ह्याबाबतीत एक गोष्ट सोपी आहे. ती म्हणजे Air-Port वर बोलावण्यापेक्षा शहरातल्या Victoria Air Terminus वर लोकांना बोलवावे. विमानतळावरील बिल्डिंगच्या समोरून V. A. T-वर येण्यासाठी दर पंधरा मिनिटांनी BOAC चे कोचेस सुटतात. कुठच्याही Airways ने प्रवास केलेल्या प्रवाशांना ह्या कोचमधून शहरात येता येते, दरही माफक असतात, शिवाय एवढा पाचसहा हजार मैलांचा प्रवास केल्यानंतर, आणखी पंधरावीस मैल पुढे जाणं तितकेसे अवघड जाऊ नये.







## "लंडनला येऊन...."

परदेशी आकर्षणाला
कशी मी भुलले
लंडनला येऊन मी पुरी फसले ॥धृ॥
"गुड मॉनिंग", सुतकी चेहरे
मार्ग कचेरीचा
बोचरी थंडी, पिवळा प्रकाश
रस्ता धरा घरचा
घरी येता माणूस नको, टीव्ही पुढे बसले ॥१॥
गायनाच्या बैठकी
होतात रात्ररात्र
कला थोडी "शो" फार
पेग वर पेग मात्र
"सोशल लाईफ" हेच ते हे जेव्हा कळले ॥२॥
माल घेता 'थँक्यू'
पैसे देता 'थँक्यू'
'थँक्यू'ने सुरवात
शेवटीही "थँक्यू"
थँक्यू थँक्यूला आता मी विटले ॥३॥

**सौ. शीला कोठारे**
(लंडन)

इथल्या रहाणीची, थंडीची, कल्पना आपल्या लोकांना असावी तितकी नसते. जे लोक इथे स्थायिक होऊन स्वतःच्या मोठाल्या घरात रहातात त्यांची गोष्ट सोडली तर सर्वसाधारण जोडपे एक बेडरूम, एक लिव्हींग रूम व सैपाकघर अशा प्रकारच्या घरात रहाते. सर्व जागा Furnished असल्यामुळे 'बेडस्' अगदी मोजकेच दिलेले असतात. थंडीमुळे बेडवरच झोपावे लागते. तेव्हा "आम्ही कुठेही झोपू. आमची तुम्हाला अडचण होणार नाही" असे कळवून चालत नाही. एवढे सर्व करूनही समजा सोय केलीच तर मालकाला किंवा मालकीणीला ते चालेलच हे सांगता येत नाही. 'तुमच्याकडे Guests फार येतात' ह्या एकाच कारणासाठी मला माझा Flat सोडावा लागला होता.

इथे सर्व व्यवहार, मग ते भावाभावामधील असोत किंवा मायलेकीचे असोत पैशाने मोजले जात असल्यामुळे, पैसे देण्यात किंवा त्यापेक्षाही घेण्यात गैर किंवा चमत्कारिक कुणालाच वाटत नाही. आपल्याला मात्र अशी सवय नसल्यामुळे कठीण जाते. मागे आमच्याकडे भारतातून एक बाई आल्या होत्या. आमच्या मालकाला 'त्यांची सोय करशील का?' असे विचारले. With Pleasure असे म्हणून त्याने एक Bed Room बाईना रहावयास दिली. जेवणखाण्याचा प्रश्नच नव्हता. ते आमच्याकडेच होत होते. मालक फारच चांगल्या स्वभावाचा भेटला ह्या आनंदात आम्ही दोघेजण होतो; परंतु आठवड्याच्या शेवटी जेव्हा त्याने आठवड्याचे ७ पौंड आमच्याकडे जास्त मागितले तेव्हा आमचा सर्व आनंद बाईंबरोबर निघून गेला. वर गंमत म्हणजे भारतातून बाईचे पोचल्याचे पत्र आले त्यात सोय केल्याबद्दल मालकाचे त्याला समजावे म्हणून इंग्रजीत आभार मानले होते.

ज्यांना हॉटेलमधे किंवा आपल्या भारतीय पद्धतीच्या लॉजिंग-बोर्डिंगमधे रहावयाचे आहे असे काही पत्ते अंकात इतरत्र सापडतील. इंग्रजी हॉटेल्सपेक्षा ह्या खाणावळींचे दर नक्कीच कमी असतात. दिवसाला माणशी साधारण १ पौंड दर असतो. यात सकाळचा Break Fast, रात्रीचे जेवण व निजण्याची सोय असते. अर्थात अशा ठिकाणी उतरल्यावर तुम्हाला इंग्लंडमध्ये आहोत याची जाणीव सुद्धा होणार नाही इतके घरगुती वातावरण तिथे असते. इंग्लंडमधे आणि युरोपातील कुठल्याही देशात हॉटेलसच्या दरासंबंधी फार सावध असले पाहिजे. कारण काही ठिकाणी फक्त Bed & Breakfast यांची सोय असते.

आता पौंडासंबंधी—एकतर दर महिन्याला नियमित काही पौंड घरी पाठविणारी किंवा पाठवावेच लागतात अशी परिस्थिती असणारे फारच थोडे लोक ब्रिटनमध्ये असतील. कारण तिकडची जबाबदारी ठेवून माणूस सहसा इतक्या लांब येत नाही. बरे Dependant म्हणून ज्यांना काही पैसे पाठवावे लागतच असतील अशांनी त्यांच्या Income Tax Return मधे ते दाखविले गेले तरच (म्हणजे Receipts वगैरे) टॅक्समध्ये सूट मिळते. ब्रिटनमध्ये सर्वसाधारण ४१.२५ टक्के टॅक्स भरावा लागतो. तेव्हा "तुम्ही दरमहिन्याला जे पौंड तुमच्या घरी पाठविता ते २।३ महिने पाठवू नका, त्यांचे रुपये मी भारतात देतो' असे म्हणून चालत नाही. मला नक्की कल्पना नाही, पण असला व्यवहार कायदेशीर नसावा. ह्याशिवाय सरकारी दरापेक्षा जास्त दराने पौंड देण्यास किंवा घेण्यास काही महाभाग नेहमीच तयार असतात ही गोष्टतर नक्कीच बेकायदेशीर अन् भारताच्या दृष्टीने देशविघातक असल्यामुळे तिचा विचार करण्याची जरूरी नाही.

काही जणांच्या पत्रातून आम्हाला भारतातून काही हवे असल्यास ते आणण्याबद्दलही लिहिलेले असते. एकतर सर्व खाद्यपदार्थ इथे भरपूर व चांगले मिळतात. विशेषतः आफ्रिकेतील इथे येऊ लागल्यापासून भारतीय किराणामाल विकणारी अनेक दुकाने लंडनमधे निघू लागली आहेत. आज अशी २०० चे वर दुकाने एकटच्या लंडनमधे आहेत. इकडे येताना विमानात Duty Free सिगरेटस् व ड्रींक्स् मिळतात त्या जरूर आणाव्यात. त्याचे पैसेही घेणे योग्य अन् ते घ्यावेतही. ह्या संबंधात एक प्रसंग मला आठवतो. तीनचार वर्षांपूर्वी असेच ओळखीचे एक गृहस्थ २।३ दिवसांकरता आमच्याकडे आले होते. आल्यानंतर जेवणखाण झाल्यावर गप्पागोष्टी करताना,

(पान ७९ वर पहा)






मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास





## सौ. इंदिरा रानडे,

लंडन

**...फ्रेडी सांगत होता नि जेनसमोर कॅथीचा चेहेरा पहिल्यांदाच शरमिंदा होत होता... उभ्या आयुष्यात फ्रेडी प्रथमच जेनच्या मनातून उतरलेला दिसला. त्या आनंदात माझा राग कुठल्याकुठं पळून गेला होता...**

टेलिव्हिजन पहाता पहाता आमच्या बाईसाहेबांनी मध्येच विचारलं, "ऐकलंस का जॉर्ज ?

जपानमध्ये होत असलेल्या औद्योगिक भरभराटीवर टेलिव्हिजन-वर छान कार्यक्रम चालला होता. असल्या विषयात जेननं गोडी दाखविण्याचं काहीच कारण नव्हतं.

'ठीक आहे, जपान बराच पुढे गेला आहे. रेडिओ-टेप-रेकॉर्डर अशा पुष्कळशा वस्तू होतात तिथं. सुबकही असतात. तिथं आता एक्स्पोही भरणार आहे, ह्या वर्षी..पुष्कळ झाली माहिती. जास्त कशाला खोलात शिरायचं?...' माझ्या बायकोची अशी सरळ विचारसरणी असते. तेव्हा अशा वेळी बोलण्यासारखे दुसरे चांगले विषय शोधून काढावसं तिला वाटलं तर त्यात काही नवल नाही. स्वतःशी हसून तिच्याकडे दुर्लक्ष करीत मी पुन्हा टेलिव्हिजन पहाण्यात गुंग झालो. "वरं का जॉर्ज..." हातातली सुई पूर्ण करीत तिनं जरा मोठ्यानेच सुरवात केली. मी तिच्याकडे वळून पाहिलं. टेलिव्हिजन पहाणं, गप्पा मारणं आणि विणकाम करणं अशी त्रिविध कामं एकाच वेळी चुका न करता करणाऱ्या माझ्या बायकोचं मला कौतुक वाटतं. टेलिव्हिजनवरची दृष्टी न काढता मी विचारलं,

"काय म्हणत होतीस जेन?..."

आता विचारल्यावर पटकन् उत्तर दिलं तर ती बायकांची जातच नव्हे. माझं तिच्याकडे लक्ष आहे असं समजताच तिनं सुई-वरले टाके मोजण्यास सुरवात केली आणि थोड्या वेळानं पवित्रा घेऊन म्हणाली,

"आज कॅथी आली होती दुपारी..."

सर्व माणसं सोडून आज नेमकी कॅथी हिच्याकडं यावी ह्यासारखं माझं दुसरं दुर्दैव नाही. 'आज कॅथी आली होती' ह्या वाक्याला माझ्या दृष्टीनं फार मोठा अर्थ आहे. कॅथी आमच्याकडे येते ते आमच्या घरा-तलं समाधान हिरावून नेण्यासाठी. आमच्या-मधल्या 'उणेपणा'ची जाणीव करून देण्या-साठी. आमच्याकडे काहीतरी कमी आहे हे दाखवून देण्यासाठी. आमच्यापेक्षा चांगला 'सोफासेट' घेतला म्हणजे कॅथी आमच्या-कडे हटकून येते. फरेडी आणि कॅथी कुठेतरी स्पेन इटलीसारख्या ठिकाणी सुट्टीला जाणार असले आणि विशेषतः आम्ही इथेच कुठेतरी सुट्टी घाल-वणार असलो म्हणजे ती बातमी आम्हाला मिळाल्याशिवाय रहात नाही. फार काय कुठे







अनुक्रमणिका



तरी 'सेल्'मध्ये जेनपेक्षा जास्त चांगला आणि स्वस्त 'टी-सेट्' मिळाला म्हणजे त्याचं पहिलं उद्घाटन आमच्यातर्फेच होतं. परवा फरेडीनं नवी 'कोर्टीना' घेतली त्यादिवशी कॅथी जेनला सांगून गेली, "आहे महाग. पण घे म्हटलं. नवऱ्याची हौस आपणच पुरवायला नको का?..." आता ही गोष्ट खरी नाही. स्वतःची हौस स्वतःच पुरवून घ्यायला फरेडी समर्थ होता. आजपर्यंत कोणतीच गाडी त्यानं दोन वर्षांपेक्षा जास्त दिवस वापरली नाही. पहिली गाडी विकून दुसरी घेणं, फायदा करून, हा तर त्याचा आवडता उद्योग होता; पण कॅथी असं म्हणून गेली आणि त्या दिवसापासून मी इतकी वर्षं वापरत असलेली 'ऑस्टिन' जेनच्या मनातून एकदम उतरली. थोडक्यात काय तर स्वतःकडे काय नवीन वस्तू घेतली हे सांगण्यापेक्षा आमच्याकडे काय नाही हे दाखवून देण्यासाठी कॅथी आमच्याकडे येते, हे न समजण्याइतकी माझी बायको भोळी नाही. तशी ती सहसा कुणाची बरोबरी करीत नाही. चार बायकांकडे आहे म्हणून आपल्याला हवं असा हट्ट धरत नाही पण कॅथी येऊन गेली की तिचं मनःस्वास्थ्य बिघडतं आणि ती विचार करू लागते, "जॉर्ज फरेडीपेक्षा जास्त पैसे मिळवतो. तरी मला परवडत नाही ते कॅथी कसं आणू शकते?...परवाच तर त्यांनी मोठी गाडी घेतली. त्याआधी घराचं 'डेकोरेशन' झालं. आता काय 'सन्-हाऊस' बांधणार आहेत म्हणे...कसं जमतं सगळं?....कॅथी नोकरी करते पण म्हणून काय झालं?...तीन मुलं आहेत घरात. शिवाय सगळीकडे हिंडतात-फिरतात. डिनर्..डान्स...आऊटिंग..चालूच असतं नेहमी..." आता जेनचं म्हणणं सर्वस्वी खरं नाही. फरेडीची तीनही मुलं शाळा सोडून नोकरीला लागली होती. तशा त्यांना काही जबाबदाऱ्या नव्हत्या. या उलट आमची मुलं नुकतीच 'नर्सरी' सोडून शाळेच्या चौकटीत अडकली होती. मुलांनी काहीतरी शिकावं अशी अपेक्षा बाळगणाऱ्या मला अजून त्यांच्यावर बराच खर्च करायचा होता. आणि तरीही जेनची हौस पुरवायला मी काही कमी केलं नव्हतं; पण जेनचं दुःख निराळंच होतं,

"माझा नवरा कॅथीच्या नवऱ्याचा बॉस असून सुद्धा शेवटी कॅथीचाच वरचढपणा! का असं?...फरेडी जॉर्जपेक्षा जास्त कर्तबगार...चलाख आहे म्हणून!... ही जेनच्या मनाची रुखरुख होती. मला फरेडीसारखं बनता येत नाही हे तिच्या मनाचं दुःख होतं. आणि म्हणूनच 'आज कॅथी येऊन गेली दुपारी' हे वाक्य ऐकताच मी घाबरलो आणि नुकताच घडलेला एक प्रसंग मला आठवला.

"एखादं मिनिट वेळ काढशील का जॉर्ज?" माझ्या टेबलाजवळ येत फरेडीनं विचारलं. अतिशय उद्योगात आहे असं दाखवीत मी टेबलावरल्या कागद-पत्रांची उलटापालट केली. उगाचच काहीतरी शोधत राहिलो आणि एका पत्रावर सही करता करता मध्येच त्याच्याकडे पाहिलं.

हातात किल्ल्या खुळखळत कोट घालून तो बाहेर जाण्याच्या तयारीत उभा होता.

"चल–" तो म्हणाला.

चष्म्याच्या भिंगांवरून मी त्याला न्याहाळून घेतलं. त्याच्या चेहऱ्यावर विशिष्ट प्रकारचं हासू होतं. त्या हसण्यातून कोणताही अर्थ निघाला असता. त्यानं कुणाला फसवलेलं असलं किंवा कुणाचं भलं केलेलं असलं, त्याच्या मनात काही वाईट विचार चालले असले किंवा समोरचा माणूस किती मूर्ख आहे असं त्याला वाटत असलं, फार काय कुणाचं काही वाईट झालेलं ऐकलं तरीसुद्धा त्याच्या चेहऱ्यावर हेच हासू मी कितीतरी वेळा पाहिलं आहे. त्याच्या ह्या असल्या हसण्याचा नक्की अर्थ सांगणं कठीण.

"चल, पाच मिनिटं जाऊन येऊ." तो पुन्हा म्हणाला. पाच मिनिटं म्हणजे चांगला तास-दीड तास हे मी ओळखलं. अशा वेळी कुठं, काय असले प्रश्न त्याला विचारण्यात अर्थ नसतो. मी घड्याळात पाहिलं. ऑफिस सुटायला फार वेळ शिल्लक नव्हता आणि माझी गाडी दुरुस्तीला टाकल्यामुळं मला फरेडीबरोबर जायलाच हवं होतं. टेबलावरल्या कागदांची जुळवाजुळव करून मी उठलो आणि त्याच्या मागं जाऊ लागलो. गाडीचं दार ओढून घेत मी विचारलं, "कुठे?..." तो काही बोलला नाही. पहिल्या वळणावरून गाडी वळल्यावर त्यानं खिशात हात घातला आणि एक हिरव्या रंगाची पट्टी माझ्यासमोर धरली.

तिच्याकडे पहात मी उद्गारलो, "काय म्हणतोस! खरंच?" त्यानं उलट प्रश्न केला, "किती असं वाटतं तुला?"

"किती?....

"अंदाज कर.

"पहिला का दुसरा?

"अर्थात पहिलाच! किती मूर्खासारखा प्रश्न विचारला मी अशा अर्थानं त्यानं उत्तर दिलं.

"बरेच असतील..."

"एकशे पन्नास! माझ्या हिशेबाप्रमाणे..." त्यानं विजयी मुद्रेने माझ्याकडे पाहिलं.

"खरंच?..."

"खोटं वाटतं तुला..?"

"नाही. तुझ्या बाबतीत काहीही खरंच वाटतं." आणि ते खरं होतं. फरेडीच्या बाबतीत सगळं खरंच वाटायचं. खोटचा सांगितलेल्या गोष्टीही खऱ्या वाटाव्यात अशी त्याच्या बोलण्यात काहीतरी जादू होती. एखादी गोष्ट मग ती अतिशय महत्त्वाची असो वा अगदी मामुली असो ती सांगण्याची त्याची पद्धतच निराळी.

दुसऱ्या महायुद्धात सैन्यात भरती झाला होता तेव्हाची एक गोष्ट तो नेहमी सांगतो. युद्ध संपल्यानंतरचे दिवस होते. अजूनही काही पलटणी ब्रह्मदेशात अडकून पडल्या होत्या. सगळीकडे रोगराई आणि महागाई पसरली होती. ब्रह्मदेशातल्या कुठल्यातरी एका खेडचातून हे चार-पाच शिपाई अर्धपोटी भटकत होते. जवळ विकत घ्यायला काहीही नव्हतं. फिरता फिरता त्यांना एक मासेविक्या दिसला. पाच जणानी काहीतरी बेत करून एकमेकांना डोळे घातले. चौघेजण थोडे दूर उभे राहिले आणि फरेडी पुढ गेला. मासेविक्याशी भावाबद्दल तो घासाघीस करू लागला. थोडा वादविवाद करता करता त्यानं पटकन् टोपलीत हात घातला आणि मूठभर मासे घेऊन पळत सुटला. तेव्हा त्या तसल्या महागाईच्या वेळी एक मासाही लाखमोलाचा. साहजिकच मासेविक्या त्याच्यामागे धावत सुटला. थोडे लांब गेल्यावर फरेडीनं त्याच्या अंगावर मासे फेकले आणि तो एका गल्लीत पसार झाला. मासेवाला माघारी येऊन पहातो तो टोपली गायब झालेली! अद्‌भुत कथेप्रमाणं आम्ही कथा नेहमी ऐकतो. आणि इंग्रजी भाषेशिवाय दुसऱ्या कोणत्याही भाषेचं ज्ञान नसलेल्या फरेडीनं ब्रह्मी भाषेत मासेविक्याशी भावाबद्दल घासाघीस कशी केली हा साधा प्रश्न विसरून जातो.

मी फरेडीकडं पाहिलं आणि पहाता पहाता गंभीर होत विचारलं,

"एका प्रश्नाचं उत्तर देशील?..."

"बोल."

"तू मला वचन दिलं होतंस?"

"हो," तो हसला; "आणि ह्या वेळी ते मी पाळलं."

"म्हणजे? मग हे काय?..." तो कागदाचा तुकडा त्याच्यासमोर धरत मी विचारलं. त्यानं मुकाटयानं चिठ्ठी परत खिशात टाकली. मी पुन्हा म्हणालो.

"फरेडी हे बरं नाही. अशा प्रकारे तू किती पैसे घालवतोस ते तुला समजत नाही. कोणतंही व्यसन शेवटी वाईटच."

संथपणे तो उत्तरला, "आयुष्य धावरत धावरत जगणारांना व्यसनं वाईट दिसतात. पण खरं सांगू का? हे पैसे कधी वाया जात नाहीत. एखाद्या धंद्यात पैसे गुंतवत जावं ना फायदा होईल या आशेनं?...."

त्याचं ते उरफाटं तत्त्वज्ञान मला चांगलं पाठ होतं. त्याचे आणि माझे या बाबतीत कितीतरी वेळा वादविवाद झाले होते. माझ्या दृष्टीनं घोडचावर पैसे लावणं काय, पैसे लावून पत्त खेळणं काय, फुटबॉल पूल करणं काय किंवा 'बिंगो' खेळणं काय सगळे पैसे घालविण्याचे धंदे. दुसऱ्या कोणत्याही मार्गानं आयुष्य चांगल्या प्रकारे जगता येईल असं मला वाटे. या उलट काहीतरी गमावण्यात आणि मिळेल अशा आशेनं आणखी गमावत रहाण्यात फरेडीला आनंद वाटे. त्याचे सगळे विचार माहीत असल्याने त्याला मधेच अडवीत मी म्हणालो, "शेवटी जुगारच तो!"

"हो, जुगारच." फरेडी शांतपणे उत्तरला, "तसं पाहिलं तर आयुष्य हाच एक मोठा जुगार आहे...!" फरेडीनं माझ्याकडं पाहिलं. त्याला हसू आलं. असं काही बोलण्यात अर्थ नाही हे त्यानं ओळखलं. तो पुढे म्हणाला,

"पण तरीसुद्धा तुझं ऐकलं यावेळी...

"काय ऐकलंस?...

"घोडचावर पैसे लावले नाहीत."

"मग?....

"कुत्र्यावर!"

हे उत्तर त्याच्या तोंडीच शोभणारं होतं. दुसरा कोणी असता तर 'मूर्ख आहेस' म्हणून गप्प बसलो असतो; पण फरेडीला मूर्ख म्हणण्याचीही सोय नव्हती. म्हणालो असतो तर त्याचं ते ठराविक हासू त्यानं अशा तऱ्हेनं माझ्याकडं फेकलं असतं की मलाच अपराध्यासारखं वाटावं.

"मग आता काय कुत्र्याच्या नावानं वचन घेशील?...

"नाही. तशी वचनं द्यायला माझी काहीच हरकत नसते, पण पाळीन याची खात्री नाही." तो हसला. हसता हसता गंभीर होत म्हणाला,

"तुला समजायचं नाही ते जॉर्ज. इतके वर्षं घोडचावर पैसे लावत आलोय. पण तसे कधी गमावले नाहीत. पाच-पन्नास जमेच्याच बाजूला असेन मी. तुला आठवतंय मागची 'डर्बी'? माझा घोडा पहिला आला होता त्यावेळी. आता 'स्टेक् फार मोठा नव्हता' नाहीतर सहज दोन-अडीचशे गोळा केले असते मी आणि त्या आधीची..." मिळवलेल्या घोडचांची यादी तो मला देत होता पण गमावलेल्या घोडचांची यादी किती मोठी आहे हे मला माहीत होतं.

"इतके वर्षांची सवय आहे पण कधी गमावलं नाही. पण.."

"काय?"

"गेल्या पाच-सहा महिन्यात काय झालंय कुणास ठाऊक, माझं काही 'लक्' लागत नाही घोडचावर. पिगट् असो, हचिसन् असो वा जॉन्सन असो. कोणताही जॉकी असला तरी माझा घोडा मागे पडलाच म्हणून समजा. ओळीनं दहा वेळा हरलो आणि ठरवलं की बस्स. आता घोडचावर म्हणून पैसे लावायचे नाहीत."

"मग?..."




अनुक्रमणिका

"वरोवर चार महिने गेले आणि एक दिवस वाटू लागलं घोड्यावर नाही तर नाही. कुत्र्यावर का लावू नये ?... तसा कुत्र्यावर कधी खेळलो नाही मी."

"हं ?...."

"गेल्या दोन महिन्यात चार वेळा लावले आणि ओळीनं जिंकलो. बेटिंग ऑफिसमधला माणूस म्हणालासुद्धा, "आता पुन्हा जिकलंस तर इथे पैसे लावायला पुन्हा येऊ नकोस कृपा करून !" आणि तो मोठ्याने हसला.

त्या दिवशी आम्ही बेटिंग ऑफिसमधून वरोवर एकशेचाळीस पौंड पंधरा शिलिंग गोळा केले. पैसे खुळखुळत फरेडी घरी गेला आणि नेहमीच फरेडीच्या कर्तबगारीबद्दल अतिशय कौतुक करणाऱ्या जेनपासून मी हा प्रसंग लपवून ठेवला.

तेव्हा कॅथीनं आज सारा पराक्रम जेनला वर्णन करून सांगितला असेल अशी खात्री वाटून मी विचारलं,

"मग काय म्हणत होती कॅथी ?....

"कधी कधी कॅथीचं कौतुक वाटतं जॉर्ज ..." माझ्या प्रश्नाला उत्तर आलं. माझी बायको सरळ विचाराची म्हटली तरी बोलण्यातला गनिमी कावा तिला छान जमतो.

तसं पाहिलं तर कॅथीचं मला कधीच कौतुक वाटत नाही. सदैव कशाचा तरी ध्यास घेऊन जगणारी असमाधानी बाई म्हणून कधी कधी मला तिची कीव येते आणि चार लोकात स्वतःच्या शहाणपणाचा अभिमान मिरविल्यावद्दल कधी कधी राग येतो. तसं पाहिलं तर जीवनात कोणतंच काम तिनं नीट केलं नाही. तीन मुलं आहेत. दिवस गेले तशी मोठी होत गेली. फरेडी वरे पैसे मिळवतो म्हणून बऱ्यापैकी कपडे मिळाले. चार चैनीच्या वस्तू मिळाल्या; पण 'आई' म्हणून कॅथीनं स्वतःचं कर्तव्य किती वजावलं याची मला नेहमीच शंका येते. मोठ्या मुलाची बुद्धी बरी असूनही 'शिकण्यात काही अर्थ नाही' असं म्हणून त्यानं लौकर शाळा सोडली. दुसरा जिमी अकरा वर्षाचा असल्यापासून चोरून सिगरेट ओढताना मी पहातो आहे. सर्वात मोठी मुलगी कॅरल् 'कुमारी माता' वनण्याची चिन्हं दिसू लागली आहेत आणि 'आजच्या मुलांना काही सांगण्याची सोय नाही' असं म्हणून कॅथीनं सर्व जवाबदाऱ्या अंगावाहेर टाकल्या आहेत. घरात उंची सामान भरलं आहे पण सगळं कसं बागेतून तोडून आणलेली ताजी-टपोरी फुलं कोपऱ्यात रचून ठेवल्यासारखं. पार्टी करण्याची अतिशय हौस आहे पण त्यातही कुशल म्हणता येणार नाही.

उलट कौतुक करण्यासारखा आहे फरेडी. त्याच्यामध्ये अनेक दुर्गुण आहेत आणि तेच त्याच्या व्यक्तिमत्त्वाची विशेष अंगं होऊन बसले आहेत. उदाहरणार्थ उसने घेतलेले पैसे तो सोइस्करपणे विसरून जातो. मागितलेच तर मिस्किलपणे हसून परत करतो; पण ऐनवेळी पैसे जर कोणी देत असेल तर तो फरेडीच. कोणत्या वेळी जवळ पैसे बाळगावेत हे त्याला चांगलं समजतं.

माझी 'ऑस्टिन' घेतली तेव्हाची गोष्ट. सहज फिरता फिरतां एका गराजमध्ये गाडी विकाव दिसली. गंमत म्हणून आत शिरलो. फरेडीनं सराईतासारखं न्याहाळून-पारखून पाहिलं. परीक्षा केली. गाडी फिरवून आणायला लावली आणि त्याचं मन गाडीवर बसलं. माझ्या कानाशी लागला, "बघ, माल चांगलाय. शंभरानं कमी करायला लावीन. जमला तर सुरेख सौदा होईल." गाडीची पारख करावी तर फरेडीनंच. हजार-बाराशेच्या मालाकडं अशा नजरेनं पाहिलं,खिशात एक पेनीही नसताना अशा बादशाही थाटात बोलेल की विकणाराला वाटावं, "उगीचच एवढी किंमत लावून चांगलं गिऱ्हाईक बुडवणार आपण."

"पण पैशाचं काय? माझ्याजवळ आता काहीच नाही." मी हलकेच म्हणालो.

"इतकी साधी गोष्ट? ते काम माझ्याकडं लागलं." अशा अर्थानं तो हसला आणि त्या बैठकीला नव्वद पौंड कमी करायला लावून त्यानं डिपॉझिटसाठी चेक लिहून सौदा पूर्ण केला.

पण याचा अर्थ फरेडी सगळ्याच बाबतीत इतका विश्वासू आहे असा मुळीच नाही. मोठ्या विश्वासानं तुम्ही कुणा टॉम-डिक-हॅरी-बद्दल फरेडीजवळ काहीतरी बोलून जाता. तुमच्याबरोबर तोही त्याला नावं ठेवतो आणि दुसऱ्या दिवशी त्या तिसऱ्या माणसाला तिखटमीठ लावून तुमची मतं सांगून मोकळा होतो.

या उलट गोड बोलून स्वतःचं काम कसं साधून घ्यावं हे त्याला चांगलं जमतं. आता कल्पना करा की कुठेतरी कमिशनवर मित्रातर्फे तुम्हाला गाडीचं टायर मिळतंय. बातमी लागताच तो तुमच्याजवळ येईल. मनातल्या हेतूचा पत्ता लागू न देता गोड बोलेल. तुमची स्तुती करील. सहज करता आलं तर एखाद्यासाठी एखादं चांगलं काम तुम्ही करता असं म्हणेल आणि बोलता बोलता मूळ विषयाला हात घालील. ह्यावेळपर्यंत तुम्ही त्याच्या लाघवी बोलण्याला फशी पडलेले असता आणि स्वतःबरोबर त्याच्यासाठीही एक 'टायर' घेऊन येता.

वेळप्रसंगी कुणालाही तो फटकन् काहीतरी बोलून ही जातो. परवाचाच एक प्रसंग पहा. फरेडीची कोणी दूरची मेहुणी आली होती मिस् व्हाईट नावाची. आम्ही तिघंजण गप्पा मारत होतो. फरेडीची मुलगी कॅरल 'ड्रींक्स्' तयार करत होती. काहीतरी फरान्स-मधल्या निवडणुकीवर गप्पा रंगल्या होत्या. आमच्या समोरच्या खुर्चीवर मिस् व्हाईट बसली होती. आता गंमत पहा. खुर्ची उताराची आणि मिस् व्हाईटनं 'मिनी-स्कर्ट' घातलेला. पायावर पाय टाकून बसलं तरी दिसू नये इतपत दृश्य दिसत होतं. बघावं तरी पंचाईत न बघावं तरी पंचाईत. आम्ही दोघंही मोठ्या अडचणीत पडलो होतो. बरं, मुलगी चांगली विचारपूर्ण बोलत होती. तेव्हा तिच्याकडं न बघणंही शक्य नव्हतं. अशा अवस्थेत थोडा वेळ गेल्यावर फरेडीनं चटकन् हातातलं वर्तमानपत्र तिच्याकडे टाकलं आणि तो हसून म्हणाला,

"कृपा करून पायावर ठेवलंस तर मला बोलायला मोकळेपणा वाटेल!" सुशिक्षित, सभ्य मुलीला असं सांगणंही साधी गोष्ट नाही. माझी खात्री आहे की, मिस् व्हाईट फरेडीचं पुन्हा तोंडही पहाणार नाही. पण कोणाही स्त्रीला असं सांगावं का न सांगावं हा मुद्दा बाजूला सोडला तरी असं सांगण्याचं धैर्य फक्त फरेडीमध्येच आहे.

पण याचा अर्थ तो बायकांशी तुटकपणे वागतो असा मुळीच नाही. उलट सर्व स्त्रीवर्गात तो अतिशय प्रिय आहे. आमच्या ऑफिसमधल्या सर्व बायका मोठ्या विश्वासानं फरेडीशी गप्पा मार-तात. कोणत्या बाईचं आपल्या नवऱ्याशी पटत नाही, कोणती बाई नवऱ्याला दाबात ठेवते, कोणती मुलगी कोणा पुरुषाबरोबर फिरते ह्या सर्व बातम्या फरेडीला आपोआप पुरवल्या जातात. स्त्री-वर्गाला खूष कसं ठेवावं याचं कसब त्याला छान साधलं आहे. आमच्या घरी आला म्हणजे तो जेनची न चुकता चौकशी करतो. जेनचं केव्हा डोकं दुखत होतं वा तिला केव्हा सर्दी-खोकला झाला होता हे त्याच्या लक्षात असतं. तो तिला डॉक्टरकडे जाण्याचा सल्ला देतो. या कामात बायका कशा हलगर्जी असतात यावर एक व्याख्यानही देतो आणि जेन फरेडीवर खूष होऊन जाते.

एखाद्या पार्टीला गेलं की स्त्रीवर्गात तो अगदी मोकळेपणाने फिरतो. पार्टीला गेलेला फरेडी हा अगदी वेगळा असतो. अशा वेळी तो आपला ठेवणीतला सूट घालील. 'टायपीन' लावायला विसरणार नाही. मुद्दाम आदल्या दिवशी केसांना रंगाचा एक 'टच्' देईल. अंधूक पण मादक वास येईल इतपत कुठलसं अत्तरही लावील. पांढरा-स्वच्छ रुमाल खिशातून अर्धवट डोकावत ठेवील. चेहऱ्यावर गोड स्मित उमटवील. अशा थाटात तो कमालीचा तरुण वाटतो. सहज बोलता बोलता एखाद्या बाईच्या केशरचनेचं वा ड्रेसचं कौतुक करतो. एखादीच्या सौंदर्याची लघळपणा न वाटेल इतपत तारीफ करतो. मोठ्या आदबीनं त्यातल्या त्यात सुंदर स्त्रीला नाचाची विनंती करतो. मधून मधून हलके-फुलके विनोद करतो. पार्टीला गेला की त्याला मोठ्या लोकात बावरायला आवडतं. गंमत म्हणजे तो त्यांच्यात मिसळून जातोही. तिथंही सर्वजण त्याला फरेडी म्हणूनच ओळखतात आणि घटकाभराच्या त्या ओळखीत 'फरेडी म्हणजे अगदी चांगला माणूस. तो होता म्हणून पार्टीला इतकी मजा आली'





अनुक्रमणिका

वगैरे स्तुतीनं तो फुलून जातो. तेव्हा बायकांशी कसं वागावं हे जर कुणाला जास्त चांगलं समजत असेल तर ते फरेडीलाच.

थोडक्यात काय तर फरेडी असा सर्वगुणसंपन्न आहे. तो खोटं बोलतो, फसवतो, भांडणं लावतो. वर गंमत पहातो आणि हे सर्व कोणी उघड दोष देणार नाही इतक्या शिताफीनं करतो. आपल्यामागं कोण काय बोलतं ह्याची त्याला विशेष पर्वा नसते. जेनच्या दृष्टीने फरेडी आदर्श पुरुष आहे. जॉर्ज फरेडीसारखा नाही हे तिच्या मनाचं दुःख आहे आणि म्हणूनच फरेडीसारखं होण्याची माझी इच्छा नसूनसुद्धा मला त्याचा हेवा वाटतो. तेव्हा अशा तिच्या दृष्टीनं अतिशय कर्तबगार असणाऱ्या फरेडीऐवजी कॅथीचं कौतुक करणाऱ्या जेनकडे पहात कपाळावर प्रश्नचिन्ह उमटवीत मी विचारलं, "ते का बुवा?

"किती व्याप सांभाळते कॅथी. आज काय तर 'हॅम्टन फरेण्ड सर्कल'ची मीटिंग, उद्या काय 'कम्युनिटी रिलेशन सोसायटी'ची वार्षिक सभा, परवा काय 'सिनिअर सिटिझन्स'ची सोशल फंक्शनं, पार्ट्या, डिनर, डान्स चालू असतं सारखं. सगळे उद्योग सांभाळून...." जेननं प्रस्तावना केली.

"कॅथीच्या मागं तसा काय व्याप आहे?" मला विचारावसं वाटलं; पण मी गप्प बसलो. जेन जेव्हा कॅथीबद्दल चांगलं बोलते तेव्हा तिला विरोध करण्यात अर्थ नसतो. अशावेळी कॅथीनं तिला कुठेतरी पार्टीचं वा सोशल फंक्शनचं आमंत्रण दिलेलं असतं. म्हणून मी जेनला साथ केली,

"खरंच. मलाही कधी कधी कॅथीचं कौतुक वाटतं. सगळ्या उलाढाली तिला कशा जमतात ते तिचं तिलाच ठाऊक. खरं सांगायचं जेन, तर कॅथीसारखी माणसं आहेत म्हणून जगातले सगळे व्यवहार सुरळीत चालले आहेत."

माझ्या बोलण्यात उपरोध किती आहे हे पहाण्यासाठी जेननं मान वर करून पाहिलं आणि ती म्हणाली,

"खरंच जॉर्ज. शेवटी आपल्यासारखी माणसं नुसती शोभेला. तेवढंही आपल्याला जमत नाही कधी कधी."

"म्हणजे? आता जेननं कुठला पवित्रा टाकला असं वाटून मी विचारलं.

"मागच्या वेळचंच पहा. तुझ्या ऑफिसच्या सोशल क्लबचं डिनर होतं. जमलं का आपल्याला जायला?"

"पण तेव्हा मुलं आजारी होती जेन...."

"तेच तर म्हणते मी. सगळ्या अडचणी आपल्याच वाट्याला येतात...."

जेनच्या बोलण्याचा रोख ओळखीत मी विचारलं,

"जाऊ दे ते. आता कुठलं कॅथीनं आमंत्रण दिलंय?

"हॅम्टन फरेण्ड सर्कलचं सोशल आहे पुढल्या शनिवारी. येशील का म्हणून विचारत होती. दोन तिकिटं सुद्धा आणून दिली आहेत तिनं. किती आठवणीनं बोलावते नेहमी....."

नाही म्हणायचं धैर्य माझ्यात नव्हतं. मागच्या चुकलेल्या पार्टीची भरपाई आणखी दहा पार्ट्यांनीही होणार नव्हती. माझ्या चटकन मिळालेल्या होकारावर खूप होऊन जेन मला सर्व माहिती पुरवत होती. कॅथी आणि तिच्या मैत्रिणींनी 'सोशल' कसं 'अॅरेंज' केलं, त्यासाठी 'हॅम्टन मेथॉडिस्ट चर्च हॉल' मिळवायला कसा त्रास पडला, किती पैसे गोळा झाले. 'बार'कडे कोण बघणार आहे, सॉसेजरोल, पेस्ट्रीज् वगैरेचं कॉन्ट्रॅक्ट कोणाला दिलं आहे, आणि फरेडी त्याचा सेक्रेटरी असल्यानं सर्व काम बघता बघता त्याची कशी धांदल उडते, चर्च हॉलमध्येच पार्टीच्या रात्री 'जंबल सेल' भरवण्याची कल्पना कुणी सुचवली, त्यात मिळालेले पैसे कोणत्या 'चॅरिटी'ला देणार आहेत, एक ना दोन जेनची अखंड बडबड चालू होती आणि मी तिच्याकडे सोईस्करपणे दुर्लक्ष करीत होतो.

× ×

दरवेळी पार्टीला जाताना मी कोणता सूट घालावा याबद्दल जेनचा आणि माझा एकदा तरी वादविवाद होतो. आता तसं पाहिलं तर मला आहेत तीनच सूट. त्यात निवड ती कसली करायची? हाताला येईल तो घालायचा असं माझं धोरण. पण "जॉर्ज, तुझा तो निळा सूट का नाही घातलास?" घातलेल्या सुटाकडे नापसंतीनं पहात आजपर्यंत जेन विचारायला विसरली नाही आणि तिला आवडला नाही म्हणून घातलेला सूट मी कधीच बदलला नाही. आजही फरेडीसमोर आमचा तोच वादविवाद झाला, ".....बायकोनं दिला मी घातला. जास्त पसंती मी कधी करत नाही." फरेडीनं उगाचच स्वतःचं मत देऊन टाकलं. "खरं म्हणजे जॉर्जला आता नवीन सूट करायलाच झालाय. तुझा छान दिसतोय. कुठून घेतलास?" जेन उगीचच चौकशा करत होती आणि मी दुलक्ष करीत होतो. स्वतःचा नवरा सोडून बाकीचे पुरुष आणि त्यातून विशेषतः फरेडी जेनला नेहमीच चांगला दिसतो.

'टाय'ची गाठ घट्ट करता करता मला एकदम माझ्या जुन्या 'कार'कोटची आठवण झाली. चार वर्षांपूर्वी घेतला म्हणून त्याला जुना म्हणायचं. बाकी तो होता अगदी जसाच्या तसाच. सुरवाती-







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पासू नच मला थोडासा लहान होई म्हणून मी थोडे दिवस वापरला आणि मग पुढे तो तसाच पडून राहिला. आज एकाएकी मला त्याची आठ वण झाली आणि मी विचारलं, "जेन, माझा तो कारकोट साप डेल का ग चटकन ?"

"ओ जॉर्ज, तुझं म्हणजे काहीतरीच. एवढ्या चांगल्या सुटावर कारकोट कशाला घालायचाय तुला ?"..." जेननं कुरकूर केली माझा सूट एकदम चांगला झाला. सुटावर कारकोट न घाल ण्यातलं 'लॉजिक' मला समजलं नाही. कदाचित फरेडीनं घात ला नाही म्हणूनही मी घातलेला तिला आवडणार नसेल. कुठेतरी धूळ खात पडला असेल म्हणून मी गप्प वसलो आणि आम्ही वाहेर पडलो.

× × ×

आजच्या 'हॅम्टन फरेण्ड सर्कल'च्या वार्षिक संमेलनाची शोभा काही न्यारीच होती. छतातून दिव्यांच्या सुंदर माळा सोडल्या होत्या. कोपऱ्या कोपऱ्यात रंगी-वेरंगी फुग्यांचे गुच्छ टांगले होते. एका कोपऱ्यातून मंद निळा प्रकाशझोत सोडला होता. त्या भागात 'वॉल-रूम-डान्स'ची सोय केली होती. दुसऱ्या भागात मंद तांबडा-जांभळा प्रकाशझोत सोडला होता. त्या भागात अखंड 'पॉप् म्युझिक' चालू असून तरुण मुलामुलींना मोकळेपणानं नाचता येत होतं. पलीकडे डार्टस् सारख्या पार्टी-गेम्सपण चालल्या होत्या. पुष्कळ प्रकारची 'ड्रींक्स' आणि खाद्यपदार्थ ठेवले होते. स्त्री-वर्गाच्या सुंदर सुंदर केशभूषा आणि आकर्षक पोशाख, पुरुषवर्गाचं मऊ-

मुलायम हास्य आणि मद्याचा धुंद सुगंध ह्यांनी सगळं वातावरणच कसं प्रफुल्लित, सैल आणि तरीही आनंदाच्या कोलाहलाचं झालं होतं. चर्च हॉलला लागून असलेल्या एका खोलीत एक छोटासा 'जंबल सेल'ही भरवला होता. जंबल् सेल म्हणजे जुना वाजारच. पण आज तिथेही एक प्रकारचा रसरशीतपणा आला होता. विविध प्रकारच्या सुंदर संदर वस्तू होत्या. सेलमध्ये मिळालेले पैसे 'चॅरिटी'ला किती जातील आणि किती पैसे आमचं 'फरेण्ड सर्कल' मधल्या मधेच दडपून ठेवील अशी एक वेडी कल्पना माझ्या मनाला शिवून गेली.

पार्टी संपल्यावर चर्च हॉलवाहेर फरेडीची वाट पहात मी उभा होतो आणि पार्टीचा उपभोग मनसोक्त घेऊन दमून-सुखावून जेन माझ्या शेजारी उभी होती. तिच्याकडं समाधानानं पहात मी विचारत होतो, "चांगली झाली नाही पार्टी ?"..."

"खूपच छान. कितीतरी दिवसांनी वेळ इतका मजेत गेला..."

जेनचा सुखावलेला, तृप्त, धुंद चेहरा पाहून मला वरं वाटलं. नाही तरी तिच्या हौसेसाठीच तर मी आलो होतो.

"वॅण्ड चांगला होता नाही ?....वरेच पैसे घेतले म्हणे; पण त्यामुळे खूप गंमत आली. खूप लोक आले होते त्या मानानं नाही ? आपणही असंच जायला पाहिजे वरचेवर. नाहीतर आयुष्यात काय मजा आहे दुसरी ?....." जेनच्या वोलण्यावर हसून मी म्हणालो,

"आणि 'जंबल् सेल'ही चांगला होता. उगाच काही तरी जुनाट वस्तू नव्हत्या ठेवल्या. निराळीच शोभा आली त्यामुळं...."

"हो खूप छान झाला सेल वाटला त्यापेक्षा. सगळी फरेडीची कल्पना वरं का. एक छान तांब्याची 'वॉल प्लेट' होती तिथं, खूप आवडली होती मला. पण दुसऱ्यानं वापरलेल्या वस्तू वापरायला कसंसंच वाटतं नाही ?..."

"होय ना ! आता एखादी वस्तू 'अॅन्टिक्" म्हणून चांगली किमतवान असली तर घेईन मी; पण असल्या सेलमध्ये मलाही काही घ्यायला वरं वाटत नाही."

"चॅरिटी–वॉक्समध्ये चार शिलिंग तेवढे टाकले मी."

एवढ्यात चर्च हॉलमधून फरेडी येताना दिसला. तो जसजसा आमच्या जवळ येऊ लागला तसं मी आणि जेननं दचकून एकमेकां-कडं पाहिलं आणि आश्चर्यानं थक्क होऊन मी त्याच्याकडे पहातच राहिलो.

"माफ कर हं जॉर्ज. थोडा उशीर झाला मला वाहेर पडायला. पण सेक्रटरी म्हणून जिथं तिथं अडकून पडतो मी. अजून कॅथी वसलीच आहे कुणाशी तरी गप्पा मारत...."

फरेडी काय वोलतोय ते मला कळतही नव्हतं. माझं सगळं लक्ष केंद्रित झालं होतं ते त्याच्या 'कारकोट'कडं.

अगदी माझ्या कोटासारखाच ! चार वर्षांपूर्वी घेतलेल्या ! !

एवढ्यात कॅथीही आम्हाला येऊन मिळाली. मी जेनकडं





अनुक्रमणिका

पाहिलं. घावरत घाबरत हलकेच ती मला म्हणाली, "हो. मी सेल-साठी देऊन टाकला तू घालत नाहीस म्हणून....."

मी स्वतःला सावरलं आणि चेहऱ्यावरले सर्व भाव लपवून अगदी सहजतेनं फरेडीला विचारलं, "किती सुरेख आहे कोट! कुठं घेतलास?"

आणि आता कॅथीही आमच्यावरोवर फरेडीकडं पाहू लागली.

डोळ किंचित् किलकिले करून फरेडीनं विचारलं,

"आवडला तुला? केवढचाला घेतला असेल?....!!"

"पंधरा–वीस सहज पडले असतील...." नकळत मी खरी किंमत सांगून गेलो.

फरेडी हसला आणि हलकेच म्हणाला, "खरं सांगू?.... तसा फुकटच मिळाला तो!....."

"म्हणजे?...."

"आजच्या सेलच्या सामानात दिसला. चांगला वाटला. अगदी कोराकरकरीत. घालून बघितला आणि इतका छान झाला की काढावासाच वाटेना...."

"मग?....."

"विचार केला, एवढा चांगला कोट कोणीही पटकन् घेऊन टाकेल. त्यापेक्षा आपण का ठेवू नये?.... म्हणून उचलला आणि बाजूला काढून ठेवला....."

"फरेडी, म्हणजे तू चोरलास?...." कॅथीचा चेहरा अपराध्या-सारखा झाला होता.

फरेडी पुन्हा मिस्किलपणे हसला आणि म्हणाला,

"मला तू अजून ओळखलं नाहीस कॅथी. चॅरिटीच्या वस्तू चोरीन कशा?"....

"मग?......" मी कुतूहलानं विचारलं.

"मनात विचार केला, जंबल् सेल्मधला कोट. कितीही चांगला असला तरी पौंडापेक्षा जास्त कुणी देणार नाही. खिशात हात घातला. हाताला दहा शिलिंगाचं नाणं लागलं. तसंच काढून 'चॅरिटी'च्या बॉक्समध्ये टाकून दिलं. तसा सचोटीशिवाय कोणताच व्यवहार करत नाही मी!....."

फरेडी सांगत होता आणि जेनसमोर कॅथीचा चेहरा पहिल्यां-दाच शरमिंदा होत होता. मी जेनकडं पाहिलं, उभ्या आयुष्यात फरेडी प्रथमच तिच्या मनातून उतरला होता आणि त्या आनंदात मला न सांगता कोट देऊन टाकल्याबद्दलचा माझा राग कुठल्या कुठं पळून गेला होता.....!

● ● ●



# बदलत्या लंडनमधील



# मराठी विश्व

—श्रीनिवास पंडित, लंडन

...आजीबाईकडे साईबाबा मंदीर स्थापले, सेंट्रल लंडनमध्ये कृष्ण उभा राहिला ... आम्ही नाही केला, बीटल्सनी केला ... त्याचे इंग्रजी भक्त धोतरात, बाराबंदीत, गळ्यामध्ये रुद्राक्षांच्या माळा घालून झांजा वाजवीत चालले आहेत...



इकडे यायचे ठरले आणि पु. लं. नी वर्णन केलेल्या सर्व प्रसंगांतून पार पडून साठएक लोकांच्या लव्याज-यानिशी सांताक्रूझ गाठले. आजारपणात, रखरखीत उन्हात, अधाशासारखे खाऊन घेण्यात, रडण्यात अन् हसण्यात ते दिवस गेले. लोकांना ज्यासाठी हसत होतो, ते सुद्धा मेव्हण्यांच्या आग्रहाने करून घेतले.... विमानतळावर हार घालून घेतला. कारण काही का असेना, लग्नानंतर गळ्यात हार घालून घेण्याची ती शेवटची संधी होती. फोटो काढणे, मिठ्या मारणे, उपदेश ऐकणे, निरोप पुनः पुनः घेणे हे सर्व केले. "केवढी कर्तबगारी केली शिरक्याने" अशा काहीतरी भावनेचे चित्र स्त्रियांच्या डोळ्यात पहात कस्टमरूममध्ये सरकलो.

मातोश्री रडत होत्या. पिताजी गहिवरले होते. चिरंजीव "दादा टॉपस्, विमानातून जाणार" ह्याच्यातच मश्गूल होते. मुलीने आरोळी ठोकली अन् आमच्या डोळ्यात पाणी येणार याची जाणीव झाली म्हणून सौ.कडे पाह्यले तर तिच्या चेहऱ्यावर, "एवढी धडपड करून चालले हो हे शेवटी; उगाचच भांडले मी त्यांच्याशी" असा काही तरी भाव दिसला अन् पाणी थांबले. एवढ्यात ट्रॅव्हेल एजंटने, "पंडितसाब चालो हवे" असे म्हणून माझा हात धरून मला वळवले अन् आपणच 'बाय बाय' म्हणून निरोप घेतला.

## मॅनर्स

लंडनला उतरण्यापूर्वी दोन वेळा टॉयलेटमध्ये गेलो. आरशात चेहरा पाहून घतला. सूट, टाय व्यवस्थित पाहून घेतले,









केस थोडेसे पोमेड लावून गच्च बसवले. स्वतःशीच 'हॅलो', 'गुड मॉर्निग', 'थँक यू' वगैरे दोनचार वेळा म्हणून पाहिले. Good manners in a nutshell ह्या पुस्तकातले जेवढे आठवता आले तेवढे आठवले. पाशिंजर उतरायला लागले अन् माझीही वेळ आली.

एमिग्रेशनची कटकट तेव्हा (जुलै १९६७) एवढी नव्हती. सुटका लवकर झाली. पण ना कस्टम ऑफिसर ना एमिग्रेशन सुपरव्हायझर, कोणीही 'गुड मॉर्निग'ला रेस्पॉन्सच देईनात. काय बोलत ते सर्व कळेना. आपलंच काही चुकलंय का, हा विचार करता करता बसमध्ये शिरलो.

रखरखते उन्ह पाह्यची सवय, फुटपाथवर भाजीवाल्या बसलेल्या पाह्यची सवय, मोटारचे हॉर्न अन् गलका ह्याची सवय— ह्या वातावरणातून बाहेर पडलेल्या जुलैतले ते लंडन बसमधून पहाताना खरोखर आल्हाददायक वाटत होते. निळे आकाश, शान्त व्यवहार, रस्त्याच्या काठची लॉन्स अन झुळझुळणारा वारा ह्या दमलेल्या जीवाला सुखावत होता.

केस कपाळावर, बॉब केलेले अथवा सत्यसाईबाबांसारखे केस ठेवलेले, रंगीबेरंगी कपडे घातलेले, गळयात माळा घातलेले न कळणारे इंग्रजी बोलणारे हे पुरुष पाहिल्यावर मला इथले मवाली असावेतसे वाटले. मला चुकल्यासारखे वाटत होते. माझा मॅनर्सचा अभ्यास. कपडे घालण्याचा अन् भांग पाडण्याचा वुकिश प्रयत्न मला गुदमरवत होता. व्हीक्टोरीयाला एक सहकारी न्यायला आले होते, त्यांना विचारले हा प्रकार काय. ते म्हणाले, हीच लेटेस्ट क्रेझ आहे. Good manners किती साली प्रसिद्ध केलेय ते घरी गेल्यावर पहाण्याचे ठरवले. मुंबईत शनिवारी दुकानांसमोर टाळया पिटत जाणारी जनता एखाद्या प्लेनमधून चुकून इकडे आली तर 'डेली मेल'मध्ये फ्रंट पेजवर जंगी चित्र येईल अन् फॅशन मॅगेझीनवाले कॅमेरे घेऊन गर्दी करतील.

## बेड–सीटर

हॉटेलात तात्पुरती सोय केली होती, म्हणून जागा बघायला सुरुवात केली. बेड-सीटर हा प्रकार काय तो समजावून घेतला. कारण बेडरूम, हॉल, स्टडी रूम, सिटींगरूम, डायनिंग रूम अशा वेगवेगळया तऱ्हेच्या रूमस् असतात हे चौपन्न साली रत्नागिरी सोडून मुंबईला आल्यानंतर विसरलो होतो. बेड–कम–सिटींग–कम–हॉल–कम–किचन–कम–बाथरूम–कम–संडास–कम–बाल्कनी नावाच्या चौसुपीत बारा वर्षे घालवल्यानंतर माणसाला रूमचे विस्मरण झाले तर नवल काय? बेड–सीटर ही तात्यामामांनी लग्नापूर्वी दादरला 'सहकार निवास'मधल्या त्यांच्या ब्लॉकमध्ये प्रेमाने राह्यला दिलेल्या खोलीची खाली कार्पेट घातलेली वहीण असते हे जेव्हा समजले तेव्हा वास्तूचा आराखडा मनाशी तयार झाला.

लोकल पेपर्समधल्या जाहिराती पहाणे सुरू झाले. इथले लोकल पेपर्स आपल्या नॅशनल पेपर्सपेक्षा मोठे असतात. नेशन मात्र आपल्या राष्ट्राच्या बगलेत राहील एवढे लहान. आपण त्याच्या मुठीत राहीलो हा झाला इतिहास!

जागा शोधता शोधता टेंपल गार्डनस् नावाच्या रस्त्यावर थडकलो. ख्रिस्तिस्थानात टेंपल असणे शक्य नाही, पण बरीचशी चर्चिस आसपास असावीसे वाटले, पण नव्हती. बाईंनी दार उघडले. इथे "आत या" म्हणण्याची पद्धत नाही. बाई पातळात होती म्हणून समाधान वाटले, कारण गेले दोन तीन दिवस स्कर्टस् पाह्यची सवय झाली होती. माझे नाव विचारले. सांगितल्यावर मराठीत म्हणाल्या, "तुम्ही महाराष्ट्रीयन का?" आणि काय विचारताय, स्वारी एकदम खूष. इंग्लंडात एवढ्या प्रेमाने मराठी बाई विचारतेय. शिवछत्रपतींपासून सर्वांचा जयजयकार केला. त्या वेळेला एवढा खुलून गेलो की तोंडातून शब्दच उमटेना. चेहऱ्यावरल्या स्वाभिमानाने अन् नाजुक स्मिताने होकार दर्शविला; पण बाई थोडासा गंभीर चेहरा करून म्हणाल्या, "तुम्हांला इथे 'गर्ल फ्रेंड' आणता येणार नाही." थर्मामीटर झटकल्यावर ताप जसा खाली उतरतो तशी महाराष्ट्राभिमानाची नशा खाली उतरली. मी स्तंभित झालो. "गर्ल फ्रेंड" ह्या संज्ञेचा अर्थ माहीत नव्हता. वरकरणी जो अर्थ लागतो तो धरून इंग्रजीतून सांगितले, "मला एकही गर्ल फ्रेंड नाही. मी अलिकडेच येथे आलो आहे. माझं लग्न झालंय. मला दोन मुलं आहेत." हे ऐकल्यावरसुद्धा बाईंच्या चेहऱ्यावर परिणाम नाही. काही दिवसांनी 'गर्ल फ्रेंड' ही भानगड समजली. इथे पुरुष लग्न झालेला असला तरी त्याला गर्ल फ्रेंड असू शकतात. नव्हे असतात. तेव्हा लक्षात आले की माझ्या उत्तरांचा बाईवर परिणाम का नाही.

प्रेमाचा आविष्कार सारखाच नजरेस पडत होता. रस्त्याच्या कडेला, ट्यूबमध्ये रेल्वेच्या फलाटांवर कुठेही एकमेकांवर चुंबनांचा वर्षाव दिसत होता, तेव्हा वाटले की ह्यांच्याकडे जागांची अडचण असावी म्हणून बाहेर पडून प्रेम करीत असतील बिचारे. पण तसे नव्हते. खरं पहाता जागांच्या टंचाईमुळे विवाहितांनी आमच्याकडे घराबाहेर पडले असते तर क्षम्य ठरले असते. नाहीतरी नळाजवळच्या बादल्यांच्या आवाजात, सत्यनारायण खालच्या वाडीत आहे हे फोनो मायक्रोफोनवरून गाण्याच्या रूपाने कोकलून सांगत असताना, घरगडी केव्हा येईल हे गॅरंटीड सांगता येत नसताना, पलिकडच्या बाल्कनीत भाचा अभ्यास करताना, बाहेरच्या गॅलरीत बिठोबा दास्ताने आपल्या बायकोशी वाद घालत असताना अन् शेजारच्या पुंडलिकांच्या आजीने ऐकू येत नाही म्हणून मोठयांदा लावलेल्या रेडिओवरच्या श्रुतिकेतले, कर्मण्येवाधिकारस्ते...ऐकताना खोलीत रोमान्स करण्याएवढे आपण अनरोमॅंटिक दुसरे काय करतो?

ह्यांच्याकडे पार्कस्मध्ये जा, ट्राफलगार स्क्वेअरमध्ये जा; दादरच्या कबुतरखान्यावर कबुतरे जशी गुटरगूं करतात तसे चालू असते ह्यांचे प्रियाराधन. उघडयावर प्रेम करण्याची कल्पनाच रुचत नव्हती. पण हळूहळू डोळयांना सवय झाली. वरळी सी फेसवर काळोख पडल्यावर दाणेवाला बिचारा आम्ही दाणे घेतो का म्हणून



## पेटीकोट लेन

### (कुणाला सांगू नका हं !)

कुठेही नवीन शहर बघावयास निघालेला मनुष्य दोन प्रकाऱच्या गोष्टी बघतो—एक बघण्यासारख्या आणि दुसरी—न बघण्यासारख्या.

लंडनचे 'Petticoat Lane Market हे दुसऱ्या प्रकारच्या वर्गात मोडणारे आहे. नाशिकचा गंगाघाट, पुण्याचा जुनाबाजार आणि मुंबईचा चोर बाजार एकत्र करून हा बाजार बनविलेला असावा.

हातगाड्यावर माल मांडून, मोठमोठ्या आवाजात, बोलणारे हे विक्रेते, आपल्या जवळच्या मालाचे अशा विलक्षण तऱ्हेने वर्णन करतात की असे वाटते, पदरचा खर्च करून केवळ तुमची सोय व्हावी म्हणूनच जवळचा माल विकतो आहे.

हल्ली हल्ली आशियाई व्यापाऱ्यांचेही स्टॉल्स् मोठ्या प्रमाणात येथे दिसून येतात.

दर रविवारी सकाळी साधारण ९ वाजल्यापासून हे मार्केट उघडते. समाजातल्या अनेक थरांतील लोक तिथे जात असतात. तियल्या वस्तू खरेदी करतात. प्रत्येकाची इच्छा मात्र एकच असते, आपणाला तिथे कुणी बघू नये.

— यशवंत माळी.

वाट पहात होता—कारण शेवटचेच त्याचे गिऱ्हाईक—पण आम्ही त्याच्या जाण्याकडे डोळे लावून बसलो होतो त्याची आठवण झाली अन् मनातून वाऱ्याची मंद झुळुक मानसिक मर्यादांवर फुंकर घालत गेली.

### मावशी

जागा मिळाली. शेजारीच मावशींकड ब्रेकफास्ट आणि डिनरची व्यवस्था झाली. श्रीमती मावशी वर्वे पूर्वाश्रमींच्या सरदेसाई घराण्यातल्या, रत्नागिरी जिल्ह्यातल्या. झालं जवळजवळ गाववाल्या, फुगारली छाती. लंडनमध्ये दररोज गरमागरम चपाती व उत्कृष्ट भाज्या प्रेमाने खायला मिळत होत्या. वजन वाढत होते.

त्यांच्याकडे आर्कीटेक्ट देवभक्त, इंजिनियर खरे, महाराष्ट्र मंडळाचे सेक्रटरी सोहनी इत्यादी 'पब्लिक' रहात होते. ग्रुपस्ना 'पब्लिक' संबोधायचे हा सुरेश भागवतानी रूळवलेला शब्दप्रयोग. सोहन्यांमुळे महाराष्ट्र मंडळाचे 'राजकारण' —मराठी माणसे एकत्र आली की राजकारणाव्यतिरिक्त कशी जगणार—मावशींच्या रुम्समध्ये चालत होते. त्यात सोहन्यांचा समज असा की कोणाला कोणतेही निश्चित उत्तर देणे हे मुरब्बी राजकारण्याचे चिन्ह नाही म्हणून गुळगुळीत बोलण्यात शर्यत. 'सोहनी जेवलेत का ?' ह्याला-सुद्धा त्यांनी सरळ 'हो' किंवा 'नाही' उत्तर दिल्याचे स्मरत नाही. खरे, कंपनीने गाडी दिल्यामुळे झोपण्याव्यतिरिक्त गाडीत असायचा. पंधरा सेंट जॉर्जेस रोडवर गाडी खाली दिसली तर वर खोलीत झोपलाय म्हणून समजावे. गाडी नसली तर स्वारी कुणाच्या तरी सोशल सर्विसमध्ये गुंतलीय म्हणून बिनधोकपणाने समजावे. सरिता करंदीकरची कमाल. वटाटेवडे त्याला दीदीकडून केन्सिगटनला घेऊन यायला सांगायची.

मावशींची तब्येत बरी नसताना बिचाऱ्या आम्हाला प्रेमाने श्रीखंडापासून चिकनपर्यंत सर्व करून घालायच्या. आजीबाईंचे नाव तिकडे सर्वांना परिचित आहे. 'मावशी' ही अशीच संस्था होती. दीदी ही तशाच आहेत. थकल्या मावशी आता.बंद केला तो कारखाना नाईलाजाने. गोल्डर्स ग्रीन ही लंडनची हिंदु कॉलनी आहे. तिथले आमचे एक स्थान इतिहासजमा झाले.

### देवळे

प्रत्येक राष्ट्राची काही श्रद्धास्थाने असतात. श्रमपरिहाराच्या क्षेत्रात इंग्लंडमधले एक ठिकाण म्हणजे 'पब'. पब म्हणजे पब्लिक बार. शुद्ध मराठीत दारू पिण्याचा गुत्ता. रत्नागिरीच्या बंदराजवळ अथवा मधल्या आळीच्या टोकाला मिऱ्या बंदराकडे जाताना नारळीच्या बागात, नारळीच्या झापांच्या टोप्या घातलेल्या झोपड्या, मांडी घालून बसलेल्या असायच्या बिचाऱ्या लोकांना सुखावत. पापी अन् भंपक लोकांनी त्याचे हत्याकांड केले अन् त्या वास्तूने शाप दिला तो गंजलेल्या रॉकेलच्या डब्यातून नवसागराच्या रूपाने बायका पोरांची हाडे तोडून स्वयंपाकघरात जाऊन स्थानापन्न झाला. लंडनच्या ह्या गुत्त्यांना, कलेची संगत समाजाने दिली. उत्कृष्ट वास्तुशिल्पाने काहींचे पुनरूज्जीवन केले. आतल्या व्यवस्थेनेच, वातावरणानेच, मन प्रसन्न होते. प्या वा पिऊ नका. किती पिता हा प्रश्न नाही. सायडर प्या, टोमाटोचा रस प्या, सरबतं प्या अथवा शँडी प्या. शँडी म्हणजे जवळजवळ उसाचा रस. कितीही तास गप्पा मारा पण "दीड शिलींगचा ग्लास घेऊन किती वेळ बसलायत" असा प्रश्न नाही.

एकटे बसतात, दुकटे बसतात, जोडपी बसतात, चारचौघे








मिळून बसतात. मनाला विरंगुळा देतात. मंद दिवे असतात, बारीक आवाजात रेडिओवरची गाणी वा रेकॉर्डस चालू असतात, खेळायला डार्ट बोर्ड असतात. भरपूर पितातही. पण कोणी रस्त्यावर पिऊन पडलेला आढळला नाही. चढलेल्याला संभाळण्याची वृत्ती. पूर्वी आपल्याकडे देवळात भेटण्याची प्रथा होती. इथे पबात भेटण्याची आहे. जिथे मने प्रसन्न बनतात त्याना 'देवळे' का म्हणू नये? "संध्याकाळी सात वाजता 'रॉयल ओकात' भेट रे" अशा अॅपॉईंटमेंटा इथे सर्रास घेतल्या जातात.

**रॉयल ओक**

हे देऊळ खरोखरच छान आहे. फार काही जुने नाही. केनवूडच्या सरदाराने त्याला भेट दिल्याचे छायाचित्र त्याच्या भिंतीवर नाही. लेन हटन बारमेडसमवेत हसतानाचा फोटो नाही–हेन्री कूपरचा चिझलहर्स्टच्या पबांत पाह्यला होता. बॅरल्सच्या आकाराची टेबले खुर्च्या नाहीत. वेलसाईज पार्कच्या झाडीत असलेल्या दहा बाय दहाच्या "थ्री बेल्स" एवढा छोटाही नाही आणि स्विस कॉटेजच्या "थ्री ननस्" एवढा मोठाही नाही. टॉटनहॅम कोर्टरोडवरच्या "मिडलंड आर्मस्"मध्ये आहेत तशा फार गोड पोरी बारमेडस् म्हणून नाहीत की लेस्टर स्क्वेअरच्या "स्वान"मध्ये टॉम जोन्सची मायक्रोफोन फुटेल एवढ्या मोठ्याने चाललेली गाणीही नाहीत. सोहोच्या "बी हाइव"मध्ये तळमजल्यात चालणारा रोमान्सही नाही. रॉयल ओक तसा थिल्लर नाही.

सीलींग उंच आहे. जागा आत खूप मोठी आहे. डार्ट बोर्ड आहे. पडदे भपकेबाज अन् कार्पेटस् रुबाबदार आहेत. भिंतीवर दोन तीन छोटीशी चित्रे आहेत. पण रॉयल ओकचे महत्त्व सजावटीमुळे नाही तर तिथल्या वातावरणामुळे. काही जागाना महत्त्व माणसांमुळे येते. नाही का? मला गुंगवायचा तो तिथे भरणारा दरबार. तो असा असायचा :

राथ अखंड उभा राहून पाईप ओढत असायचा अन् डॉ. सतीश गायघनी बसून. फाटक सर्व टेबलांजवळ फिरत होते. सोहनी, "मोऱ्याना निवडून देणे हे महाराष्ट्राच्या दृष्टीने किती जरूरीचे आहे" ते पटवून देत होता. राम दुदवाडकर रत्नागिरीच्या ताडीची आठवण काढत होता अन् हॅलिबॉड मासा खाणे तब्येतीला किती उत्तम ते मला सांगत होता. वसंता गोडबोले, बाप्या पढारकरजवळ कसली तरी पैंज मारत होता. जोशा, "समजलं ना" म्हणून, पत्ते कुठे बसवू या ते मोठ्याने विचारत होता. शशी खटखटे शाब्दिक चिमटे काढण्यात गुंतले होते आणि त्याची वंदना गाण्याची एखादी ओळ हळूचच म्हणत होती. जॅकी, गुजरच्या गप्पा ऐकण्यात रमला होता. अशोक ढमढेरे अडकित्याने सुपारी कातरत हळू आवाजात डेव्हिड एंजलसला भटले तेव्हा काय घडले ते सांगत होते. सुरशा आपले सुजरे डोळे मोठे करीत वेअरला जाण्याच्या औपचारीक भाषा अरविंद साठेजवळ करत होता. खानोलकर समोर दोन पाइंटस् असताना शेवटची दोन मिनिटे राह्यलियत म्हणून मला एक राऊंड आणायला सांगत होता आणि मी कुणाचेही लक्ष नव्हते तरी रूपारेल कॉलेजमध्ये "त्राटिका" नाटकात प्रतापरावाचे काम किती उत्कृष्ट– (?) केले ते सांगत होतो. किती धुंद होते ते चित्र?

पत्त कुठे लावायचे हे कुणाची लॅंड लेडी वॉ.... व करणार नाही यावर ठरायचे. थंडी फार. चाय फार उपयोगाची नाही, पण ऑफ लायसन्सच्या सर्व दुकानांची माहिती पब्लीकच्या ओठावर असायची.

जगातल्या सर्व विषयावर रॉयल ओकात बोलणी झाली. विनोद झाले. मंडळाची राजकारणे झाली. गाण्याच्या आठवणी झाल्या अन् थोडीशी भांडणेही झाली. राऊंडस वर राऊंडस डबल डायमंड पोटे भरत होती. राऊंड म्हणजे समजा चार माणसे पीत बसलीत तर प्रत्येकाने इतर तिघांना ड्रींक्स द्यायची. व्यवहार चोख. हिशेब तिथल्या तिथे पुरा.

घोडे लावणे अन् कुत्रे लावणे–म्हणजे त्यांच्या रेसिसवर बेट लावणे–हे इथले दुसरे विरंगुळे. पण आपल्याकडे दारू पिणे, घोडे लावणे, कुत्रे लावणे ह्यांना पापाच्या अशा कप्प्यात नेऊन बसवलंय की शिसारी यावी. लॉटऱ्यांमध्ये, रेसिसमध्ये जीवनातल्या अशा क्षेत्रात एका मर्यादेपर्यंत कैफ चढण्यात काही मजा आहे असे इथे समजतात; पण आपल्याकडे फालतू कल्पनांमुळे सोयी काढण्यात भूषण मानतात. ह्यात समाज मागे रहातो. सामान्यांचा जीवन जगण्याचा हक्क हिरावून घेतला जातो.




त्या नाचतच असतात. वस्त्रे उसवीत.
डोळे असतात उघडे टक्क. थिजलेले.
आम्ही पुढ्यात.
पापण्यांतली पेंग सावरुन
निरखीत त्यांच्या नितंबद्ध हालचाली.
डोळ्यांच्या जिभा होऊन
लसलसतात त्यांच्या प्रत्येक गोलाईवरून...
त्या नाचतच असतात.
त्या नाचतच असतात.
पॉप म्युझिकचे तीव्र स्वराघात...
गडद अंधारात धुराची वलये
आणि
जिभेवर बीअरची चव. किंचित कडवट.
एवढे असल्यावर
त्यांचे हिंदकळणारे सौष्ठव पाहून
आम्ही टाळ्या पिटतो आपसूक
(कळ्यांचे निर्माल्य होताना)—
केवळ
आमच्या अस्तित्वाची साक्ष म्हणून !
त्या नाचतच असतात—तेव्हा
त्यांना भावनाच नसतात.
तळहातावर पोट घेऊन आमच्या वासनेची कबुतरे
त्या फुलारत असतात.
द्यावे-घ्यावे एवढाच फक्त उरतो व्यवहार...
पाप-पुण्य; नीती-बीती सगळेच अविचार.
त्यांच्या कचकडी चेहऱ्यावर
तेच थरथरते निरागस हंसू-वस्त्रे उसवतांना
आणि आमच्या देहात
चितेची चंद्रचुंबी आग !!
त्या नाचतच असतात. वस्त्रे उसवीत.
डोळे असतात उघडे टक्क. थिजलेले.

—दिलीप वि. चित्रे, लंडन.

गरीब इथेही आहेत. दारूच्या पायी, रेसिस्च्या नादामुळे संसार उघळल्याची उदाहरणे इथेही मिळतील. "We are passing through critical times" हे वाक्य मला वाटतं 'निओलिथिक एन'पासून चालत आले असावे. पण म्हणून सामान्य जनांच्या सोयी काढल्या नाहीत इकडच्या प्रान्तात. त्यांच्या संस्था बनवल्या, सामाजिक मान्यता दिली, धंदे बनवले, शास्त्र बनवले, लॉर्डस् घराण्यातून बाहेर खेचून; हे खेळ, ह्या जीवन हौसेने जगण्याच्या सोयी संस्थारूपाने स्वस्तात सामान्याना बहाल केल्या.

व्यवसायामुळे वा अन्य कारणांमुळे गोल्डर्स ग्रीनच्या ह्या मंडळींची आता पांगापांग झाली. पण भेटल्यावर रॉयल ओकवर केव्हा गेला होतास अशी पृच्छा होते. तो विचारा ओस पडला. त्याची नेहमीची गिऱ्हाईके आहेतच. राम म्हणतो, "मेरी आली नाही तर सॅड आहे असे समजावे". "जॉन ज्या दिवशी तेथे दिसणार नाही त्यादिवशी 'गेला' म्हणून समजावे."

रॉयल ओकचा मालक आहे एक मिशावाला रुबाबदार आयरीश. त्यालाही आमची भाषा समजायला लागली असावी" असे मला वाटते. त्यालाही सुनेसुने वाटत असेल. रॉयल ओकचे नाव बदलून तो त्याला "रॉयल कोकोनट" ठेवील असेही मला वाटून जाते. नामकरण विधी खानोलकरांच्या हस्ते करण्यासाठी तो त्याला मुंबईहून बोलावून घेईल. अन् मग सगळ्यांच्या घशात पुनः एकवार ती "डबल डायमंड" जायला लागेल ही माझी वेडी कल्पना.

**खानोलकर**

असामी इतक्या पाहिल्या, पु. लं. नी इतक्या दाखवल्या आणि संगतीत बसायला मिळाली तर अशी शानदार व्यक्ती ! पांच फूट सात इंच उंचीचा, भरदार छातीचा, ब्राऊन रंगाचा—वेस्ट इंडियन्स काळे, आपण ब्राऊन—हसायला उत्सुक असलेला पण वरवर थोडासा गंभीर दिसणारा हा हुशार प्रॉडक्शन एंजिनियर म्हणजे एक 'असामी' आहे. माझा हा जवळचा मित्र. पिणारा उस्ताद पण त्याला 'हँग ओव्हर' केव्हा आल्याचे मला ठाऊक नाही. एंजिनियरींगचा कोर्स पुरा होईतो सीरीयस होतो असे सांगतो, पण मी जेव्हापासून पहातो तेव्हापासून हा दिलखुलास प्राणी, आयुष्य येईल तसे तुडवीत जात आहे.

रहात होता प्रथम प्लमस्टीडला, नंतर न्यु क्रॉसला—असे तो सांगत असे. माझा विश्वास नाही. चावी दाखवत असे. रॉयल ओकला भेट देऊन मुक्काम हलायचा गोल्डर्स ग्रीन ट्यूब स्टेशनच्या रेल्वे पुलाखालच्या इटालीयन हॉटेलात. गप्पात ट्यूबज् बंद व्हायच्या. सबब स्वारी माझ्या खोलीवर. दुसऱ्या दिवशी मी ऑफिसला जायचा ह्याच्याकडे चावी देऊन कारण ह्याला दुपारची पाळी म्हणून घाई नसायची. अशा तऱ्हेने किती तरी लोकांच्या चाव्या जमवल्या होत्या त्याने. आज खरेच्या खोलीवर, उद्या कुळकर्णीच्या, परवा काळेच्या. सकाळी भेटला तर दुपारी पाळी आहे म्हणायचा. दुपारी








भेटला तर दुसऱ्या दिवशीच्या दुपारची पाळी आहे म्हणायचा; कारण नाहीतर त्या दिवशीची रात्र म्हटली तर स्वारीचे देऊळ चुकायचे.

नोकरी होती की नाही याची केव्हा केव्हा शंका येत असे; पण पैसे खर्च करायचा असे म्हटल्यावर खरे म्हणायचा, "अरे यार नाय, आज 'क्रेझी गय' लागला". कुत्र्याच्या रेसिसुद्धी वर्ज्य नाहीत. किंवहुना काहीही वर्ज्य नाही. काहीही खायला केव्हाही तयार. गोड तेवढे नको म्हणत असे. जेवण पुरे झाले हे गप्पा मारायला कोणी उरत नसे तेव्हा त्याला कळत असे. नकला करत असे, गाणी म्हणत असे आणि सर्वांना आपल्याभोवती ठेवत असे. खरेच्या गाडीतून लांब चाललो तर एकच गोष्ट विसरत नसे, ते म्हणजे पब बन्द होण्याच्या वेळा.

मी म्हणायचो, "खरे, सुरेख पब काढ हं."

हा: "प्यायला मिळाल्याशी कारण. ए खरे तू वंद व्हायच्या आत चल."

मी: "अरे मी वातावरणासाठी जातो."

हा: "हात्तीच्या, दोन पाईंटस् मार. वातावरण आपोआप वदलेल. जमेकिअन एल्झा तुला एलिझाबेथ टेलर वाटायला लागेल अन् फाटलेल्या चटईवरून चालताना, आग्ऱ्याच्या तुरुंगातल्या तरवेज हातांनी बनवलेल्या गालीच्यावरून चालल्यासारखे वाटेल."

मी: "खरे, समोरच्या पेट्रोल पंपावर गाडी घे बावा आत. तिथे बीअरचे कॅनल्स् मिळतात."

हा: "आता कसं बोललास, सुरवात करूया मग जमलं तर जाऊ तुझ्या आलिशान पबात."

मोठे विषय केव्हाच बोलत नसे. भांडत नसे. कारण भांडायला तोंड रिकामे हवे ना ! सिगरेट, खाणे अथवा पिणे चालू. शिखांच्या जोक्स सांगणे, नकला करणे, पु. लं. चा प्रवेश करणे, आम्ही नाटक बसवले त्यातल्या गाण्यांच्या नकला करणे विशेषतः सरीताची; आणि हे सर्व करत असताना सर्वांना 'हो' म्हणणे. दहा मिनिटांच्या अंतरात चार लोकांना एकाच दिवशी एकाच वेळी अॅपॉईंटमेंटस् दिल्याचे मी ऐकले आहे. सर्व गोष्टींना 'हो' म्हणण्याच्या त्याच्या सवयीवरून सुरशा त्याला म्हणायचा, "अरे तू काही वेळेला तरी नाही म्हण." तर त्यावर सुद्धा तो 'हो' म्हणाला होता. त्याला एकदा मी म्हटलं, "अरे तुला हव्या असलेल्या गोष्टींस, तुझ्या बायकोने नाही म्हटले तरीसुद्धा तू त्याला 'हो' म्हणून मोकळा होशील. त्यावर तो म्हणतो, "आयला विकेट जाईल नाही ?"

आमचीही तो खूप टर उडवत असे, पण त्याचे बोलणे लागत नसे. खरा प्रेमळ, मनाचा दिलदार, सुसंस्कृत आणि सर्वांना हवाहवासा वाटणारा होता. तो मुंबईला गेला अन् लंडन एकदम गंभीर झाले. जीवनात सुखाचे क्षण जातात ते अशा माणसांच्या सहवासात. ह्या कला शिकून येतात का कोण जाणे !

लंडनच्या मराठी विश्वातले हे काही दुवे आहेत. काही जणांची नावे ह्या फेरफटक्यात ओघाने आली. पण मधु अभ्यंकर, माधव जोशी, गद्रे, किशोर वेंगुर्लेकर, श्रीकान्त वोडस, वसंता गोडबोले, वसंता जोशी, मावशी थत्ते, मुकुंदा नवाथे, साठे, त्रिपळूणकर, फाटक, आठल्ये, गंप्पा पंडित, भागवत, ठाकूर, पैंगणकर, सुहास दातार, केशव बापट, अशा कितीतरी कुटुंबांची साखळी जोडली तर आख्खे महाराष्ट्र लंडनच्या सफरीवर निघेल. मला ह्यांच्यामुळे लंडन केव्हाच परके वाटले नाही. ह्यांच्या भगव्या राहुटचा थेम्स नदीच्या आसमंतात रामदास कामतांचे "गुंतता हृदय हे कमल-दलाच्यापाशी....." म्हणत कृष्णाकोयनेची संस्कृती तिच्या भोवती वसवत आहेत. ह्या राहुटयात काही दिवसांनी मंगळागौरी लाडू झिम्म्याने जागवल्या जातील. ह्या बदलत्या लंडनमध्ये ह्या मंडळींना जोडणारा दुवा मला केव्हा केव्हा स्वप्नात भेटतो.

## बदलते लंडन

काळ पुढे जातोय. आपण कुठे तरी जातोय. जुनी दारू नव्या कारखान्यातून नव्या बाटल्यातून, नव्या बॉक्समधून ख्रिसमस साजरा करायला येतेय्. टर्कीने–चिकन गोटच्या आकाराची झाली की तिला टर्की म्हणतात–डीशीस् भरून जात आहेत. लोकांचे मतप्रवाह बदलतायत, संस्था बदलतायत, चर्चिस बदलतायत, कुटुंब संस्था बदलतेय, राष्ट्राच्या कक्षा बदलतायत, शहराची लॅंडस्केपस् बदलतायत, स्थिर काय राहाते तेच पाह्यचे. किंवहुना स्थिर रहाण्यासाठी काही जन्मते का कुणाला माहीत ? ह्या सगळ्या टेक्नॉलॉजीमुळे होणाऱ्या बदलात लंडन विरक्त कसे राहू शकेल ? तेही बदलतेय.

आजीबाईंकडे साईबाबा मंदिर स्थापले. सेंट्रल लंडनमध्ये कृष्ण उभा राहिला. आम्ही नाही केला, बीटल्सनी केला. त्याचे इंग्रजी भक्त धोतरात, बाराबंदीत, गळ्यात रुद्राक्षांच्या माळा घालून, कपाळाला भस्म लावून अन् झांजा वाजवून ऑक्सफर्ड स्ट्रीटवर भजन म्हणू लागले. "वेई छंद मकरंद"च्या बॅकग्राऊंड म्युझिकवरसुद्धा नितिन–माझा मुलगा–सारखी मुले टॉम जोन्स-सारखा डान्स करू लागले. योग अन् पंजाबी करी सर्वतोपरी झाली. माधव जोशी आणि मधु अभ्यंकरांकडे डोंबिवली, पुण्याला दिसतात तसे पाव्हणे दिसायला लागले. मावशी नऊ नऊ बायकांचे डोहाळ जेवण करायला लागल्या. घरात आलेली पाव्हणी बाळंत होईल म्हणून सोहनी डॉक्टरकडे धावत जायला लागला. अलका-रॉबर्ट विवाह होऊ लागले म्हणजे पर्यायाने लंडन बदलायला लागले नाही का ?

मला केव्हा केव्हा स्वप्न पडते. जून महिन्यात–इथे थंडी असते–सकाळी सूर्याची मस्त उन्हं पडलीयत. मी सकाळी कुत्रा घेऊन बाहेर पडलोय अन् वाटेत घाणेकर भटजी भेटतात. भटजी कॉट्सवूलचे सुरेख धोतर नेसलेयत. अंगात बाराबंदी घातलीय. बोटात भरपूर आंगठया व गळयात रुद्राक्षाच्या माळा आहेत.








पायात जाड चढाव कानावर दुर्वांची जुडी आणि कपाळावर भस्माच्या दोन आडव्या पट्टया–विश्वास ठेवा अगर ठेवू नका, हीच हिप्पी व पॉपस्‌ची लेटेस्ट स्टाइल आहे––डाव्या मनगटांवर घोड्याच्या गळ्यात घालतात तशा पट्ट्याचे घड्याळ व उजव्या मनगटात सौभाग्यवतीची वाकी अन् डोक्याचा गोटा आहे तसाच ठेवून हरे-कृष्णाचा जप करत चाललेत. कोणीतरी म्हणाले की डोक्याचा गोटा करण्याची स्टाईल युल ब्रायनरने क्रुश्चावकडून उचलली. साफ चूक आहे. दोघानीही ती घाणेकर भटजींपासून उचलली. मला प्रथम वाटलं भटजींचा जप चालू आहे पण तसे नव्हते. डाव्या खांद्यावर–कंडक्टरच्या गळ्यात असते तशी–पिशवी आहे त्यातून कॅसेट टपरेकॉर्डरवरचा जप ऐकू येतो.

"काय भटजी सकाळीच कुठं?"

"हरेकृष्ण. आज अॅपॉईंटमेंटस् खूप आहेत."

"का बरं?"

"नाही. हा सीझन असाच जातो. व्हिजिटर्स खूप. वस्ती पण वाढलीय. हे लोक पण धार्मिक बनलेत."

"भटजी, बरंच डिस्टन्स चालायला लागत असेल."

"नाही. सेकंडहँड कार घेतलीय."

"मग आता पायीच?"

"हरेकृष्ण. अरे ही जवळचीच घरे आहेत. आपले ठाकूर, सोनपतकी, गोडबोले आजीबाई ह्यांच्या दररोजच्या पूजा पायीच उरकतो. नंतरचा कार्यक्रम असा." भटजीनी डायरी काढली.

A.M. १०––देशपांडे, १ पोप रोड––वास्तुशान्त.

११––ताम्हाणे, २२, चर्च रोड––मुलीचे बारसे.

Noon १२––गुप्ते, ७३, लँब रोड–सत्यनारायणाची पूजा.

P.M. १––हॅमस्टिड हिथ विटल्स क्लब––योगाची चार आसने शिकवायचीत.

२––'प्रिन्स अल्बर्टवर' डॉ. गायधनीला भेटायचे.

"प्रिन्स अल्बर्ट अन् डॉ. गायधनी? भटजी पिता की काय?

"श्रीनिवासा, काय विचारतोस हे? इथे न पिऊन कसे चालेल?"

"अभक्ष्य भक्षण चालते का?"

"नाही. पण चीज, अंडे इतपत जमते. चित्या – भटजींचा मलगा–कॅनडात आहे. तो खातो चिकनबिकन. पण तो पार्ट टाईमात पूजा सांगतो."

"पुढचा प्रोग्रॅम सांगा."

भटजी पुनः डायरी वाचायला लागतात.

P.M. ३––वा. फाटक, २३ सेंट मेरी रोड––एकादशीची राहिलेली पूजा.

४––अभ्यंकर, ११, हेरफील्ड रोड––त्यांच्या घरी एक पाव्हणी बाळंत झालीय तर पाचवीची पूजा सांगायचीय.

5––Women admirers Association of Playboy magazine–Yea and discourse on meditation.

६––हिंदु सेन्टर––प्रवचन.

७––सरीता करंदीकर सेंट मायकेल हॉलवर पार्टी देणार आहे. तिथे तिच्या गुरूंचा फोटो माझ्या हस्ते लावून हार घालीन म्हणालीय. फराळ पण आहे.

(प्रथम चटकन ध्यानात आले नाही. पण मग खरे म्हणाल्याचे आठवते की सरीता सेंट मायकेल हॉलवर राह्यला गेली कारण तिथली फंक्शनस् संपत नाहीत अन् हिला बोलावणे नाही असे एकही फंक्शन तिथे होत नाही.)

८––सुषमा हुदलीकर––रोनाल्ड पार्कर–मेथॉडीस्ट चर्चच्या हॉलमध्ये लग्न आहे. ते हिंदु पद्धतीने करायचे आहे. तिथेच जेवण.

९––अप्पासाहेब पंतांकडे––भारत ब्रिटन संबंध नजिकच्या काळात का बिघडण्याची शक्यता आहे हे कुंडली मांडून दाखवणार आहे.

१०––टीव्हीवर शीला केनेडी बरोबर एक मुलाखत रेकॉर्ड करणार आहे. विषय "Economic hardships of a Hindu priest in London". अशोक ढमढेरेकडून लिहून घेतलाय बराचसा मसुदा.

१०.३०––पैंगणकरांकडे सुहासिनी मुळगावकरांच्या गाण्याला रात्री १२ पर्यंत परत येईन. असे चालते हे.

"भटजी हे स्पेस एज आहे."

"कसलं का एज असेना, जॉब सॅटिस्फॅक्शन आहे."

पुढे भटजी काही तरी बोलत असतात पण तेवढेसे ऐकू येत नाही. माझी मुलगी हाक मारतेयसे वाटते.

वृंदा: "Daddy get up. Its half past seven and somebody is on Telephone.

मी: "Now? at this hour? Who is that and what does he want?

वृंदा: She said, 'she is Marianne Faithfull. She got your phone number from Michael Jones of LSE. Wants to know if घैनेकर can go to her place every day to perform Krishna Puja."

मी, " wh–– a–– t म्हणत डोळे चोळत वाजणारा फोन उचलतो. वृन्दा झोपलेली असते. टेलिफोन असतो माधव जोशांचा.

"पंडित फॉर पांडित्य नको. झालं असेल लिहून तेवढे द्या पाठवून. आधीच उशीर झालाय." कल्पनांच्या भराऱ्या एरव्ही थांबणार कशा?

लंडन बदलत असल्याची चाहूल अशा कल्पनांनी मनाला विरंगुळा देत असते.

● ● ●






# भारतात पहिल्यानेच!

# नव्या भिंतींसाठी नवा पेण्ट –

# डेकोप्लास्ट

नव्या प्लॅस्टरवरही प्रायमरशिवाय
लावता येतो.
उन्हापावसात
वर्षानुवर्षे
टिकून राहतो.




**सिमेंट पेण्टशी तुलना केल्यास :**

- मजुरीचा खर्च ४०% कमी!
- रंगकामाच्या ७ क्रियांऐवजी दोनच पुरेत!
- पाचपट जास्त भाग रंगविता येतो!

डेकोप्लास्ट बेस व्हाइटमध्ये मॅजिकटच मिसळून ४० मनपसंत रंगछटा झटपट तयार करता येतात. शिवाय ५ पक्के, गर्द रंग तयारच मिळतात.

**जीवनातील रंगसंगती म्हणजेच एशियन पेण्टस्**











वसुधा धागमवार, लंडन

"का ग, आज अगदी गप्प–गप्प आहेस ?"

"काही नाही, सहज."

"तरी पण ?"

"मी सांगतो, माइल्स मध्येच म्हणाला, "तिला आज घरची आठवण येते आहे. खरं की नाही ?"

खरंच होते ते. मान डोलावण्यापलिकडे गत्यंतरच नव्हते.

"त्याला काय करायचे आता ?" जेम्स म्हणाला, "आपण जेवायला वाहेर जाऊया का ? उदास माणसाला संध्याकाळ अगदी खायला उठते ब , एकटे वसले तर."

"लोक हो, मी साफ येणार नाही." माइल्स हातघाईवर येऊन म्हणाला. 'मी घरी जाऊन झोपणार आता. जेवण गेले खड्ड्यात."

खरोखरच तो झोपेला आला होता. वाजले होते साडे-सातच, पण गेले चार दिवस तो आपल्या कामाचा रिपोर्ट लिहिण्यात इतका वुडला होता की त्याच्या झोपेचे खोवरे झाले होते. सहा वाजता रिपोर्ट सवमिट करून तो घरी जायच्या वेतात होता, तेवढ्यात जेम्स उपटला "झोपतोस कसला, थोडा भटक म्हणजे ताजातवाना होशील." असे म्हणत. जेम्सचे उपाय असेच अघोरी असायचे. माणूस प्रेमळ म्हणून त्याचे मित्र सगळे हसण्यावारी नेत असत ही गोष्ट अलाहिदा ! माइल्स मात्र 'ताजातवाना' व्हायच्या ऐवजी आणखीच थकला होता.

"अरे दिवसा कसला झोपतोस ?"

"दिवसा म्हणजे ? हा जूनचा महिना आहे ! दहा वाजेपर्यंत मावळायचे नाही ! मी ऐकायचा नाही अजिवात."

असं कर, थोडसं जेव आधी. मग तुला घरी पोचवतो."

"नाही म्हणजे नाही. मला घरी नेणार असलास तर वसतो तुझ्या मोटारीत. नाही तर जातो ट्यूबने."

"ए जेम्स, कशाला राशीस लागतोस त्याच्या. तो उभ्या–उभ्या झोपेल इतका थकलाय."

"आता काय मदर इण्डिया तुझ्या वाजूची झाली, पन्नास कोटी लोकांशी कोण झगडा करणार ? चल, सोडतो तुला आधी, आता झाले ?"

नि खरोखरच गाडीत वसल्यावरोवर माइल्स पेंगायला लागला.

"आपण कुठे जायचे जेवायला?" जेम्स सुकन्याला विचारीत होता.

"मोती ? गंगा ?"

" दोन्ही नको."

"मग ? 'तन्दूर'मध्ये चलतेस ?"

अरे ए वावा, कष्टाने एक डोळा उघडून माइल्स पाठीमागून म्हणाला, तुला वेडवीड लागले की काय ? त्या हिन्दुस्तानी पाकिस्तानी हॉटेलात जायला ? वाई नाहीतर पानावर वसून सुनावणार तुला, 'आमच्या आईच्या हातचा स्वयंपाक' ह्या विषयावर. काहीतरी. चिनी–जपानी फ्रेंच–इटालियन जागा निवड.

माइल्सचे अगदी बरोबर होते. घरची





अनुक्रमणिका

आठवण येत असताना रोगन–गोश्त नि मटर पनीर खायला वसणे शुद्ध गाढवपणा होता. घरच्या वरण–भाताची सर त्याला कशी येणार !

माइल्सला घरी सोडून ते शहरात चकरा मारू लागले, चांगलीशी जागा शोधीत.

शुक्रवारची संध्याकाळ म्हणजे वीक–एण्डची सुरवात; बऱ्याच ठिकाणी जागा नव्हती.

"ह्या इथे पाहूया का टेबल असले तर ? हंगेरियन जेवण छान असते" जेम्सनी विचारले.

"जाऊ या ना ! मी कधी खाल्लेले नाही. हे रेस्टॉरन्ट कसे आहे ?"

चांगले आहे; मी येतो पुष्कळदा इथे." गाडी पार्क करीत तो म्हणाला.

सुदैवाने जागा होती. मालकाने त्याना टेबल दिले व 'बऱ्याच दिवसांनी आलात' अशी ओळख दाखवीत मेन्यू त्यांच्या हातात ठेवले.

"मालक नि आणखी दोघे-तिघे हंगेरियन आहेत." मालक गेल्यावर जेम्स सुकन्याला म्हणाला, "१९५६ सालच्या क्रांतीतून इथे आले. रेस्टॉरन्ट काढून इथे राहिले. आधी लहानसंच होतं. पण आता रुबाबात आहे सर्व."

वाईन–वेटर वाइन–लिस्ट देऊन गेला. एक पोरगेला वेटर ब्रेड व लोणी ठेवायला आला.

"लुक, ही इज अॅन इंडियन" जेम्स म्हणाला, "आस्क हिम व्हेअर ही इज् फ्रॉम." पण तेवढ्यात वेटर निघून गेला होता.

'तुम्ही हिन्दुस्तानी माणसे एकमेकांशी वाईट वागता. हा त्याचा लाडका व थोडाफार खरा सिद्धान्त होता ! वेटरशी चार शब्द बोलायला काय होते ? त्याला सुद्धा बरं वाटतं.' त्यामुळे त्याच्याबरोबर असताना सुकन्याला एक ड्रिल नेहमी करावे लागे. वेटरला विचारायचं, 'तू कुठला ?' तो बहुधा बंगाली निघायचा–नुसत्या लंडनला पूर्व बंगालच्या सिल्हेट जिल्ह्यातून आलेले साठ हजार पुरुष आहेत नि ते बहुतेक सर्व हॉटेलातूनच कामे करतात ! –

**....जे अन्न सुकन्याला रुचकर वाटलं होतं ते त्या वेटरच्या गळी उतरत नव्हतं....थाळीभर उकडा भात नि माश्याची आमटी हा स्वर्ग काही त्याला इथं मिळत नव्हता...त्याला सुखी कसं म्हणायचं?..**

मग त्याच्याशी दोन शब्द तुटपुंज्या बंगालीत बोलायचे. म्हणजे कुठे जेम्सचे समाधान व्हायचे. पण खरोखर त्या वेटरला अगदी बरं वाटायचं. नेहमीच्या बन्देवाईक हास्याच्या पलिकडे जाऊन तो तात्पुरत्या का होईना, पण आपुलकीने वाढायला यायचा.

"आता आला की विचारते." तिने घाई-घाईने सफाई दिली.

"चोखंदळपणा करीत जेम्सनी जेवणाची ऑर्डर दिली नि वाईन निवडली. मग वाट बघत बसले दोघे गप्पा मारीत.

....तिच्या मनावरची काजळी हळुहळू उतरीत होती. जागा टापटीपीची नि मोकळी होती. टेबलांवर फुले रचली होती नि प्रकाश भरपूर पण मन्द होता. सिगरेटींचा धूर अजून भरायचा होता. अन्तरा-अन्तरावर बसलेल्या लोकांचे संमिश्र मन्द आवाज जागेत प्रसन्नता भरीत होते. त्या सुखवस्तू सुसंस्कृत वातावरणात तिच्या मनावरचा ताण कमी होत होता. साडीचा पदर लपेटून घेत सुकन्या सुखाने शहारली नि नकळतच हसली.

जेम्स तिच्या चेहऱ्याकडे बारकाईने बघत होता. तिला हसताना बघून तोही हसला.

"हसायला काय झाले ?"

"काही नाही, बरे वाटले, तू हसलीस म्हणून. म्हटले, तू अशीच डिस्प्रेस्ड राहणार की काय ?" असा प्रेमळ जेम्स.

त्याच्या उत्तराने तिला आणखीनच बरे वाटले. तिच्या मनात आले, 'खरंच, काय कमी आहे आपल्याला ? आईवडील, भावंडे, मित्र–मैत्रिणी, प्रेमाची, सुखाची ददात पडू देत नाहीत. भरीस इंग्लंडची स्कॉलरशिपदेखील मिळाली आहे. आपला होमसिकनेस म्हणजे श्रीमन्ती चोजले आहेत निव्वळ.'

वाईन आली. पहिला कोर्स घेऊन वेटर आला. मालकही बन्देवाईक चौकशी करायला आला. सूपवर किसलेले चीज घालायला तो हिन्दुस्तानी वेटरही पाठोपाठ होताच

"तू कुठला ?" जेम्सने त्याला विचारले. "तुम्हाल काय वाटते सर ?" वेटरनी जरा तोडूनच विचारले. पण जेम्सचा स्वभाव थोडक्यात माघार घेणारा नव्हता.

"आर यू फ्रॉम इण्डिया ?" तो पुढे म्हणाला.

"पाकिस्तानचा आहे तो." मालकाने चपळाई करून उत्तर दिले, नाहीतर तो पुढे काय बोलला असता कुणास ठाऊक ! वेटरचे वागणे अगदीच चुकले होते.

गिऱ्हाईक रागावू नये म्हणून मालक त्यांच्या टेबलाशी रेंगाळला.

त्यानी सूपची चव घेऊन पाहिली. "छान झालंय तुमचं सूप." जेम्सनी ग्वाही दिली. "अगदी अस्सल हंगेरियन ना ?"

"वा, वा, हो तर" मालक म्हणाला.

"देश सोडलात पण आपला स्वयंपाक नाही विसरलात एकूण." जेम्स पुढे म्हणाला.

मालक नुसताच हसला.

"जाता का कधी परत ?"

"जातो अधून-मधून. यंदाच गेलो होतो, दहा दिवस."

"त्यांच्या वागण्यात काही फरक दिसतो का ?"

"दिसत असा नाही, पण आहे नक्कीच"– मालक म्हणाला. "तेही दाखवीत नाहीत, आम्हीही दाखवीत नाही. १९५६ साली काही झालेच नाही असे वागतो; पण ते काही खरं नाही. खरं काय ते आम्ही ओळखून आहोत !" त्याच्या चेहऱ्यावर पुसटसा ढग आल्यासारखा वाटला; पण













## कॅशकार्ड

### ( मध्यरात्रीही पैसे घ्या ! )

"मी सुरेश बोलतोय. तुझ्या Cash Card वरून दहा पौंड मला देतोस का? मला उद्या सकाळी ७ च्या गाडीने Dover ला जायचे आहे. मी गाडी घेऊन तुझ्याकडे येतो आपण बँकेत जाऊ. नंतर तुला परत घरी सोडतो." रात्री १२॥ च्या सुमारास माझा मित्र मला फोनवर सांगत होता.

वेळीअवेळी (खरं म्हणजे अवेळीच) पैसे लागल्यास ते मिळावेत म्हणून येथील प्रमुख बँकांनी आपल्या बऱ्याचशा शाखांतून ही नवीन पद्धती सुरू केली आहे. आपल्या रेल्वेच्या पासासारख्या ह्या कार्डावर Computer पद्धतीने एक नंबर Punch केलेला असतो. तुम्ही आणि बँक ह्याशिवाय इतर कुणाला तो माहीत नसतो. चित्रात दाखविलेल्या मशीनमधल्या Slot मध्ये तुमचे Card टाकावयाचे. तुमच्या नंबराची बटणे दाबावयाची की काही सेकंदात १।१ पौंडाच्या दहा नोटांची एक चळत बाहेर येते. रांगेत उभे राहावयास नको. मुद्दाम वेळ काढून बँकेच्या वेळातच बँकेत जावयास नको. एवढेच काय चेक सुद्धा नको. शिवाय वर्षातल्या ३६५ दिवसांपैकी कुठल्याही दिवशी आणि कुठल्याही वेळी तुम्हाला १० पौंड मिळू शकतात. कारण हे मशीन बँकेच्या बाहेर, रस्त्याच्या बाजूलाच बसविलेले असते. एकदा पैसे काढले की कार्ड आतमध्ये जाते व दुसऱ्या दिवशी पोस्टाने तुमच्या घरी येते.

स्वतःचा फोन नंबर सुद्धा विसरणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला ह्यात अडचण फक्त एकच वाटते, ती म्हणजे हा Code No. कसा लक्षात ठेवावयाचा?

फोन आल्यापासून बरोबर तेरा मिनिटात मी सुरेशचे Thanks घेतले व त्याला Good Night केलं.

—चित्रकार यशवंत माळी.

आजार असला तर माणूस जितका आरडा-ओरडा करतो तितकाच आजार बरा न होणारा असला तर तो गप्प बसतो. आलं का लक्षात? मनात येईल तेव्हा तुला परत जाता येईल. शिष्यवृत्ती बुडेल, फार-तर पुन्हा परदेशी जायची संधी मिळणार नाही येवढेच. तुझ्या होमसिकनेसचे उत्तर तुझ्या हातात आहे; हे लोक काय करू शकतात? ज्या दुखण्याला उत्तर नाही ते सोसून, त्याच्याकडे दुर्लक्ष करूनच त्याचे ओझे वाहता येते. ही समजूत ज्याला आहे तो तरतो, बाकीचे गटांगळ्या खातात. जीव जर द्यायचा नसला तर प्राण आहे तोवर वेळ रडून तरी घालवायचा नाही तर हसून तरी. मग हसायला काय हरकत आहे?" मग स्वर बदलून. "संपला आमचा डोस बाईसाहेब, अशा अपराधी चेहऱ्याने बसू नका!"

सुकन्याने त्याला वेडावून दाखवले खरे, पण त्याचा प्रत्येक शब्द तिच्या मनाला भिडला होता. शिवाय त्यातला प्रत्येक माणूस ताठ मानेने, प्रतिकाराच्या भावनेनी एका बलिष्ठ शक्तीशी आपली चिमुकली ताकद पणाला लावून बाहेर पडला होता. देशाची आठवण होत असली तरी केलेल्यांची खंत बाळगायचे त्यांना काही कारण? मग डोळ्यातून टिपे त्यांनी काय म्हणून गाळावीत? त्यांच्या चुकीमुळे काही ते आपल्या देशाला अन्तरले नव्हते! पदरी चूक नाही आणि परत जायला वाट नाही, अशा परिस्थितीत हसून पुरुषार्थाने जगण्याचाच उपाय शिल्लक होता!

पुढचा कोर्स घेऊन तो पाकिस्तानी वेटर आला. ह्यावेळी सुकन्या तयार होती. खरं तर मागच्या खेपेला ती थोडी ओशाळली होती. राजकीय भांडणे पाच हजार मैलांवर अशी दोन माणसांनी चव्हाट्यावर मांडल्यामुळे जेम्स बोलला नसला तरी त्याला हेच कारण वाटले असणार. वेटरच्या तुसडेपणाचे. असा काय त्याचा अपमान झाला होता, 'तू हिन्दुस्तानी का' विचारल्यामुळे?

तो वेटरही सावरला होता. तिने त्याला किती थोडा वेळ. पुन्हा एकदा हसून 'सावकाश होऊ द्या' म्हणत तो पुढे वळला-देखील.

जेम्स मात्र त्याच्या पाठीकडे बघत होता.

"मोठी हिमतीची माणसं बावा." तो जणू स्वतःशीच म्हणाला नि मग वळून तिला—"नाही तर तू बघ. दीड वर्षानी परत जायचंय माहीत असून देखील तोंड लांबच्या लांब करून बसली होतीस! ब्रेड घेतेस?"

ब्रेड घेत सुकन्या पुन्हा हसली. "अगदी माझ्या मनातले बोललास बघ." ती म्हणाली. "मी हाच विचार करीत होते."

"नशीब लवकरच डोकं ताळ्यावर आलं!" जेम्स सुटल्यासारखा समाधानाने म्हणाला.

"काय हिम्मत लागते नाही, देशावर-घरादारावर, फार काय स्वतःच्या माणसां-वर पाठ फिरवून चालू लागायला!" सुकन्या स्वतःशीच पण मोठ्यांनी म्हणाली "केवढा क्षोभ होत असेल मनाचा. आगडोंब नुसता; पण चेहरा पुन्हा हसराच!"

जेम्स क्षणभर गप्प बसला, मग हळुवार-पणे तिला म्हणाला, "हे बघ, वरा होणारा








बंगालीत "तू कुठल्या जिल्ह्याचा" असे विचारल्यावर त्यानेही तिला तोच प्रश्न केला.

"मी बंगाली नाही" सुकन्याने खुलासा केला.

"पण बंगाली छान बोलता."

"मैत्रिणींच्याकडून शिकले थोडेसे."

मग त्याने अगदी अनपेक्षित प्रश्न विचारला,

"तुम्हाला हिन्दी येते का?" त्याने तोडक्या–मोडक्या हिन्दीत विचारले.

"हो चांगले येते. पण तू कुठे हिन्दी शिकलास?" ती जरा चकितच झाली.

त्याच्या तोंडावरून त्याचे वय चोवीस-पंचवीस वाटत होते, म्हणजे त्याला भारतात प्रवास करण्याची संधी मिळालेली नसावी!

"मी लंडनला आलो तेव्हा आधी एका इस्पितळात होतो–वहाँ का नर्स लोग सब हिन्दी बोलता था. वहाँ हम हिन्दी सीखा."

मुंबईच्या हिन्दीला लाजवील इतके तोडके–मोडके उत्तर ऐकून सुकन्याला इतकी गम्मत वाटली? "पांच हजार मैलांचा प्रवास करून ह्या प्राण्याला घरी पाचशे मैलांवर असलेली भाषा शिकायला मिळाली बघ जेम्स नि हा माणूस ती हौशीने शिकला. बंगालात असता तर भारताची भाषा सोडच पण स्वतःच्या देशाची उर्दू शिकायला तयार नसता झाला. हे आमच्या देशाचे राजकारण!" वेटर गेल्यावर ती जेम्सला म्हणाली.

वेटरच्या अगोदरच्या तुसडेपणाचे काही का कारण असेना, त्याला इण्डियन म्हटल्याने तो नक्कीच रागावला नव्हता!

मग ह्याच विषयावर गप्पा सुरू झाल्या. तिची एक सिंहली ख्रिस्ती मैत्रिण तिला नेहमी म्हणायची, "ही माणसं ना सुकन्या, आपल्यासारखी नाहीत." नि मग चावटपणे "आपल्यासारखी म्हणजे तू नि मी सारख्या आहोत हा जो अर्थ निघतो ना तो इंग्लंड-पुरताच बरं का! आपआपल्या देशात आपण पुन्हा भाषा, प्रान्त, अन्न, वेष, असल्या बाबतीत मारामाऱ्या करू!"

"मूळ मुद्दा तो नाही. जेम्स "तिला अडवीत म्हणाला, "आम्ही तुमच्या सारखे नाही म्हणजे काय ते नेमके सांग––"

"अरे म्हणजे तुम्ही तुसडे, मैत्री न करणारे, आतल्या गाठीचे आहात."

"आय सी! नि तुला पटते वाटते तिचे म्हणणे?"

"नाही रे, पटणार कसं? कुठल्याही देशात प्रथम पाय रुजवायला वेळ लागतो. तुमचे आमच्याकडे तसेच होते!"

"मुटलीस!" जेम्स ओरडला. "नाही-तर मी तुझ्या डोक्यावर वाईनची बाटली उपडी करणार होतो.

"आणि मी गप्प बसले असते होय?"

"काय केले असतेस, सगळी वाईन मी



अनुक्रमणिका






ओतून टाकल्यावर?"

"काय म्हणजे, रेस रिलेशन्स बोर्डाकडे तुझी तक्रार केली असती. 'काळ्या आदमी'-वर अत्याचार करण्यासाठी."

"करूनच पाहा एकदा. तुला टेम्स नदीत नाही फेकून दिली तर बघ! तक्रारच करवून घ्यायची तर मग ती खरी तरी असावी. बदकामसे बदनाम बुरा म्हणतात ते उगाच का!" असे म्हणून तो इतक्या मोठ्यांदा हसला की जवळच्या माणसांनी दचकून त्यांच्याकडे पाहिले. हसत हसत जेवण उरकले. जेम्सच्या सढळ हातांनी टिप ठेवून झाली. तो पोरगेलासा बंगाली वेटर त्यांचे कोट घेऊन आला.

"घरून कधी आलात?" त्याने सुकन्याला बंगालीत विचारले.

"झाले चार-पाच महिने." कोटाची बटणे लावीत तिने हसून उत्तर दिले, वर न पाहताच. जेवतानाची थट्टा-मस्करी तिला अजून सुखवीत होती.

इतक्यात तिने वर पाहिले नि ती एकदम दचकली. तिचे उत्तर ऐकून त्याचा चेहरा विषादानेच नव्हे तर केविलवाण्या मत्सराने भाजून निघाला होता.

"मला येऊन पाच वर्षे झाली" तो मुलगा म्हणाला.

"आवडते का तुला इथे?" काही तरी बोलायचे म्हणून सुकन्या म्हणाली.

"आवडतंय कसलं! घरचं सगळंच वेगळं. इथली हवा, माणसं, अन्न, कपडा, सगळंच निराळं!"

सुकन्याला जे अन्न रुचकर वाटले होते ते त्याला डसत होते. थाळीभर उकडा भात नि माश्याची आमटी हा स्वर्ग काही त्याला इथे मिळत नव्हता. नुसते धोतर वाळगणाऱ्या अंगावर आता खोगीर वागवावे लागत होते, नि शिवाय ती तुटपुंजी येणारी इंग्रजी सदा ऐकायची भयानक शिक्षा निराळीच!

"मग परत का जात नाहीस?"

"वापिस कैसा जायगा? बापाला पैसे कोण पाठवणार? चार भाऊ आहेत खाली माझ्या."

"सो यू कान्ट गो होम. शेती आहे का घरी?" जेम्सला कळावे म्हणून तिने इंग्रजीत प्रश्न केला.

"आहे थोडीशी; पण तिने कुठं निभतंय. पाठचा एखादा भाऊ येईल तेव्हा मी जाईन. पण ते सगळे फारच लहान आहेत. एकतर मी इथे आल्यावर झाला." त्यानही इंग्रजीत उत्तर दिले.

रेस्टॉरन्टच्या दाराशी ती दोघे क्षणभर उभी राहिली, निस्तब्ध. तिचा होमसिकनेस, त्या हंगेरियन मालकाचा वनवास, नि ह्या वेटरचे अरण्य-रुदन. तिघांची तीन कारणे. शेवटचे दोन प्रकार आपापल्या परीनी रौद्र-गंभीर. ती मात्र उगाच स्वतःची कीव करायला निघाली होती. काही झाले नव्हते तिला.

जेम्सने एक निःश्वास टाकला. "ह्याला म्हणायचे लाचारी. आर्थिक पिळवणूक ती ही. तुझ्यासारखा तो शिकायला आला नाही की आपल्या मालकासारखा तत्त्वासाठी बाहेर पडला नाही. इथे राहण्यात त्याला काही स्वारस्य नाही. पैसा घरी पाठवायचा म्हणजे मनोरंजन नाही. दोन-चार देशबांधव सोडले तर त्याचे इथे कुणी नाही. जबरदस्तीने ढकललेला माणूस. बस्स. शेवटी आई-बापापासून माणसाला संरक्षण नसते हेच खरे. अशी किती माणसे इथे आहेत कुणास ठाऊक!"

जणू काय डोक्यातले विचार झटकून टाकण्यासाठी त्याने जोरात मान हलवली.

"चल आपण पार्कमध्ये जाऊन हंस पाहूया. चलतेस?"

त्या वेटरला कधी न दिसणारे लंडन तिला मात्र कौतुकाने प्रेमाने खुणावीत होते. त्याच्या ह्या रूपाकडे ती केवळ बघत राहिली!

* * *



# ढालीची दुसरी बाजू

....लंडनच्या चार वर्षांच्या वास्तव्यात 'साहेबी' जीवनाचे आलेले अनुभव....ढालीची ही दुसरी बाजूसुद्धा नीट पाहिली पाहिजे....

शाळेत असताना एका ढालीची गोष्ट वाचलेली हल्ली मला वारंवार आठवते–एकाच बाजूने एखाद्या गोष्टीकडे बघायची सवय लागली की दुसरी बाजू कित्येक वेळा दिसतच नाही. मग पटण्याची गोष्ट दूरच! 'साहेब' म्हणजे शिस्तप्रिय, वक्तशीर, स्वच्छताप्रिय, नम्र, कष्टाळू–वगैरे वगैरे अनेक (थोडक्यात म्हणजे सर्व सद्‌गुण साहेबाच्या ठायी आहेत.) समज आपल्याकडे प्रचलित आहेत. लंडनच्या चार वर्षांच्या वास्तव्यात 'साहेबी' जीवन जवळून पाहिलं, अनुभवलं–त्यामुळे याच ढालीची दुसरी बाजूही समजली आणि वाटलं. हे अनुभव जरूर आपल्या परिचितांना सांगावेत–निव्वळ एक निरीक्षक या नात्याने !

आजकालच्या एकंदरीत पाश्चात्य जीवनाची घडणच अशी की, पौर्वात्य जीवनाचं अंगच असलेल्या अनेक गोष्टींचा इथे प्रकर्षाने अभाव जाणवावा–कौटुंबिक जिव्हाळा जीवनमूल्यांवर विश्वास, वडीलधाऱ्यांबद्दल आदर, इत्यादी. लंडनचं जीवनही याला अपवाद नाही.

एकत्र कुटुंबपद्धतीत वैयक्तिक स्वातंत्र्याचा चुराडा होतो म्हणणाऱ्यांनी इथल्या वृद्धांची अनुकंपनीय अवस्था एकदा जवळून पहावी ! डोरीन नावाची माझी एक मैत्रिण नर्स आहे. ती एकदा सहज गप्पा मारता मारता म्हणाली, 'हॉस्पिटलमधे उपचाराकरता ठेवलेल्या एखाद्या म्हाताऱ्याला 'तुझी प्रकृती सुधारली आहे, घरी जायला हरकत नाही असं सांगण्याचा अवकाश, त्याचा त्याच रात्री relapse झालाच पाहिजे !' घरी आस्थेने, मायेने वागवणारं, विचारणारं कुणी नसतं–मुलंमुली आपापल्या संसारात, व्यवसायात गर्क–म्हाताऱ्या आईवडीलांकडे (इतर वृद्ध नातेवाईकांची गोष्टच दूर !) बघायला वेळ कुणाला ? माझ्या स्वतःच्या आठवणीत इथले एक वृद्ध गृहस्थ आहेत. लंडनला आम्ही नुकत्याच आलो होतो, तेव्हा माझी मुलगी श्रद्धा (वय दोन) फक्त मराठीच बोलत असे. अद्वैतला शाळेत सोडायला जाताना एका ठराविक ठिकाणी हे पायाने किंचित अधू असलेले गृहस्थ आम्हाला दिसायचे. एक दिवस श्रद्धाने मोठ्याने विचारलं, 'हे आजोबा कोण ?' त्यांनी मला विचारलं, 'ती तुझ्या भाषेत काय म्हणाली ते मला सांगशील का ?' मी सांगितल्यावर ते इतके खूष झाले की, रोज तिच्याशी गप्पा मारायला (अर्थात दुभाष्याचं काम माझ्याकडे) तिथे थांबून रहायचे. एकदा थंडी फारच होती आणि श्रद्धाला सर्दी झाली होती म्हणून अद्वैतला शाळेत माझ्याऐवजी शेजारीण घेऊन गेली. दुसऱ्या दिवशी हे 'आजोबा' लगबगीने जवळ येऊन म्हणतात, 'काल होतीस कुठे ?

सौ. नीलम मंत्री, लंडन

कुणाला बरं वगैरे नव्हतं का ? या माझ्या नातीला बघितल्याशिवाय चैन पडत नाही म्हणून अर्धापाऊण तास इथे थांबलो होतो मी !' मी सहज त्यांना विचारलं, 'तुमची नातवंडं फार दूर रहातात का ?' त्यावर कापऱ्या आवाजात ते म्हणाले, 'नाही ग बाळ ! पण माझ्या मुलीला त्यांना वरचेवर मला भेटायला आणणं जमत नाही. वर्षातून एकदा ख्रिसमसला तेवढी भेटतात ती मला ! एखाद्या परक्या माणसाशी वागावं-बोलावं तशी वागतात माझ्याशी ! तुझी मुलगी माझी भाषासुद्धा बोलत नाही, पण सख्ख्या नातवंडांपेक्षा जास्त माया वाटते मला तिच्याबद्दल–बरं, चल–उशीर होईल तुला तुझी कामं आवरायला ! आणि तिच्या पायावर पांघरूण घाल नीट–उद्या भेटू पुन्हा !' माझ्या डोळ्यात अजूनही पाणी येतं त्यांच्या










अनुक्रमणिका

आठवणीने—ती जागा आम्ही त्यानंतर लौकरच सोडल्यामुळे पुन्हा त्यांची माझी भेट झाली नाही. पण कडाक्याच्या थंडीत, निव्वळ आपल्याला 'आजोबा' म्हटल्यामुळे, श्रद्धासाठी अर्धापाऊण तास थांबलेला तो वृद्ध जीव आठवला की पोटात गलबलतं.

दुसरी एक आठवण येते एका वृत्तपत्रातल्या वातमीची. एकवीस वर्षाच्या एका मुलावर स्वतःच्या वडिलांना (आणि त्यांना वाचवायला मधे पडलेल्या आईलाही) गोळी घालून मारल्याचा आरोप होता. मारण्याचं कारण काय तर रात्री उशीरा घरी आल्याबद्दल वडील ओरडले, ते त्याला सहन झालं नाही म्हणे!

विवाहसंस्था इथे जवळ जवळ कोलमडलेलीच आहे. कुणीही, कुठल्याही क्षुल्लक कारणासाठी घटस्फोट मागावा, त्याला काही सुमारच नाही. एका नववधूने (लग्न होऊन एकदोन महिनेच झालेले, वरं का!) नवरा 'मानसिक छळ' करतो या सबबीवर घटस्फोट मागितला. तिने दिवसभर खपून सुंदर सजवलेल्या दिवाणखान्यात म्हणे नवऱ्याने जुनी सायकल दुरुस्त करायला घेतली, पसारा केला, घाण घातली—म्हणजे तिच्या भावनेचा, कष्टांचा विचार न केल्यामुळे तिच्या डोक्यावर असह्य ताण पडला! उस्सेमी जादा म्हणजे तिची बाजू पटून जज्जसाहेबांनी तिच्या बाजूने निकाल दिला!

'मी' आणि 'माझं' ही वृत्ती फार—अगदी लहानापासून मोठ्यापर्यंत! एक दिवस माझी शेजारीण इझाबेल घुसफुसत माझ्याकडे आली. 'बघितलंस नीलॉन, (माझ्या नावाचा खास आंग्ल उच्चार) सगळा माझा routine upset होणार आता! माझी आई सबंध एक आठवडा माझ्याकडे रहायला येते आहे स्कॉटलंडहून!' मी मनातल्या मनात कपाळावर हात मारून घेतला! लग्न झाल्यावर आई आपल्याकडे रहायला येणं ही केवढी अपूर्वाईची गोष्ट वाटते आपल्या मनाला! या बाईचा कसला एवढा routine upset व्हायचा होता हे मला अजूनही कळलेलं नाही! आई काही कायम रहायला येत नव्हती (ती तर तिच्या दृष्टीने Catastrophe च ठरली असती बहुधा)—वरचेवर येण्याइतक्या जवळूनही येत नव्हती! मात्र स्वतःच्या साडेतीन चार वर्षांच्या मुलाला ठेवून कॅनडाला हॉलिडेवर नवऱ्याबरोबर जाताना याच आईकडे त्याला ठेवून गेली होती.

मुलांना फटकून वागवणे हा आणखी एक. यांचा पैलू—लांड्रेटच्या बाहेर बाबागाडीतलं लहान मूल लालबुंद होऊन घसा सुकेपर्यंत रडतं आहे आणि आत आई कुत्र्याच्या पिलाला कुरवाळत उभी हे दृश्य आता नेहमी दिसणारं असलं तरी अजूनही वेड्या मनाला खटकतं! मुलांपेक्षा यांना खरंच कुत्र्यामांजरांचं प्रेम जास्त—(Race Relations Board अस्तित्वात येण्यापूर्वी) यांच्या भाड्याने देण्याच्या जागांवर No Irish; No Coloureds या जोडीला चक्क No Children लिहिलेलं असायचं. एकदा एक बाई आपण मुलांना कसं लहानपणापासून शिस्तीत वाढवलं आहे, याचं कौतुक मला सांगत होती. अगदी तान्हेपणापासून म्हणजे मूल आठनऊ दिवसांचं असल्यापासून मी त्याला वेगळ्या खोलीत झोपवते. रात्री कितीही रडलं तरी मुळीसुद्धा बघत नाही. मूल चार दिवस रडेल, पाच दिवस रडेल, सहाव्या दिवशी निमूट झोपेल! अशी वाढवली तरच मुलं स्वावलंबी होतात. म्हटलं, खरं आहे, इतकी स्वावलंबी होतात की मोठेपणी तुम्हाला ढुंकूनही विचारत नाहीत. ही पुढची गोष्ट म्हटली तरी एवढं तान्हे मूल रात्रभर रडत ठेवायला जीव होतो कसा? अगदी 'नयनांचा दिवा, हाताचा पाळणा' नको करायला पण मूल मुकेने रडत आहे की वरं नसल्यामुळे हे सुद्धा बघू नये का?

६६ साली वेल्समध्ये ॲबरफॅन दरीत एक दुर्घटना घडली. शाळेची सुटी सुरू व्हायची त्याच्या आदल्या दिवशी कडा कोसळला आणि त्याखाली सबंध शाळा गाडली गेली—शाळेत हजर असलेल्या मुलांपैकी अतिशय थोडी वाचली. त्या विशिष्ट दिवशी जी मुलं शाळेत गेली नव्हती ती साहजिकच वाचली. सुटी संपल्यावर ही मुलं शाळेत जाऊ लागली, तेव्हा त्या मुलांच्या पालकांना धमकीवजा पत्रं येण्यास सुरुवात झाली—आमची मुलं जिवंत राहिली नाहीत, तर तुमची तरी का रहावी? आम्ही ती राहू देणार नाही—' असा या पत्रांचा सूर होता. ही सुसंस्कृत वृत्ती म्हणायची की रानटी?

ही सारी उदाहरणं एकांगी आहेत असं समजण्याचं कारण नाही—याच्या कित्येक पटींनी प्रत्यही घडणाऱ्या या घटना आहेत. माझ्या वाचनात, बघण्यात आलेली उदाहरणं मी लिहून काढली इतकंच! विभक्त कुटुंब पद्धती आपल्याकडेही मोठ्या प्रमाणात अस्तित्वात असली तरी 'वृद्धाश्रम' (Old peoples' homes) आपल्याकडे सर्रास निघाले नाहीत, आपल्या अन्नधान्यविषयक बिकट परिस्थितीचा इथे कितीही अवास्तव डांगोरा पिटला गेला, तरी स्वतःच्या चतकोर भाकरीतला तुकडा दुसऱ्याला देण्याची वृत्ती अजूनही सुदैवाने आपल्यात आहे—हाच आपल्या आणि इथल्या संस्कृतीतला फरक!










—शशी देव, लंडन

...'सोहो' मध्ये अनेक 'स्ट्रिपटीज क्लब' आहेत... त्यांचे न थांबता नग्न होण्याचे प्रयोग चालू असतात... बाहेर एजंट लोक जाहिरात करीत असतात—'दहा शिलिंगात मोठ्या स्तनांच्या बायका पहा'...

"A play is an image of human life created in the minds of an audience by the enactment of a pattern of events."

(From The Theatrical Image by James H. Clay & Daniel Krempel).

लंडनमधल्या 'लंच अवर थिएटर'चे प्रयोग पाहिल्यावर मला लहानपणीचा एक प्रसंग आठवला आणि अशाप्रकारे जीवनात हरघडी घडणारे प्रसंग नाटचदृष्टीने किती महत्त्वाचे आहेत आणि 'लंच टाइम प्लेज्'च्या कल्पनेचा आविष्कार भारतातही किती तरी वर्षापूर्वी झालेला आहे याची जाणीव झाली. प्रसंग अगदी साधाच. आम्ही शाळकरी पोरे 'राणीच्या बागे'त सुट्टी म्हणून 'पिक्निक्'साठी गेलो होतो. हास्यविनोद करीत डबे सोडून आम्ही आणलेल्या पदार्थावर ताव मारत होतो. पलीकडच परळमधील काही गिरणी कामगारही 'भाकर' खात बसले होते. एवढ्यात तिथे दोन 'अर्ध्या चड्डी'तली मुलं आली. काहीसे वेडेवाकडे आवाज काढून त्यांनी आमचे लक्ष वेधून घेतले आणि मग सुंदर अभिनय करीत एक पांचट संवाद म्हटला. गिरणी कामगारांची घटकाभर करमणूक करून चार-दोन आणे मिळवून निघून गेली. ह्याहीपेक्षा अतिशय नाटचमय प्रसंग म्हणजे बंगाली बाबूच्या जादूच्या प्रयोगांचा. सुरवातीला सारंगी वाजवून लोकांना आकर्षित करून आपल्या पोतडीतून एकेक चीजा बाहेर काढत अखंड वडवडीच्या सामर्थ्यावर लोकांना तास-दोन तास झुलत ठेवण्याचे सामर्थ्य आपल्याकडल्या डोंबाऱ्यांमध्येही दिसून येते. याशिवाय 'मोहरमचे वाघ' किंवा जत्रेत घेतलेली 'सोंगे' हेही अतिशय नाटचमय प्रकार आहेत. नाटचशास्त्रदृष्टचा मागासलेले असले तरी नाटचवस्तूच्या मानाने अतिशय महत्त्वाचे आहेत, इतकेच नव्हे तर जादूगार काय किंवा डोंबारी काय, नाटचाच्या माध्यमाचा आधार घेऊन प्रेक्षकांना आकर्षित करून 'थाळी'भर पैसेही मिळवतो.

'लंच् टाईम् प्लेज'च्या पाठीमागची कल्पना ही काहीशी अशीच आहे. फक्त ही कल्पना पुढारलेल्या देशात सुसंवादित—शास्त्रबद्ध झाली. लंडनमध्ये सध्या चार 'लंच अवर' नाटक कंपन्या आहेत. ॲम्बियन्स लच् अवर थिएटर, सोहो लंच टाईम थिएटर आणि क्विपू बेसमेंट थिएटर. ह्या कंपन्यांचे प्रयोग बहुधा लंडनच्या 'वेस्ट एण्ड' ह्या भागात होतात. चौथी 'इकारस प्रॉडॉक्शन' ही नाटक कंपनी आपले प्रयोग निरनिराळ्या 'पवज्'(Public Houses)

मवून सादर करत.

'ॲम्बिअन्स लंच अवर थिएटर' स्वतःला 'बहिष्कृत' समजते. कारण ह्या कंपनीस कायमची जागा मिळाली नाही. ह्या कंपनीने आपल्या कार्यक्रमात घोषणा केली होती की, त्यांचे थिएटर एका मोठ्या थिएटर-साठी प्रयोगशाळा (laboratory) बांधीत तेथे नवीन नाटके, नाटयमय प्रसंग, नाटयपोषक कल्पना, अभिनयाची अंगे, मूकाभिनय, प्रेक्षक अनुभूती, भाषणातील कलात्मकता वगैरेंचा प्रयोग–अभ्यास केला जाईल. 'ॲम्बियन्स'चे सुरवातीपासून सर्व प्रयोगमी पाहिले असल्याने मला असं वाटतं की सुरवातीला कठीण वाटणारे प्रसंग आता ते अगदी सहजगतीने सादर करू शकतात.

'ॲम्बियन्स'ने पहिले नाटक १९६९-च्या सप्टेंबरमध्ये सादर केले. हे नाटक सर्वच दृष्टीने लंडनमध्ये नवखे होते. हे नाटक रस्त्यावर सादर केले होते. 'मार्बल आर्च'समोर थोडीशी मोकळी जागा आहे. तिथे बाके टाकून लोकांना बसण्यासाठी जागा केली आहे. दुपारच्या वेळी लोक आपली 'सॅण्डविचेस्' खात इथे बसलेले असतात. अशा तयार प्रेक्षकांचा फायदा घेऊन 'ॲम्बिअन्स'ने Death of a dog हे पहिले नाटक प्रेक्षकांसमोर मांडले. तयार प्रेक्षकांसमोर दोन माणसे रक्तबंबाळ झालेले कुत्र्याचे प्रेत घेऊन येतात. आणि त्याला अनुसरून पुढे त्या दोघांचे संवाद होतात. अर्थात कुत्रा पेंढा भरलेला, त्याचे पोट वरखाली होणे, मरताना त्याची मान टाकण्याची क्रिया वगैरे सर्व कळसूत्री बाहुली-प्रमाणे दाखविले होते; पण नकळत प्रेक्ष-कांना आकर्षित करून 'ॲम्बिअन्स'ने हा प्रयोग अतिशय यशस्वीपणे करून दाख-विला. असे प्रयोग यापूर्वीही झाले होते, पण टीकाकारांनी त्याची विशेष दखल घेतली नव्हती. पण हा प्रयोग चांगलाच डोळयात भरण्यासारखा झाला आणि एका वर्षात 'ॲम्बिअन्स'ने आपला पाय नाटय-सृष्टीत चांगलाच रोवला. या प्रयोगाच्या पाठीमागे,

"I can take any empty space and call it a bare stage. A man walks across this empty space whilst someone else is watching him and this is all that is needed for an act of theatre to be engaged. (Empty space, by Peter Brook–a director of the Shakespeare Company).

हा विचार होता. पुष्कळांच्या मते ही कल्पना फार जुनी आहे. इतकी जनी की आदिमानवाने दगडी भाला घेऊन पहिली शिकार केली व ती दुसऱ्याने पाहिली व या पहाण्याची त्याला जाणीव होती, इतकी जुनी. ही कल्पना कदाचित न्यूयॉर्कच्या "off, off Broadway"च्या नाटकी जगातूनही आली असावी. नाटय प्रेमिकाची 'पंढरी', 'लंडन की न्यूयॉर्क?' असा संशय वाटावा इतके महत्त्व न्यूयॉर्कला आले आहे. न्यूयॉर्कमध्ये "Bread and Puppet Theatre" कंपनी ही 'Pavement Artists' म्हणून प्रसिद्ध आहे. या कंपनीचा निर्माता 'पीटर शूमन' याने मूळचा मूर्तिकार असूनही त्या माध्यमाने लोकात जागृती होत नाही म्हणून नाटक कंपनी निर्माण केली. त्याचे वर्णन टीकाकार असे करतात की, "He is fiercely radical artist, dealing in simple human truths a propagandist, a magician, a purist and certainly the most coura-geous and probably the most gifted man..........."

त्याच्या नाटकातील पात्रे रस्त्याच्या बाजूने चित्र-विचित्र पोषाख करून मोठमोठाल्या बाहुल्या, चित्रे, देखावे व संवाद घेऊन वर-खाली चालत रहातात. त्याची नाटके अतिशय परिणामकारक वठतात. अशा बाहुल्यांच्या वा चित्रांच्या माध्यमातून कथा सादर करणे ती त्याची कल्पना "the Pied Piper of Harlem" ह्या त्याच्या नाटकांत कलावंत दहा-बारा फूट उंच बाहुली "अंकल सॅम" ह्या नावाने फिरवत व ती प्रेसिडेण्ड 'जॉन्सन'सारखी दिसे. अशा तऱ्हेचे 'टॅब्लो' लहान मुलांनाही समजत किंबहुना, "we try to make our plays good enough to be understood by kids" असा 'पीटर शूमन'चा दावा असे.

दुसऱ्या सादर केलेल्या नाटकाची सुर-वात अशी : एका देवळाच्यान 'मेरी' बसली आहे व तिच्या मांडीवर एक रक्तबंबाळ मृत बालक आहे. मेरीचे कपडेही रक्ताने माखले आहेत आणि तिच्यापुढे असा बोर्ड ठेवला आहे, "I am Mary, my baby was napalmed in 'Vietnam' पण विचार करायला लावणे ह्याबरोबरच मनोरंजन करणे हाही नाटकाचा हेतू आहे. "हाईड पार्क कॉर्नर"ला एका नाटय-विद्यालयातील विद्यार्थ्यांच्या ग्रूपने काही नाटय कल्पना सादर केल्या. त्या सांगण्या-सारख्या आहेत. पहिली अशी की, कलावंत एकापाठोपाठ वर्तुळाकार चालत व 'डाय-रेक्टर' हर्ष, क्रोध, हास्य वगैरे भावना व्यक्त करायला सांगेल त्याप्रमाणे कलावंत ती भावना व्यक्त करीत. दुसरी कल्पना काहीशी असंबद्ध भाषणासारखी. दोन कलावंतांनी अशा तऱ्हेने संवाद करायचे की पहिल्याच्या बोलण्याचा दुसऱ्याच्या बोलण्याशी काहीही संबंध नसावा. उदा-हरणार्थ एकाने म्हणायचे, "London is big and beautiful. तर दुसऱ्याने म्हणायचे, "war in Vietnam is disgusting." अशा तऱ्हेने पाच-दहा मिनिटे संवाद चालू ठेवायचे.

तिसरी कल्पना अशी की दोन कला-वंतांनी शेजारी शेजारी बसून कुठल्यातरी विषयावर कपोलकल्पित गोष्ट सांगायची. उदाहरणार्थ, एक म्हणेल की, मी आफ्रि-केत एक चमत्कारिक झाड पाहिले. यावर दुसरा म्हणेल, 'हो त्याला लोखंडाची पाने होती' मग पहिला म्हणेल, "बरोबर. ती पानं दहा दहा फूट लांब होती अशा प्रकारे सबंध संवाद अवास्तव पण अशा प्रकारे सादर करायचा की क्षणभर प्रेक्षकाला सर्व काही वास्तव वाटावे.

चौथा प्रसंगही असाच मजेदार असे. एक कलावंत बोलत राही व दुसरा कलावंत त्याच्या पाठीमागे जाऊन पहिल्याच्या वगले-










तून हात बाहेर काढून त्याच्या संभाषणा-प्रमाणे बरोबर हातवारे करी.

एवढी 'लंच् अवर प्लेज्'च्या हेतूची चर्चा केल्यावर मी पाहिलेल्या काही नाटकांची काही माहिती दिली तर ती योग्य होईल. 'अॅम्बियन्स थिएटर'ने सादर केलेल्या दुसऱ्या नाटकाचे नाव होते "Strip-tease" ते 'स्लॉमीर म्रोझक' या पोलिश लेखकाचे होते. नाटक तसे जुनेच पण 'अॅम्बियन्स'ने पहिल्यांदा ते इंग्लिश भाषेत सादर केले. नाटक दुपारी 'लंच'च्या वेळी 'वेस्ट अेण्ड'मधील 'सोहो' ह्या रंगेल भागातील "Green Banana Restaurant च्या तळघरात सादर केले. 'सोहो'–मध्ये अनेक 'strip-tease Club' आहेत. त्यांचे न थांबता नग्न होण्याचे प्रयोग चालू असतात. अशा क्लबच्या बाहेर तिकिट एजंट उभे राहून "दहा शिलिंगात मोठ्या स्तनांच्या बायका पहा" अशी जाहिरात करत लोकांना आकर्षित करतात.

तशाच तऱ्हेची घोषणा 'ग्रीन बनाना क्लब''च्या बाहेर उभे राहून 'अॅम्बिअन्स थिएटर'चा एजन्ट करी, "see strip-tease in half a crown." दोन शिलिंग सहा पेनी एवढ्या स्वस्त 'स्ट्रिपटीज्' पहायला मिळतात तर का पाहू नये?.... पण आत आल्यावर प्रेक्षकांच्या आकांक्षांना मोठाच धक्का बसे. मध्यभागी एक चौकोनी स्टेज सोडून भोवती तीस-चाळीस खुर्च्या प्रेक्षकांसाठी मांडल्या असत. बरोबर सव्वा वाजता अंधार होई व चौकोनी स्टेजवर प्रकाश सोडला जाई. 'दोन कारकून छाप' मध्यमवर्गीय गृहस्थाना दोहोबाजूंनी दोन लांब हात ढकलत. दोघेही एकमेकांना अपरिचित. दोघांनाही आपल्याला ह्या दारे बंद असलेल्या खोलीत का ढकलले ते समजत नाही. ते एकमेकांशी ह्यावर चर्चा करतात. मग एका दारातून एक हात येतो. दोघांपैकी एकास बोलावून त्याला त्याचा कोट-सदरा काढायला खुणावतो. तो घाबरून तसे करतो. दुसऱ्या दारातून दुसरा हात येऊन दुसऱ्याला तेच करायला खुणावतो पण त्याला ते सहन होत नाही. तो पहिल्याला आपण काहीतरी केले पाहिजे असे सांगून सुटण्याचा मार्ग शोधू लागतो. त्या दोघात संघर्ष होतो. जो काहीतरी केले पाहिजे असे म्हणतो त्याचे सर्व प्रयत्न फुकट जातात. व दरवेळी एक एक हात आत येऊन एकापाठोपाठ त्यांची सर्व वस्त्रे मागून घेऊन जातो. शेवटी ते नग्न झाल्यावर दोन हात क्रूर रीतीने त्यांना ठार मारतात. हे नाटक पुष्कळसे 'सॅम्युअल् बेकेट'-च्या "waiting for Godot" सारखे गहन आहे. "तुझ्या पुढे माझ्या पुढे अंधाराचा हत्ती झुले" या करंदीकरांच्या ओळीचीही आठवण होते.

'सोहो थिएटर'ने सादर केलेले एक मजेदार नाटक म्हणजे "Mrs. Gladys Moxon" ह्या नाटकाची कथा रात्री रेडिओवर रेकॉर्डस् वाजवणाऱ्या 'डिस्क जॉकी'च्या भोवती आहे. पश्चिमेच्या जगात ह्या 'डिस्क जॉकी'ची प्रसिद्धी फार. रेडिओवर लोकांच्या आवडीची गाणी ते वाजवतात व त्यावर मजेशीर 'कॉमेन्ट्री' करतात. तरुण मुलामुलींचे ते अतिशय आवडते. जेवढे 'पॉप् सिंगर'ला महत्त्व तेवढेच यांनाही मिळते. पगारही मोठा मिळतो. असाच एक 'डिस्क जॉकी' अशा दृष्टीने यशस्वी झाला तरी खाजगी जीवनात अयशस्वी आहे. हजारो पौंड मिळाले तरी परीक्षेत नापास झाल्याची त्याला खंत आहे. त्याची आई त्याला अजून आपल्या छत्राखाली ठेवू पहात आहे. त्याची प्रेयसी तो केवळ 'डिस्क जॉकी' आहे म्हणून त्याच्यावर प्रेम करते याचा त्याला तिरस्कार आहे. एकदा त्याला त्याच्या 'मित्र' लोकांची पत्रे येतात. त्यात Mrs. Gladys Moxon-चेही पत्र येते. त्यावर तो भाळतो व दिवास्वप्न पाहू लागतो. तिला उद्देशून प्रेमाने तिच्या आवडीची रेकॉर्ड वाजवतो. ती वाजवल्यावर लगेच तिचा त्याला फोन येतो. (इकडल्या जगात अशा प्रकारे रेडिओ-टेलिव्हिजनला फोन करणारे लोक पुष्कळ आहेत) आणि संभाषणावरून असे समजून येते की, ती बाई म्हातारी असून तिला नातवंडेही आहेत.

"Lime Light' मधील जगावरच 'क्विपु बेसमेंट थिएटर'ने आपले 'The Theatre of Death' नावाचे 'फिलिप मार्टिन' नावाच्या लेखकाने लिहिलेले नाटक सादर केले. त्यात 'हॉलीवूड'-मध्ये सिनेमाच्या 'अफाट' गोष्टी लिहिणाऱ्यांची व तसे सिनेमा सादर करणाऱ्यांची खूप टिंगल केली आहे.

'अॅम्बियन्स थिएटर'ने एका वर्षात अनेक नाटके सादर केली. त्यापैकी "The education of skinny spew", "The normal woman", आणि 'Tyyppi'ही तीन 'abnormal' लोकांवर आहेत. "The normal woman"-मध्ये एक टेपरेकॉर्डर एका बाईची मुलाखत घेत आहे. बाई त्याच्या प्रश्नांना उत्तरे देते.





अनुक्रमणिका

मी 'normal' आहे येथपासून ती सुरवात करते. टेपरेकॉर्डर ती आपल्या मुलांना कसे वागवते यावर बारीक सारीक प्रश्न विचारतो. व यातून हळूहळू दिसू लागते की सुरवातीला 'normal' म्हणवणारी बाई मुलांच्या अधःपाताला कारणीभूत आहे व वरवर 'normal' दिसली तरी खरी ती 'abnormal' आहे.

लंडनच्या रंगभूमीवर सध्या 'लैंगिक' गोष्टींचा सुकाळ आहे. स्त्री-पुरुषांतील सरळ प्रेमावर नाटक लिहिणारे लोक नाहीसे झाले असावेत किंवा साध्या - भोळ्या प्रेमकथात क़ाहीतरी विपरीत आहे असे वाटत असावे किंवा जीवनातला सरळपणाच नाहीसा झाला असावा नाहीतर इतकी विपरीत नाटके एवढ्या थोड्या वर्षांत लंडनमध्ये दिसली नसती. "Boys in the band" किंवा "Enemy" आणि Find your way home" तसेच "come as you are" ह्या नाटकांचा विषय "Homosexuality" हा आहे. लैंगिक बाबतीतील मोकळेपणावर "Hair, Paradise now, oh ! Calcutta" अशी नाटके आहेत तर धर्माआड राहून चाललेल्या लैंगिकतेवर "Council of love, Ab elar d Heloise, Flint" यांसारखी तर केवळ नग्न होण्यावर "Pyjama tops, the bed" अशी विपुल लैंगिक नाटके अतोनात गर्दी खेचतात.

असे असताना 'Lunch time Theatre'—वर त्याचा परिणाम न होईल तर नवलच. वर उल्लेखलेल्या नाटकांसारख्या लैंगिक नाटकांना शह देण्यासाठी म्हणूनच की काय पण 'अॅम्बिअन्स थिएटर'ने 'Hymn Book' नावाचे नाटक चर्चच्या पार्श्वभूमीवर सादर केले. त्यात भोंदू धर्ममार्तंडांची, त्यांच्या नावावर लैंगिक प्रकार करणारांची, काळे-गोरेपणाची, Homosexuality ची, लैंगिक बाबतीतील मोकळेपणाची वगैरे सर्व प्रकारांची टिंगल उडवली आहे.

याशिवाय 'काळा-गोरा' ह्या दुहीवर सुरेख रंगवलेले नाटक म्हणजे "White poem" वरील सर्व नाटकांवरून 'Lunch time Theatre' चा उद्देश सहज लक्षात येण्यासारखा आहे. 'थोड्या वेळात, थोड्या जागेत, थोड्या 'मेकअप्'ने, थोड्या प्रसंगांनी, थोड्या प्रेक्षकांसाठी थोड्या नाटकी प्रकारांनी किंवा अभिनयाने जीवनाचा अधिक अर्थ अनुभूत करून देणे—आणि ह्या दृष्टीने पुष्कळशी नाटके यशस्वी झाली आहेत. यासाठी कधी कधी तयार प्रेक्षकांची संधी साधून नाटक सादर केले जाते तर कधी कधी प्रेक्षकांना बोलावून अभिनय केला जातो. अशा तऱ्हेने परंपरागत चालत आलेल्या ह्या नाट्य प्रकाराला 'शास्त्रबद्ध' स्वरूप देण्याचे काम करण्यात ह्या सर्व नाटक कंपन्या यशस्वी झाल्या आहेत. तेव्हा 'Lunch time plays' हे नाट्यदृष्टीतील टाकलेले पुढचे पाऊल म्हणायला हरकत नाही.

• • •

(आहात तयार लग्नाला ?)



## पब

ब्रिटनमधील Pub म्हणजे एक संस्थाच आहे जणू ! झिंगून पडण्याचे, वाटेल तशी बडबड करण्याचे, वेडेवाकडे चाळे करण्याचे ठिकाण म्हणजे Pub नव्हे ! निदान येथील तरी इंग्लीश माणूस पब्मधे अनेक कारणांसाठी जातो, बरेच वेळा मात्र काही कारण नाही म्हणून जातो. Pub मधील वातावरण मोठं मजेशीर असते. उजेड पाडण्यासाठी लावलेले दिवे अंधारच जास्त करतात. एका कोपऱ्यात Dart चा खेळ चालू असतो. दारू पिऊनसुद्धा हा खेळ खेळणाऱ्यांचे मला कौतुक वाटतं. दुसऱ्या कोपऱ्यात 'पिण्यात' गेलेले पैसे 'खेळण्यात' वसूल करण्याचा प्रयत्न Fruit Machine मधून केला जात असतो. ओळख करून दिल्याशिवाय दुसऱ्याशी न बोलणारा इंग्रजी माणूस Pub मध्ये आपणहून बोलतो. ऑफिसमधे आपलं काम न करणारी Secretary अन् तिच्यावर रागावणारा तिचा Boss संध्याकाळी Pub मधे मात्र हास्यविनोदात एकत्र Drinks घेताना दिसतात.

Pub मधे किंवा Pub बद्दल अनेक चढाओढी अगदी जाहीर प्रमाणात ठेवल्या जातात. जिंकणाऱ्याला भरघोस बक्षिसे मिळतात. Pub of the Year, Bar Maid of the Year. ह्या दोन स्पर्धा नुकत्याच झाल्या. २१३ वर्षांपूर्वी एका माणसाने ब्रिटनमधल्या ५००० चे वर Pubs ना भेटी देण्याचा विक्रम केला होता.

गेल्याच आठवड्यात २३ वर्षांच्या मुलीने वर्तमानपत्रात जाहिरात दिली होती. तिला लग्न करावयाचे होते. तिच्यापाशी पैसे होते व मनात नवीन पब उघडावयाची महत्त्वाकांक्षा होती. म्हणून तिने 'पब चालवू शकणारा मनुष्य नवरा म्हणून पाहिजे आहे' अशा तऱ्हेची जाहीर मागणी केली होती. अजून तिचं लग्न झालं नाही तेव्हा आपल्यापैकी कुणाला Interest असेल तर.....

—चित्रकार यशवंत माळी.

**...लंडनला तुम्ही कधी गेला आहांत ? ... नाही ना ? ... तर मग सौ. नलिनीबाईबरोबर चला जरा फेरफटक्याला ! कौटुंबिक महत्वाची ठिकाणं पाह्यला मिळतील तुम्हांला ... तुम्ही लंडन यापूर्वीच पाह्यलं असलं तर पुनःप्रत्ययाचा आनंद होईल तुम्हांला...मग निघता ना ?...**




सौ. नलिनी नारायण बोकील,

**-लंडन**

**नीला** : हॅलोऽऽ नीला स्पीकींग.

**वीणा** : अय्याऽऽ नीला ? दोन महिन्यांनी का होईना पण तुला माझी आठवण झाली हे काय कमी आहे.

**नीला** अग काय सांगू ! रोज तुला फोन करीन करीन म्हणते आणि काही कारणांनी राहून जात होतं; खरंच घरी फोन असला म्हणजे बरं असतं. केव्हाही कुणाशी बोलता येतं, प्रत्यक्ष भेटलं नाही तरी चालू शकतं. बरं जाऊ दे. कसं काय वाटलं लंडने ? करमतं का नाही ?

**वीणा** अग पहिला महिना अगदी कंटाळवाणा गेला, अगदी एकटं घरात बसायचं, कुणी बोलायला नाही की कुणाकडे जाऊन बसता येत नाही; तुम्ही सगळ्या नोकरीवाल्या. रोज पोस्टमनची वाट पहात बसायचं. घरच्या, मित्रमैत्रिणींच्या आठवणी काढत बसायचं. पण आता जरा माझा वेळ जातो, अगदी आठवडा कसा जातो पत्ता लागत नाही. आमच्या घरापासून जवळच एका ऑफीस-मध्ये मला पार्टटाईम जॉब मिळाला आहे. सोमवार, मंगळवार, बुधवार आणि शुक्रवारी जावं लागतं.

**नीला** मजा आहे की तुझी ! अगदी लकी आहेस बाई. तुला तसा लौकर जॉब मिळाला, नाही ? अग सुमित्रा तर जवळ जवळ तीन चार महिने प्रयत्न करीत होती. मला सुद्धा तब्बल दोन महिने घरी बसायला लागलं होतं. हा जॉब तुला एजन्सीतर्फे मिळाला का ग ? का असाच ?

**वीणा** हो. आल्फ्रेड एजन्सी तर्फे मिळाला. खरंच किती हेल्पफुल असतात नाही त्या एजन्सीज ! परत आपल्यासाठी सर्व फुकट मेहनत करतात. ज्या कंपनीत जॉब मिळेल त्या कंपनीतर्फे त्यांना मोबदला दिला जातो म्हणे. कंपनी खूप, एजन्सी खूप आणि आपल्यासारखे लोकही खूप. अग काय सांगू अक्षरशः अर्ध्या तासात तिने मला आमच्या सर्व ॲक्टन एरियात नुसत्या फोनने घुमवून आणलन ! ती, ती म्हणजे कोण तुला माहीत आहेच.

**नीला** एजन्सीमधील रिसेप्शनिस्ट नं !

**वीणा** हं. माझ्यादेखत पंधरा मिनिटात दहा बारा कंपन्याना तिने फोन केलेन आणि व्हेकन्सीजबद्दल चौकशी केलीन्. त्यातून माझ्यासाठी तीन इंटरव्ह्यूज ॲरेन्ज केलेन आणि दुसऱ्या इंटरव्ह्यूमध्ये मी सिलेक्ट झाले. काम देखिल तसं बरं आहे, त्यातून पार्टटाईम असल्याने आठवड्यातून तीन दिवस रिकामी.

**वीणा** नितिन काय म्हणतो ? मी त्याला बघितलाच नाही ! नाही का ग ? दोन वर्षाचा की तीन वर्षाचा झाला ?

**नीला** : मागच्याच महिन्यात तीन वर्षाचा झाला. त्यामुळे मला बरीच मोकळीक मिळते. तीन वर्षानंतर प्ले ग्रुपमध्ये जागा

मिळते. आठवड्यातून चार दिवस जातो तिकडे आणि गुरुवारी ठेवते बेबीसीटरकडे. ऑफीस सुटल्यावर नरेश नाहीतर मी त्याला घेऊन येतो. माझी मैत्रिण मीना नानल चालली आहे उद्या इंडियाला तिलाही भेटायचं आहे आणि थोडं शॉपिंग.

**वीणा** मग माझ्याकडेच ये ना! आपण दोघी shopping करू. Oxford Circus ला, sale लागला आहे.

**नीला** खरंच जायचं का तिकडेच, तेथून वॉरन स्ट्रीटही जवळच आहे तेथे म्हणे पाठकची लोणची आणि आपला साबूदाणा मिळतो.

**वीणा** मी पण ऐकलं आहे, पण अजून गेले नाही कधी. हो, पण वीरेन्द्र घरी यावयाच्या आत आपण परत येऊ का ग? कारण बस टयूब करत परत येताना दीड तास तोच गेला. आणि कमीत कमी दोन तीन तास तरी हिंडायला नकोत का?

**नीला** येऊ ग परत आपण, त्याची नको तू काळजी करुस. वरं ऽऽ मी मीराकडे जाऊन येतेच तुझ्याकडे.

* *

टिंग् टिंग टिंग्

**वीणा** येस् कम–इन याऽऽ बाईसाहेव. इथेच साडेबारा वाजविलेत तुम्ही.

**नीला** अग काय सांगू तुला! माझ्या आणि मीराच्या वादावादीत किती वाजले ते मला कळलंच नाही. आय ॲम व्हेरी सॉरी वीणा. अगदीच स्टपीड आहे ग ती? इंडियात परत चाललो आहोत म्हणजे अगदी कुठे मागासलेल्या देशात चाललो आहोत असं तिला वाटत आहे. इथून काय काय म्हणून तिनं वरोबर घेतलं नाही ते मला विचार. अगऽऽ टी. व्ही. सेट, टेपरेकॉर्डर, कॅमेरा हे ठीक आहे; सर्वच नेतात. पण तिनं फेअरी लिक्वीड, व्रिलो, डयुएल एक्स्ट्रॉ हे देखिल घेतलं आहे; म्हणे पार्वतीला देणार आहे भांडी घासताना आणि मुंबईतलं रेशनिंग उठलं नाही असं तिला मावशीच्या पत्रातून कळलं, तर वासमती तांदूळही कपड्याच्या खाली वॅगमध्ये ओतून भरून घेतले आहेत. आणखी तिची एक गंमत तुला सांगितली तर तू आश्चर्यचकीत होशील. तिनं केशर काय, जायफळ काय, पिस्ते काय, ओव्हरकोटाच्या पाठीत शिवून घेतले आहेत. कमाल आहे की नाही तिची? निदान तिच्या सारख्या सुशिक्षित श्रीमंत वर्गात मोडणाऱ्या बाईला हे शोभत नाही. मला तर तिचं हे वागणं अगदीच चीप वाटतं बाई.

**वीणा** साड्या घेतल्या की नाही!

**नीला** इश्श, न घ्यायला काय झालं! जपानीज नायलॉन्स घेतली आहेत तिकडे विकायला.

**वीणा** कोण आहे तिचा नवरा? मला वाटतं ती पण चांगली डॉक्टर का काहीतरी आहे ना?

**नीला** ती स्वतः डॉक्टर आहे. नवरा चांगला आर्किटेक्ट आहे. सासर, माहेर दोन्ही गडगंज आहे. तरी हाव म्हणून सुटत नाही.

**वीणा** जाऊ दे ग तू कशाला उगीच डोक्याला त्रास करुन घेत आहेस?

**नीला** तसं नाही ग. पण ह्या वाया वर्षा, दोन वर्षासाठी इथं येतात आणि असे उद्योग करुन जातात. कस्टममध्ये पकडल्या गेल्या तर ह्यांचं नाव वदनाम होतंच, पण आपणही त्याच्यात मोडतो. त्यामुळे नकळत आपलंही नाव खराव होतं. टी. व्ही. वरुन, वर्तमानपत्रांमधून इथं लगेच इंडियन्स लोकांविरुद्ध बोंबाबोंब होते.

**नीला :** एऽऽ तुझं किचन किती छान आहे नाही! शेअर करतेस? का तुझंच एकटीचं!

**वीणा** नाही बाई. मला नाही किचन शेअर करायला आवडत. इथं ती कटकट नाही ते वरं आहे.

**नीला :** मी प्रथम आले ना तेव्हा मला लॅण्डलेडीवरोवर किचन शेअर करावं लागायचं. काय बाई तिची कटकट चालायची. तो इंडियन फूडचा वास तिला आवडायचा नाही, मग ती आधी स्वयंपाक करायची. मग मी करायचा. सतराशे मानगडी.

**वीणा** आमचा फ्लॅटच फर्निश्ड आहे. त्यामुळे सर्व सुखसोयी उपलब्ध आहेत. पण भाडंही छान आहे. बारा पौंड दर आठवड्याला म्हणजे जवळजवळ २२५ रुपये.

**नीला** कमाल आहे तुझ्या चिकटेपणाची. अग स्वतंत्र किचन, लाऊन्ज, वेडरूम, सेपरेट बाथरूम एवढ्याला बारा पौंड काहीच नाहीत; परत फर्निश्ड हाऊस. तू इतरांची घरं बघ मग कळेल! अग तू वीरेन्द्रला घर घ्यायला सांग. इथं घर घेणं अगदी सोपं आहे. हौसिंग सोसायटी जवळ जवळ थ्रीफोर्थ कर्ज देते. फक्त वनफोर्थ आपण भरायचे व दर तीन महिन्यांनी किंवा महिन्यानी हप्ते भरत रहायचे. हप्ता खपच कमी पडतो. घरात तुम्ही जितक्या सुधारणा कराल तशी तशी घराची किंमत वाढत जाते. ह्या सुधारणा करण्यांसाठीही हौसिंग सोसायटी भरघोस मदत करते.

**वीणा** अगं इथं कुठं आम्हाला कायमचं रहायचं आहे!

**नीला** का दोन चार वर्षे तरी तुम्ही इथून जाणार नाही ना. दोन चार वर्षांनी घर विकून टाकायचं. घराची किंमत घेतलेल्या घराच्या किंमतीहून निश्चितच वाढलेली असते. त्यामुळे हौसिंग सोसायटीला ठरलेली किंमत देऊन उरलेली आपली. असंही करता येतं.

**वीणा** वरं वरं. चल आता आपण निघूया.

**नीला** हे काय! तू नुसताच स्वेटर घेतलास की काय? अग हा काही इंडिया नाही, असं नुसत्या प्युअर सिल्कच्या साडीत भटकायला. इथं हवेचा भरवंसा नाही. आत्ता ऊन दिसतं आहे. पण मध्येच वारं सुटेल तर मध्येच पाऊस येईल. इथं दिवसात चार ऋतू दिसतात. कोट नाही तर निदान स्वेटर तरी बरोबर घ्यावयाचास.








अनुक्रमणिका

**वीणा :** अग तिकडची इतक्या दिवसाची संवय दोन महिन्यातच कशी जाईल! मी बरेचदा घरातले स्लीपर्स तर घालून बाहेर पडते, नाहीतर कोट तरी विसरून बाहेर पडते.

**नीला :** तुझ्या घराजवळ ओल्ड पीपल्स होम आहे वाटतं! तिथे दोघं तिघं वृद्धमंडळी खुर्च्या टाकून बसलेली दिसत आहे म्हणून विचारलं.

**वीणा :** हो ऊन पडलं की बसतात तासन् तास बाहेर येऊन. पण एक म्हातारा शेजारच्या म्हाताऱ्याशी बोलत नाही की एक म्हातारी उठून दुसऱ्या म्हातारीजवळ जाऊन बसत नाही. नुसते पुतळे मांडल्यासारखे दिसतात.

**नीला :** बरं बाई ह्या माणसांना म्हातारपणी कसली चिंता नाही. आरामात, सुखात आयुष्य घालवावं; शांतपणे मरून जावं. सरकार सर्व काळजी करतं.

**वीणा :** सरकार काय काळजी करतं? हे असं जिणं जगण्यापेक्षा मेलेलं चांगलं मी म्हणेन. मला नोकरी नव्हती तेव्हा ह्या ओल्ड पीपल्स होमवरही मी अधूनमधून लक्ष ठेवायची. कसं एक्कलकोंडं, भुतासारखं जिणं हे लोक जगतात. क्वचितच कुणी त्यांना भेटायला आलेलं दिसतं. मला वाटतं की अगदी एखाद्या मरायला आला की त्याला ते भेटायला येत असावेत, कारण एक दोन दिवसातच तेथून एखादी पेटी बाहेर येताना दिसायची.

दवाखान्यात तर मी कित्ती वृद्ध मंडळी रखडत रखडत येतांना आणि जातांना पाहिली आहेत. पण इथं दवाखान्यात औषध कुठं मिळतं! ते मिळतं केमिस्टकडे. डॉक्टर नसत्या औषधाच्या चिठ्ठ्या फाडणार. त्यातून ब्लडटेस्ट, युरीन टेस्ट असले काही प्रकार असले की आणखी एखाद्या हॉस्पिटलमध्ये जायचं. इतकं सगळं करून येईपर्यंत हे लोक मला वाटतं मरूनच जात असतील. आणि डॉक्टर्ससुद्धा बघितले मी. त्यांना पेशंटस्ची पर्वा नसते. कारण त्यांना पगार मिळतो. सरकारकडून. पेशंटस्कडून त्याला काहीच प्राप्ती होत नाही. त्यामुळे सहानुभूती, प्रेम ह्या गोष्टी त्याच्याकडे चुकूनही मिळत नाहीत. तिऱ्हाईतासारखा तो सर्वांकडे बघतो. नाहीतर आमचे फॅमिली डॉक्टर कित्ती चांगले आहेत. सर्दी पडशालासुद्धा फोन केला की येतात.

**नीला :** सर्दी पडशाला येतात खरं. पण व्हिजिट फी किती लावतात माहीत आहे ना? ते इथं नाही. इथं सर्व तुम्हाला फरी आहे. कितीही महागाईची औषधं फक्त अडीच शिलींगाला मिळतात. शरीराच्या सर्व टेस्टस् मोफत होतात. बाळंतपणं मोफत होतात. आपल्याकडे बाळंतपणाचं किती प्रस्थ असतं. माहीत आहे ना तुला! तसंच इथं प्रत्येक व्यक्तीचं एक मेडिकल कार्ड असतं. त्याच्या मेडिकल हिस्ट्रीचं एक नोटबुक असतं. ती व्यक्ती जेथे जेथे जाईल तेथे तेथे त्याची मेडिकल हिस्ट्री जाते. इथं जसे तोटे आहेत तसेच फायदेही आहेत ते आपल्याला विसरता कामा नये.

**वीणा :** एऽऽ बस आली बरं का. तुझ्याकडे सुट्टे सहा






पेन्स आहेत का नाहीतर मी देते. म्हणा नसले तर ड्रायव्हर देईलच तुला.

**वीणा :** मला ह्या वन् मॅन बसेस फार आवडतात. सहा पेन्समध्ये कुठेही जा आणि कुठेही उतरा. मशिनमध्ये पैसे टाकून बसमध्ये चढलं की, तिकीटासाठी कंडक्टरची वाटही बघायला नको.

**नीला :** हल्ली प्रत्येक स्टेशनवर हे मदत मागणारे दिसतात. इथंही कुणीतरी व्हायोलीन वाजविणारा दिसतो आहे. इथं भीक मागायला बंदी आहे म्हणन पोट भरण्यासाठी आपल्या कलांचे प्रदर्शन करावे लागते या बिचाऱ्यांना.

**नीला :** प्रत्येक दिवशी निरनिराळे मदत मागणारे दिसतात; परंतु स्वतःहून हे कधीच मदत मागत नाहीत; फक्त पुढे हॅट ठेवलेली असते. नाहीतर आपल्याकडचे भिकारी नुसते अंगाशी येतात.

**वीणा :** अग ट्यूब उभीच आहे. पळूया आपण नाहीतर सुटेल.

**वीणा** हळू बरं का. इतकी काही धडपड करू नकोस. दर दहा मिनिटांनी ट्यूब आहे. "नो स्मोकींग"च्याच डब्यात बसू. मला नाही तो धूर आवडत.

**नीला :** मलाही नाही आवडत. कशा बाई इकडच्या मुली एकावर एक सिगरेटस् ओढतात कुणास ठाऊक. आमच्या सेक्शन-मध्ये परवा एक स्कूललीव्हर लागली, असेल चौदा पंधरा वर्षांची पण सारखी सिगरेट ओढत असते. मला नाही ऑफीसचं वातावरण आवडत; एखादवेळेस मी त्या मुलामुलींच्यात मिक्सअप् होऊ शकत नाही म्हणूनही असेल, पण नाहीच ते त्या मुलामुलींची सर्वच वेगळं पडतं. नुसत्या बॉयफ्रेण्डस्च्या गप्पांमध्ये रंगलेल्या असतात. कुत्र्या मांजरांचाही विषय त्यांना पुरतो. इथं प्राण्यांचं फार कौतुक करतात नाही ! एकसुद्धा बेवारशी कुत्रं किंवा मांजर रस्त्यावर फिरताना दिसत नाही. आपण ह्या मुलींच्यात मिक्सअप् झालो तर छान वातावरण ऑफीसात असतं. आपल्याकडचा तो साहेबाचा दबदबा, तो प्यूनचा सुळसुळाट तसंच ऑफीसचा कंटाळवाणा मूड दिसत नाही. वरचा बॉस अगदी नेहमी सर्वांच्यात मिळून मिसळून असतो. इथं प्यून्स नसतातच त्यामुळे स्वतःची खोली झाडण्यापासून टापटीप ठेवायचं काम प्रत्येकाचं असतं त्यातून बॉसचीही सुटका होत नाही.

**वीणा :** अग, प्रथम आमच्या बॉसने मला खाली पडलेला कचरा झाडून घ्यायला सांगितलं तर मी इतकी वैतागले होते अगदी नोकरीच सोडणार होते; हे कसलं गड्याचं काम मला सांगितलं म्हणून.

*　　　*

**वीणा :** मला ह्या अंडरग्राऊण्ड ट्यब्ज खूप आवडतात पण ही एस्केलेटरवरची कसरत आवडत नाही. प्रत्येक वेळेस मी धडपडते.

**नीला** अगं प्रथम प्रथम माझंही असंच व्हायचं; पण एकदा सवय झाली की मग काही त्रास नाही. आपण जसं नेहमी चालतो तसं सरळ चालत जायचं आणि सरळ उतरायचं. तसा काही ह्या फिरत्या जिन्यांचा वेग फार नसतो. फक्त ताशी दोन मैल असेल.

**वीणा** ए ती तिकडे गर्दी कसली दिसते ?

**नीला** अग ते "हरे कृष्ण"वाले असतील.

**वीणा** वीरेन्द्रनी ह्यांच्याबद्दल मला सांगितलं आहे. मला बघायचं आहे त्यांना.

**नीला** इश्श त्या सोंगांना काय बघायचं आहे. फॅशनच्या नावाखाली आपल्या धर्माची टिंगल चाललेली आहे. काय ती भगवी वस्त्रं घालतात आणि डोक्याला फक्त शेंडी ठेवतात आणि रस्ताभर "हे कृष्णा, हे रामा, अहं त्वं भजामि" म्हणून काय नाचत असतात. मला तर फार राग येतो त्यांचा.

**वीणा** अय्या त्यांच्याबरोबर मुलीपण आहेत वाटतं. त्यांनी बघ कसली ढगळ ब्लाऊज, पांढऱ्या कफन्या आणि गंधाचे टिळे लावले आहेत. आणि त्या पलीकडच्या दोघी बघितल्यास का ? त्यांनी तर सुंकली घातली आहेत नाकात. ए पण तू काही म्हण त्यांच्या गोऱ्या रंगाला काहीही चांगलं दिसतं नाही ?

**नीला** आता चलतेस का बाई ? त्यांचं कौतुक पुरे झालं.








अनुक्रमणिका

**नीला** : जरा 'सेल्फरिजेस'मधे चक्कर मारून यायचं का? किती छान दिसतात इथले ड्रेसेस नाही?

**वीणा** : तुला काही घ्यायचं आहे का? असेल तर जाऊ. नाही तर कशाला जायचं? (जातात)

* * *

**वीणा** : अग, हा ड्रेस मला आवडला आहे खरा. पण किंमत फारच वाटते नाही का? दहा पौंड म्हणजे दोनशे रुपये झाले!

**नीला** अग तू रुपयात हिशोब करशील तर इथे सर्वच तुला महाग वाटेल. पण मला नाही वाटत हा ड्रेस महाग आहे म्हणून आवडला आहे तर घेऊन टाक.

**वीणा** माझ्याकडे आत्ता इतके पैसे नाहीत. अग पण माझं चेक बुक आहे की, मग काय चेकच फाडते. इथे सगळीकडे चेक्स स्वीकारतात म्हणून वरं आहे.

* *

**नीला** अय्या! प्रतिमा, इथं काय करतेस? तू वुलवर्थ-मधे सेल्सगर्ल असल्याचं कळलं होतं. परंतु ऑक्सफर्ड सर्कसच्या ब्रँचमध्ये भेटशील वाटलं नव्हतं. गुरुवार म्हणजे लेट नाइट शॉपिंग आणि गर्दी ना अगदी!

**प्रतिमा** हो ना! संध्याकाळी अगदी कधी घरी जाऊन पडते असं होतं. गुरुवारी अगदी बसायला सुद्धा मिळत नाही.

**नीला** : ही वीणा बर्वे. नुकतीच आली आहे.

**प्रतिमा** : काय कसं वाटलं लंडन ? करमतं का?

**वीणा** अंऽऽ ठीक आहे.

**नीला** : ए, आम्हाला जरा घाई आहे हं! तुझ्या इथे पण मागे खूप कस्टमर्स आहेतच. परत भेटू आपण. Bye--

अग, हे सेल्सगर्लचं काम म्हणजे अगदी वैताग असतो. एक तर सारखं उभं राहून काम करावं लागतं.गर्दी पण सारखी असते. परत शनिवारी पण काम करावं लागतं. मधला एखादा वार ऑफ मिळतो.

**वीणा** अग पण तिच्या नवऱ्याला शनिवार, रविवार ऑफ असेल ना?

**नीला** : हो. त्यामुळे तर त्यांना रविवारखेरीज कुठं बाहेर जाता येत नाही. मी आज किती दिवस तिला घरी बोलावते आहे. विचारीला वेळच होत नाही.

**वीणा** : मग ती दुसरी कुठली नोकरी का नाही धरत ?

**नीला** अग, एक तर मिळायला पाहिजे. दुसरं म्हणजे सेल्सगर्ल्सना शनिवारी काम करतात म्हणून पगारही जरा जास्त मिळतो. तसंच दुकानात जो माल असेल तो कमी भावात विकत घेता येतो.

**वीणा** : मला नाही बाई आवडणार! आणि दुकानात कसलं ते काम करायचं?

**नीला** : अग इथं कुठलंच काम कमी समजत नाहीत. आपल्याकडेच कामाच्या चांगल्या वाईट वाटण्या करतात. मुलांनी कुठली कामं करायची, मुलींनी कुठली कामं करायची याची बंधनं इथं नाहीत. इथं तुला सर्व क्षेत्रात मलंमुली दिसतील. इथं शालेय शिक्षण संपलं की बहुतेक जण नोकऱ्या धरून स्वतंत्र राहतात. १०० मधे १०-१५ जण उच्च शिक्षणासाठी जातात. इथं उच्च शिक्षणासाठी प्रवेश मिळणं फार कठीण असतं. बहुधा फर्स्ट क्लास मिळालेलीच मुलंमुली जातात. डिग्री मिळणं फार अवघड असतं. उच्च शिक्षणासाठी विद्यार्थ्यांना सरकार ग्रँट देते; परंतु त्या ग्रँटला विद्यार्थ्याला पात्र व्हावं लागतं. आपल्यासारखं प्रत्येक जण उठून कॉलेजला पळत नाही किंवा पदव्या पण खिरापतीसारख्या वाटल्या जात नाहीत. त्यामुळे पदव्यांना मान राहिला आहे.आपल्या पदव्यांना इथं पदव्यांप्रमाणे लेखत नाहीत, आपले इंटरचे शिक्षण इथे मॅट्रीकपर्यंत धरले जाते. पदव्यांपेक्षा अनुभवाला जास्त किंमत दिली जाते. अनुभवाशिवाय एखादी नोकरी मिळवणं म्हणजे अगदी कठीण काम; त्यामुळेच आपल्याकडील कितीतरी पदवीधर इथं कंडक्टर्स, ड्रायव्हर्स, पॅकर्सची कामं करताना दिसतात. त्यांनी घेतलेल्या शिक्षणक्षेत्रात नोकरी क्वचितच मिळते. पदवीधर मुलींचीही तीच स्थिती आहे; कुठं सेल्सगर्ल, कुठं क्लार्क, कुठं मशिन ऑपरेटर नाहीतर फॅक्टरीजमध्ये त्यांना कामे करावी लागतात.

**वीणा** खरंच आपण एवढं शिकलो पण इथं त्याचा काहीच उपयोग नाही; आपल्याकडेही हल्ली प्रत्येकजण शिकतो त्यामुळे तिथंही त्याचा उपयोग नाही.

**नीला** इथल्या मुलांमुलींना पदव्या नसल्या तरी इतर इतकं ज्ञान असतं की ते पाहून कौतुक वाटतं.

**वीणा** : काय ज्ञान असतं? नुसत्या लांडे फ्रॉक्स आणि उलटे सुलटे केस फिरवून हिंडत असतात आणि मुलं लांब केस वाढवून कातड्यांची जॅकेटस् घालून धांगडधिंगा करत रस्त्यातून जात असतात.

**नीला** : तू त्यांच्या पोशाखावर जाऊ नकोस. खरंच जीवन कसं जगावं हे त्यांच्याकडून शिकावं. अग माझ्या ओळखीची "पॅट" म्हणून मुलगी आहे. अवघ्या दोन, चार वर्षात ती एकटी कुठं कुठं फिरली असेल सांगू तुला? आणि किती पैशात?

**वीणा** किती?

**नीला** सर्व युरोपचा प्रवास तिनं फुकटात केला. सगळीकडे लिफ्ट मागत ती गेली आणि लिफ्ट मागत ती आली. अर्थात तिला नेहमी कुणीच लिफ्ट दिली नाही; पण जेव्हा लिफ्ट मिळाली नाही तेव्हा तिची चालायचीही तयारी होती. काही काही वेळा सबंध दिवस ती चालायची. मनाला वाटेल तिथं रहायची, मिळेल ती नोकरी करायची.कुठल्याही कामाची लाज नाही व कष्ट करायची तयारी. आता कॅनडा अमेरिकेचीही ट्रिप ती करणार आहे. फक्त जेवणाखाण्याचे पैसे तिने साठवले होते.

**वीणा** : एकटी फिरली का ग सगळीकडे ? मला तर अजून-सुद्धा कुठं एकटं जाण्याची भीती वाटते.

**नीला** बहुधा असे प्रवास दोघं दोघं मिळून करतात. इथं हे प्रवास समाजमान्य आहेत. तरुणपणी उत्साह असतो, मोठ्या महत्त्वाकांक्षा असतात, जग पहायची इच्छा असते, पण सर्वांजवळ पैसा नसतो; त्यामुळे प्रवासाला वाहनं घेऊन जाणारे लोक ह्या तरुणांना लीफ्टस देतात. जितकं नेता येईल तितकं नेऊन सोडतात; तेथून परत ही मंडळी दुसऱ्या कुणाला लिफ्टस्साठी गाठतात.

**नीला** आमच्या शेजारची ती लिबी परवानी फॅमिली मला वाटतं तुला माहीत आहे. जवळ जवळ पंधरा वर्षे ते लोक इथं आहेत. त्यांची तीनही मुलं इतकी स्मार्ट वाटतात ! हिंदी समजतं त्यांना पण बोलत नाहीत. अगदी स्टाईलिश इंग्लीश बोल-तात. मोठ्ठा मुलगा बारा वर्षांचा आहे आणि दोघी मुली आठ आणि सहा वर्षांच्या आहेत. एक मुलगी बॅलेडान्स छान करते तर, एक पियानो छान वाजविते. तो मुलगा तर फुटबॉलचा इतका शौकिन आहे की त्याला प्रत्येक टीमची खडान् खडा माहिती आहे. परंत अभ्यासात तिघेही जणं ठीक आहेत. शाळेतच ह्या मुलांच्या सर्वांगीण विकासाकडे लक्ष दिले जाते.

**वीणा** हो का ? मला स्वतःच्या लहानपणाची आठवण होते. इश्श्, किती बुद्दू होतो नाही आपण ! आपल्याकडे शाळेपेक्षा पालकांनीच मुलांकडे लक्ष जास्त देण्याची प्रथा आहे. शाळेत फक्त अभ्यास एके अभ्यास,—व घरी आल्यावरही अभ्यासच. इतर कलांकडे क्वचितच लक्ष देतात त्यामुळे जो अगदी हुषार असतो त्याला इतर कशाचा गंध नाही; तर एखादा विद्यार्थी एकाच कलेत पुढार-लेला असतो. इथं कोणताही विद्यार्थी घेतला तरी त्याला गाणं, चित्रकला, खेळ इ. प्रत्येक गोष्टीचं ज्ञान असतंच.

* * *

**मगनलाल** आपकी क्या सेवा करू भाभीजी ?

**नीला** मुझे तो सिर्फ सॅंगो और पापड लेने है।

**मगनलाल** नया पिकल आया है, चाहिये ?

**नीला** क्या प्राईस है जी ?

**मगनलाल** छे शिलींग.

**नीला**: छे शिलींग ? आप तो सोनेकी भावसे दे रहे है।

**वीणा** माझं परवाच पार्सल आलं आहे. तुला हवं असलं तर मी देईन.

**नीला** : तसं नाही ग, पण असतं अगदी छान. मी दोनदा कुकींग ॲपल्सचं इथं लोणचं घातलं पण इतकं छान जमत नाही.

**मगनलाल** : तो दे दूं भाभीजी ?

**नीला** नही सिर्फ सॅंगो और पापड दीजिये।

**वीणा** : मेरे लिये भी दो पौंडका पॅकेट बनादो।

**मगनलाल** : और कुछ चाहिये ?

एक पौंड तीन शिलिंग सेपरेट हुए है। नयी प्रिण्टेड जॅपनीज सारीयाँ आयी है। अंदर देखके तो आओ।

**नीला** : ए मस्त आहेत नाही ! मला ही मरून रंगाची फार आवडली आहे.

**वीणा** : मला ही पिवळी खूप आवडली आहे. पण किंमत फार आहे !

**नीला** : हॉंगकॉंगहून हे लोक हा सर्व ड्यूटी फ्री माल आण-तात आणि इथे डबल किंमत लावतात.

**वीणा** : खरंच आपणही काही तरी बिझनेस करायला हवा.

**मगनलाल**: क्या कोई पसंद आयी।

**नीला** पसंद तो सबही आयी हैं। लेकीन प्राईस ठीक नही।

**वीणा** ये दोनोंकी क्या प्राईस है जी ?

**मगनलाल** पाच, पाच पौंड.

**नीला** हमारे यहाँ चार पौंड को मिलती है।

**मगनलाल** तो उवरसे क्यूं यहांसे चार पौंडमे ले जाओ।

**वीणा** ए खरंच म्हणतो आहे का ग ?

**नीला**: अय्या मला नाही वाटलं हो म्हणेल.

**वीणा** : हाँ, ये दोनो सेपरेट पॅक करके दो !

*

**नीला** : बाईसाहेब, आता सात वाजले आहेत सात !

**वीणा** : हो ? चांगलाच उशीर होणार आता. अग पण





अनुक्रमणिका

रम्य जीवनाचे
रंग पश्चिमेचे
चित्र कारुण्याचे
पूर्वेतील
इथे श्रीमंतीचा
नित्य नवा साज
दारिद्र्याची पैंज
पूर्वेला ती
इथे अर्भकांचे
कौतुकांचे थेर
सदा दिगंबर
काळी पोरं
इथे धुंद रम्य
विश्व तारुण्याचे
दुःख बेकारीचे
अशोकाला
इथे भारी तोरा
गोऱ्या तरुणीचा
प्रश्न भविष्याचा
भारतीला



इथे निर्धास्तीची
आयुष्याची सांज
संकटांची मौज
वृद्ध देही
इथे मद्यालयी
हास्यांचे तुषार
तहानेली पोरं
झोपडीत
इथे समृद्धीचे
थंडगार वारे
पूर्वेला निखारे
दारिद्र्याचे

इथे शांतता ही
सदा बहारीची
संप घेराओची
वर्दळ ती
गोरी दुनिया ही
वैभवी लोळते
आसवे गाळते
काळी आई
कुठे पूर्वेतील
ज्योत मानव्याची
धुंदी ऐश्वर्याची
पश्चिमेत
पुसावे आक्रोशे
दयार्द्र विधात्या
अरेरे विश्वकर्त्या
अन्यायी तू ???

–सौ. शर्मिला देशपांडे

सात वाजले तरी उजेड कसा एवढा?

**नीला** आता तू समरमध्ये बघशील रात्री दहा वाजले तरी लख्ख उजेड असतो. उलट विंटरमध्ये पाच वाजले की सगळीकडे अंधार.

* * *

**वीरेन्द्र** आठ वाजले पत्ता नाही दोघींचा अजून. चिठ्ठी ठेवायची वगैरे आमच्या सौं. च्याकडे बात नाही. कुठं गेली असेल बरं ?

टिंग टिंग् टिंग्.

आली वाटतं.

**वीरेन्द्र** : हे काय आज कुठं फेरफटका ? आणि नितीन कुठं आहे ?

**नीला** : कमाल आहे तुमची ! तुम्ही नाही आणलात त्याला ?

**वीरेन्द्र** छान ! छान आहेत 'चोराच्या उलटचा'..... आज तुला सुट्टी होती, तू घरी होतीस ना ! तर मग त्याला कशाला बेबीसीटरकडे ठेवलास ? आणि मला वाटतं सकाळपासून तू बाहेरच असशील ? दुपारी पार्सलवाला येऊन चिठ्ठी टाकून गेला. आता पोस्टातून पार्सल कलेक्ट करायला हवं.

**नीला** : हो माईचे हापूसचे आंबे आले असतील. आपल्याला लवकरच आणायला हवं हे पार्सल.

**वीरेन्द्र** : ते पार्सल राहू दे आता. आधी बेबीसीटरकडचं पार्सल आणायला हवं आपल्याला. वाट पहात बसला असेल बिचारा.

* * *

**नरेश** च्यामारी ऽऽ. कुठं गेली आहे कुणास ठाऊक ! दर गुरुवारी हिची एक नवीन तऱ्हा. हिला फुलटाईम जॉबच बघून दिला पाहिजे. तास झाला बाहेर उभा आहे मी. पबमध्ये किती वेळ जाऊन बसलो, दहा चकरा बसस्टॉप ते घर, घर ते बसस्टॉप झाल्या असतील. इंडियात असतो तर गोप्या, चंदयाकडे कसा वेळ गेला असता पत्ता लागला नसता. त्यांच्याकडेच खाल्लं असतं काहीतरी. मग कशाला हिची वाट बघत बसलो असतो ? पण इथं ? हिला मी आणि मला हीच त्यामुळे मांडत तरी कुठं बसायचं !

आँ ! टॅक्सी कुणाची?

वीणा ? तू ? आणि टॅक्सीनं ? अग मी इथं पाच वर्षात एकदाही टॅक्सीनं कुठं गेलो नाही, कित्ती महाग असते टॅक्सी माहीत आहे का तुला ? निश्चित दहा बारा शिलिंग झाले असतील.

**वीणा** : तुम्ही काय काळजी करता ? अहो माझा उद्या पगार होईल. तुमचे दहा शिलिंग तुम्हाला परत करून टाकीन. पण आता जर टॅक्सीनं मी आले नसते तर घरी यायला दहा वाजले असते; अहो मी स्टेशनमधून बाहेर पडले आणि बस गेली. म्हटलं तुम्ही बाहेर उभे असाल. आपलं टॅक्सीनंच जावं. म्हणजे तुमच्याकरता मी टॅक्सीनं आले. नाही तर सकाळपासून बस आणि ट्यूबनेच फिरते आहे.

**नरेश** : म्हणजे आज सकाळपासून आपण बाहेर आहात वाटतं ? आज कोण नवीन गुरु भेटला तुम्हाला फेरफटक्याला ?

● ● ●





# सरकारी क्षेत्र कां?

**दे**शाची अर्थव्यवस्था जलद वाढावी म्हणून

**रा**ष्ट्रीय अर्थव्यवस्थेच्यादृष्टीने महत्त्वाचे (लोखंड आणि पोलाद, पेट्रो-रसायन, अवजड इंजनियरिंग, रसायनिक खते, आवश्यक औषधी द्रव्ये, विजेच्या तारा, जहाज वाहतूक, यासारखे) विभाग सरकारी नियंत्रणाखाली रहावेत आणि त्यांत भांडवलदारांची मक्तेदारी चालू नये म्हणून,

**अ**वजड आणि मूलभूत उद्योगधंद्यांना लागणारे प्रचंड भांडवल मिळावें म्हणून.

काही मोठ्या सरकारी क्षेत्रांतील उद्योगांत गुंतलेले भांडवल.

ता. 31 मार्च, 1969 रोजी (आंकडे कोटींचे)

| | |
|---|---|
| हिन्दुस्तान स्टील | 1099 |
| एच.इ.सी. | 224 |
| हिन्दुस्तान एरोनॉटिक्स | 197 |
| तेल आणि भूगर्भवायू मंडळ | 189 |
| राष्ट्रीय कोळसा विकास महामंडळ | 178 |
| नेवेली निगनाइट | 173 |
| भारत अवजड विद्युतसाहित्य | 162 |
| रासायनिक खत महामंडळ | 156 |
| भारतीय तेल महामंडळ | 143 |
| अवजड विद्युत् साहित्य (1) | 112 |
| भारतीय औषधी द्रव्य मंडळ | 67 |
| भारतीय जहाज बांधणी महामंडळ | 55 |

एकट्या खाजगी क्षेत्राला एवढे मोठाले उद्योग उभारण्यासाठी संयुक्तपणेदेखील एवढे मोठाले भांडवलाचे आंकडे मिळविता आले नसते. मुख्यतः या उद्योगांमध्ये नफा मिळण्यास उशीर लागत असल्यामुळे खाजगी क्षेत्राला यांत पैसा गुंतविणे अशक्य झाले असते.



सार्वजनिक हितासाठी

सरकारी क्षेत्र

davp 70/448





अनुक्रमणिका



# अनौरस पुढाकार

**...एकतीस वर्षे उपभोग म्हणजे काय ते न समजलेली नि मातृत्वाला हपापलेली सुलभाही उद्याच्या समाजाचा एक कोपरा धरून वाढणार आहे...अशा स्त्रियांना आधार देण्यासाठी...**

गर्दीला चुकवून ती पटकन घरात शिरली. समोरनं दादासाहेब येताना दिसले तसा तिने नमस्कार केला. तिच्या हाताशी राजूला पाहून दादासाहेब म्हणाले, "वेदर विघडलेय आज पुन्हा; फार कोल्ड वाटलं रे बाहेर ?"

ती नुसतंच हसली आणि देवघराकडे आली.

दादासाहेबांना लंडनमध्ये राहून हवेवर बोलायची फार सवय झाली होती. शिवाय त्यांच्या बोलण्यात बरेच इंग्रजी शब्दही येत.

देवघरात बरीच गर्दी पाहून ती बाहेरच उभी राहिली, तसे दादासाहेब जवळ आले, "बसा, बसा ना; बी कंफर्टेबल...." तरी ती उभीच होती.

मग हळूच कानाशी लागून त्यांनी विचारले, "काही कळले का नाही अद्याप ?"

तिने नुसतीच मान हलवली नि दिसल्या जागी ती बसून गेली. राजूला तिने तसाच बाजूला बसवून घेतला. दादासाहेबांकडे पूजा म्हटल्यावर एवढी माणसे यायचीच. दादासाहेब लंडनमध्ये आल्यापासून तर हिंदूंचे सण समजू लागले इथे. जमलेल्या माणसांवर तिने हलकेच नजर फिरवली. सुलभा आणि शांताबाई कुठेच दिसेनात. एकटी पडल्यासारखी खाली मान घालून ती पोथी ऐकण्याचा प्रयत्न करू लागली. दादासाहेबांचा प्रश्न सारखा तिच्या मनात घोळत राहीला. जमलेली सगळीच माणसे तिला तोच तोच प्रश्न पुन्हा पुन्हा विचारणार होती : "काही कळले का नाही अद्याप ?"

त्या साऱ्यांना ती मूकपणे नकार देणार होती. आज सत्यदेवाची पूजा म्हणून तिने गेले आठ दिवस व्रत केले होते. सत्यदेवासमोर ती भविष्याची भीक मागणार होती. राजूच्या आयुष्याचे स्वप्न सांगणार होती ती देवाला.

"अय्या ती बघ चाफेकर."

कुणीतरी तिचे नाव घेतले नि ती भानावर आली. पुढचे ऐकायची तिची तयारी नव्हती तरी ती ऐकू लागली.

"कोण ग ? ती दोन वेण्यावाली ?"

"हो, तीच. दोन वेण्या नि पोपटी साडी घालून बसलेय बघ कोपऱ्यात..... तिची एक स्टोरीच झाली नाही ?"

"ऐकलं होतं नवऱ्याशी पटत नाही म्हणून."

"अग तो पळाला अलिकडे."

"अय्या हो ?"

"खट्याळ ग बाई ही. गोगटे ऐकून माहीत आहे की नाही तुला ? तो ग.... वकील गोगटयांचा मधला मुलगा...."

"त्याचं काय ?"

"त्याच्याबरोबर फिरायची ही. नवऱ्याला कसं सहन होईल ? कंटाळला असेल....."

"अस्सं. मी वेगळंच ऐकलं होतं."

"काय ?"

**विजय पंडित, लंडन**

"अग तिचा मुलगा आहे ना.... औरस नाही म्हणतात; नवऱ्याला कुणाचासा संशय आला...."

"तेच तर म्हणते मी. गोगटेचं. बुळी नाही तर !"

पोथी ऐकताना चाललेलं हे संभाषण तिने निश्चलपणे पचवले. आजवरची टीका पचवली तशीच. असे काहीतरी ऐकायला मिळणार याची तिला खात्री होती. देवावर भरवसा ठेवून ती आज इथे आली होती. शाप देणाऱ्या तारुण्याला तिने आज उभारी आणली होती. माघार घेणारे विचार

पुन्हा पुन्हा मनात घोळवून तिने आजच्या पूजेला यायचा निश्चय केला होता. सुलमाला नि शांताबाईलाही तिने येण्याचा आग्रह केला होता पण त्या अजून कुठे दिसत नव्हत्या.

शरीर अगतिक होतंयसं वाटलं म्हणून हलकेच तिने राजूच्या पाठीवरनं हात फिरवला. विचारांनी डोके जड झाले. डोळ्यांपुढे अंधार आला. निरांजनाची वात फडफडली. सत्यदेवाची मूर्ती उगाचच करूण भासली. देवाची असहायता पहायला आलो आपण? आजवर कितीवेळा सांगितलं आपण देवाला? केवढे उपवास केले? काय उपयोग झाला? नवरा गेला त्याच दिवशी इथल्या मूठभर समाजाने आपल्याला बाजारात आणले. जगात देव नसावा अशी जाणीव कितीदा तरी झाली. तरीपण देवाला फुले वाहिली, व्रते केली. आज तसेच व्रत घेऊन इथे आलो आपण. काय सांगायचे देवाला? आपला म्याड नवरा परत येऊदे म्हणायचे? राजूच्या पितृछत्राची भीक मागायची की आपले कुंकू चिरायू ठेव म्हणायचे? काय अर्थ आहे या कुंकवाला? कशाला हवे फाटके पितृछत्र?.... रोज येणारे विचार.... रोज कुठेतरी संपत, तसेच आज संपले...

आज तो असता तर दादासाहेब असे ना विचारते.... ना आपली चर्चा होती: या विचाराबरोबर नेहमीसारखेच तिला वाटले: आपल्यालाच तो हवा आहे. आयुष्यातले थ्रिल हवे आहे. आयुष्याची स्वप्ने त्याने रंगवावीत. आपण त्या स्वप्नावर जगत पगाराचा शुक्रवार हाताशी आणावा. असे स्वप्नाळू दिवस बरेच गेले आणि ती जीवघेणी रात्र आली.

त्या रात्री तो पळाला. अक्षरशः पळून गेला. एक नामर्द चिठोरे मागे ठेवून गेला: मजुराच्या आयुष्याला कंटाळून जातोय; जमेल तसा सांभाळ कर राजूचा. रोज कामावरनं आला की म्हणायचा आजची मजुरी संपली, आता उद्याचा विचार. आपण त्याला कितीदा समजावले. इथे चांगली नोकरी मिळत नाही तर परत जाऊ इंडियाला. कदाचित पूर्वीच्या जागीच केमिस्टची नोकरी मिळेल. काहीतरी करता येईल. हातपाय हलवले तर उपाय सापडेल.... पण त्याने आयुष्याचा धसका घेतला होता. इंडियात परत जायचा विचार त्याला कधीच पटला नाही. आयुष्यात थ्रिल असायला हवे असे म्हणणारा तो अचानक म्याड झाला.... नामर्द ठरला.

"प्रसाद घ्या." कुणीतरी तिच्या हातावर प्रसाद ठेवला तशी ती भानावर आली. सगळी माणसे देवाच्या पाया पडून दुसऱ्या खोलीत गेली होती. लगबगीने तिने देवाला फुले वाहिली. तोंडाशी आले ते ती देवासमोर बोलून गेली.... "माझ्या राजूला सुखी ठेव...."

ती खोलीच्या बाहेर पडली तेव्हा तिला सुलमा नि शांताबाई दिसल्या. धीर आल्यासारखी ती त्यांच्याजवळ गेली.

"पाया पडलां देवाच्या?" शांताबाईनी हसत हसत प्रश्न केला नि चावट अंगविक्षेप करीत तिच्या पोटावर हात ठेवला.

सर्वांगातून वीज जावी तशी ती भानावर आली. नेमकं तेच सांगायचं राहिलं. गोगटेचं अपत्य आपल्या उदरात वाढतंय याचा आपल्याला एवढा वेळ विसर पडला होता? मघाशी आपल्या राजूला कुणीतरी अनौरस म्हटले. खरा अनौरस अंश अजून या जगात यायचा आहे. मघाशी आपल्याला ही आठवण झाली होती तरीही आपण बोललो नाही देवाशी? काय विचार केला? कसे विसरलो?....

शांताबाईच्या प्रश्नाचे बराच वेळ आपण उत्तर दिले नाही याची तिला जाणीव झाली नि ती म्हणाली, "नाही."

"नाही? काय म्हणता, पाया नाही पडला देवाच्या?"

"पाया पडले; पण तुम्ही म्हणता ते नाही सांगितलं." तिने संथ उत्तर दिले नि ती घराबाहेर पडली. निरोप घ्यायची तिची इच्छा नव्हती. सुलमाला नि शांताबाईला तिने खुणावले तशा त्याही तिच्याबरोबर निघाल्या.

"चला घरी जाऊ; बसू थोडा वेळ.."
तिने घरी येण्याचे सुचवले. सुलमा नि शांताबाई तिच्याबरोबर चालत राहील्या.

बाहेरचा अंधार वाढला होता. हवा वादळी झाली होती. पाऊस तर नेहमीसारखाच शितडत होता. त्या झपझप पावले टाकीत मेन रोडवर आल्या.

"काय ठरवलंन् सुलमानं?" तिने सुलमाकडे पहात शांताबाईला प्रश्न केला.

"भेटून आली डॉक्टरना. तयार आहेत एक डॉक्टर." शांताबाईनी तसेच मोघम उत्तर दिले.

"पण सुलमाचा काय विचार आहे?"

"काय असायचा; कटकट जाईल ती बरी."

शांताबाई सुलमाला बोलायची संधीच देत नव्हत्या म्हणून तिने सुलमाला प्रश्न केला,

"सुलमा, खरं सांग तू अजाणपणी तर असं केलं नाहीस?"

"नाही...."

"तुझी इच्छा नसताना....

"नाही, नाही... मीच त्याला उत्तेजन दिले. मला मूल हवे होते. आज वाटणारी आईची भावना हवी होती. आयुष्यातली एकतीस वर्षे अनासक्तीत घालवली. वाटले, पडताळा पहावा आयुष्याचा. आपण स्त्री आहोत यावर विश्वासच बसत नव्हता. आता वाटते...."

"ते ठीक आहे...." ती गंभीरपणे सांगू लागली...."मला वाटते तू गर्भपात करू नयेस. तुझे मूल वाढू दे. कदाचित तुला मुलगा होईल. देश बदलला तरी समाज बदलत नाही. वय आहे तोवर काम करशील तू. पुढे काय? पुढेमागे तुझा मुलगाच तुला हात देईल. या जगात तुझे दुसरे कुणी नाही...."

"सुलमाला हा विचार पटल्यासारखा वाटला. शांताबाई मूकपणे आपल्या नशिबाचा विचार करीत चालल्या होत्या. त्यांना एकदम काहीसे आठवले नि त्या म्हणाल्या—





अनुक्रमणिका

"बरोबर आहे तुझं. दादासाहेब एवढे मोठे म्हणतात लोकं. पण त्यांनी गोरी बायको केलीच की नाही ? त्यांची सगळी मुलं बापासमोर सिगरेट्स् ओढतात. लोक म्हणतात : देश तसा वेश. का, तर ती माणसं मोठी...."

"आणि एवढं कशाला, माधवरावांची मधली मुलगी दर वीकएंडला बाहेर असते. पिल्स् घेते ती; आहात कुठे तुम्ही शांताबाई...." सुलभा जोर आल्यासारखी प्रथमच बोलत होती...."त्या दिवशी भेटली ट्यूबमध्ये. लांडा फ्रॉक घालून होती मडमेसारखा. ब्रा कसल्या उंच होत्या ठाऊक आहे ? म्हणते कशी : लंडनमध्य नव्वद टक्के मुली घेतात पिल्स्. बरं असतं...."

"आई, तुझे ऑफीस...." मध्येच राजू बोलून गेला.

"हो ? इथे काम करता तुम्ही ?" शांताबाईंनी प्रश्न केला नि स्टोअरला राजूने ऑफिस म्हटले म्हणून सुलभाला हसू आले.

तिने मानेनेच होकार दिला. तिला हा विषय नको होता. कारण याच स्टोअर-मध्ये तिचा नवरा मजुरी करायचा. रोज तिला ही आठवण पुरे वाटायची.

"मिळतात का दहा–बारा आठव-ड्याचे ?" शांताबाईंनी विषय लांबवला. असा प्रश्न लंडनमध्ये कुणी विचारत नाही याची तिला इंग्रज बायकांबरोबर राहून सवय झाली होती. पण शांताबाईला मॅनर्स शिकवण्यात अर्थ नव्हता.

"पंधरा देतात हल्ली...." तिने त्रोटक उत्तर दिले.

"म्हणजे कापून दहाबाराच मिळायचे.."

"हो. पण मी काय सांगत होते...." तिने विषय बदलला.

"काय ?"

"शांताबाई, तुम्ही यापुढे विचार करा-यचा नाही."

"कसला ?"

"कसलाच...."

"म्हणजे ?"

"तुम्ही घरकामाला जाता तो मालक तयार आहे म्हणतो ना लग्नाला..?"

"पण ती नोकरी सोडणार आहे मी."

"का ?"

"तासाचे पाचचं शिलींग देतो मेला. केवढं काम ते. आठ बेड करायचे. किचन साफ करायचे. सगळ्या घरभर हुवर फिरवायचा....."

"पण खाणंपिणं मिळतं ना ! अजून-पर्यंत तुम्हीच तर सांगत होता...."

"बघा, बघा; अहो, चाफेकर...." मध्येच सुलभाने तोंड घातले.

"काय ?"

"दादासाहेबांची पोरगी कोणाबरोबरशी पबमध्ये शिरली आत्ताच."

"ती घरीही पिते. दादासाहेब म्हणतात हेल्थसाठी चांगली असते वाईन...."

"म्हणून नाही...."

"मग ?"

"मुलगा गोरा नव्हता का तिच्या-बरोबरचा ! चांगलाच हिप्पी दिसत होता. आणि आज घरी पूजा. दिसली का घरात? आम्हाला नावे ठेवतात....एक बाई बोलली नाही माझ्याशी...."

"बरी आठवण झाली." शांताबाई आठवल्यासारखे करून खदखदून हसल्या.

"कसली ?"

"तू दादासाहेबांच्या मुलीबद्दल बोल-लीस ना तेव्हा आठवले...."

"सांगा ना काय ते...."

"मोठी मुलगी हो दामल्यांची...."

"तिचे काय ?"

"प्रेगी आहे म्हणतात."

"ती गाढव आहे होय एवढी !"

"आत्ता ! आपली सुलभा काय गाढव आहे ? पण ती सुद्धा फसलीच की नाही ! आणि तिचेच कशाला ? अग, जुली आमच्या शेजारची..." शांताबाई सुलभा-कडे पहात बोलत राहिल्या.

"जुली ?" सुलभाने मध्येच अडवले.

"तुला सांगते नाही का मी तिच्याबद्दल? रोज नवां बॉयफ्रेंड आणते घरी म्हणून..."

"ती इंग्रज पोरगी होय ? तिचे काय ?"

"अलिकडे विमानांची पळवापळव झाली नाही का ! हायजॅकींग का कायसे म्हणतात ते.."

"त्याचा काय इथे संबंध ?"

"ऐक तर खरं.... अग, त्या विमानात होता तिचा बाप. लंडनवरनं सुटलं विमान ते थेट वाळवंटात. अडकवला अरबांनी"

"मग ?"

"मग काय ! घरात ही एकटी. रोज पार्टी. रोज आणायची कुणाकुणाला घरी. काल माझ्याकडे आली नि म्हणते शी; मला भीती वाटते. विचारलं तर वर्णनच करू लागली. एकूण सारांश तोच...."

"पण तिला का असं वाटलं ?" सुलभाने शंका काढली.

"ती नव्हती म्हणे पिल्स् घेत. देव जाणे ! कसचे काय घेऊन बसता ! म्हटलं फोन कर नि भेट घे."

"फोन ? कशाला ?"

"नेमकं सांगतात काही असेल तर. प्रेगनन्सी टेस्टींगच्या जाहिराती नसतात का स्टेशनावर लावलेल्या ?"

"आले घर" असे म्हणत राजू धावत दाराशी आला. तिच्या हातची चावी घेऊन त्याने दार उघडले. कितीतरी विचार एकाएकी गोळा होऊन ती भारावली. सुलभा नि शांताबाई तेवढ्याच आपल्या-सारख्या या चक्रात सापडल्या आहेत असे तिला माहीत होते. दादासाहेब, माधवराव, दामले ही मोठी मंडळीही यात आहेत याची तिला जराही कल्पना नव्हती. खरं म्हणजे सुलभाने व शांताबाईंनी ज्या अर्थाने या घटनांचा उल्लेख केला होता, तो अर्थात तिला पटत नव्हता. गोगटेंचे अपत्य आपल्या पोटी वाढू द्यायचा तिने आज निर्णय घेतला होता, त्याचवेळी तिने सुलभाला गर्भपात करू नको असे सांगि-तले होते. मघाशी तिला एक विचार पटल्यासारखा वाटला होता. सुलभा,

(पान ९० वर)



अनुक्रमणिका




अनुक्रमणिका





—हेमंत कानिटकर, लंडन

# मला भारतात परत जावेसे वाटत होते पण...

**भारतीय संस्कृतीची मौक्तिकमाला उराशी धरून, पंख कापलेल्या जटायूप्रमाणे मी श्रीरामचंद्राची वाट पाहात आहे... भेटेल का मला रामचंद्र ?... आहे का माझे तेवढे भाग्य ?...**

आत्तापर्यंतच्या माझ्या जीवनामधली पहिली साडेवीस वर्षे मी महाराष्ट्रात घालविली व नंतरची बावीस वर्षे मी इंग्लंडमध्ये राहिलो आहे. 'महाराष्ट्रात' असा व्यापक शब्द वापरण्यापेक्षा, धोम, वाई व मुंबई या तीन ठिकाणी मी जीवन जगलो असे म्हटल्याने ते जास्त बरोबर होईल. लग्नामुंजीच्या निमित्ताने मी इतर काही गावे पाहिली होती. लहानपण धोमला, खेडेगावात गेले. मॅट्रिकपर्यंत वाईस, द्रविड विद्यालयात शिक्षण झाले व १९४६ ते १९४८ अशी दोन वर्षे मुंबईस गिरगावात राहून व परळला हाफ्‌किन् इन्स्टिटयूटमध्ये नोकरी करून घालविली.

माझे ज्येष्ठ बंधू श्री. कृ. प्र. कानिटकर हे लंडनला १९३३ सालापासून वास्तव्य करीत आहेत. दुसऱ्या महायुद्धातल्या काळात ते येथील एका विमान-उत्पादन कारखान्यात 'इलेक्ट्रिकल् सुपरवायझर' म्हणून व्यवसाय करीत होते. दुसरे महायुद्ध संपल्यानंतर सेहेचाळीसच्या जानेवारी महिन्यात, हॅम्स्टेड् विभागात त्यांनी स्वतःच्या मालकीचे हिंदी विद्यार्थी वसतिगृह सुरू केले. नंतर १९५० साली त्यांनी 'ग्लेन्‌लॉक् प्रेस' नावाचा छापखानाही सुरू केला. त्यांच्याच आर्थिक मदतीने मी इंग्लंडला आलो. इंग्लंडला जाऊन कॉलेजचे शिक्षण घ्यायचे व काही वर्षानंतर भारतात परत जाऊन तेथेच व्यवसाय करावयाचा असा घरातील सर्व मंडळींचा विचार ठरला.

'विठू इंग्लंडला जाणार' ही बातमी वणव्याप्रमाणे पसरली. मला उपदेशाचे चार शब्द ऐकायला मिळाले. एका वृद्ध नातेवाईक स्त्रीने भविष्य वर्तविले "मोठ्या भावाने खानावळ सुरू केली आहे, आता तू इंग्लंडला जाऊन कपबशा विसळणार." पुण्यास गेलो असताना एका विद्वान गृहस्थानी मला ऐकविले, "तुला ब्रिज खेळता येत नाही, टेनिस् खेळता येत नाही. तुझी इंग्लंडमध्ये फजिती होणार." ते गृहस्थ इंग्लंडला गेलेले नव्हते. अगदी मोजमापाने राहणाऱ्या एका गृहस्थानी मला सल्ला दिला की, "तू आहेस नुसता मॅट्रिक. इंग्लंडला जायचं म्हणजे हातचं सोडून पळत्याच्या पाठीमागे जाण्यासारखं आहे. त्यापेक्षा हाफ्‌किन्‌मधली नोकरी बरी." मी मनात म्हटले की, "विसाव्या वर्षी हातचं सोडून पळत्याच्या पाठीमागे नाही जायचं तर मग काय भीमकुंडावर लाकडे गेल्यावर !"

जून १९४८ मध्ये, हाफ्‌किन्‌मधली पंचाऐशी रुपयाची नोकरी सोडली व नारळी पौर्णिमेला, शिंदिया कंपनीच्या 'जल-आझाद' बोटीने, मी इंग्लंडला यायला निघालो. तेव्हापासून आजतागायत माझे इंग्लंडमध्येच वास्तव्य आहे.

इंग्लंडला आल्यावर, लंडन मॅट्रिक, इंटर सायन्स् करून बी. एस्. सी. जिऑलजी हा कोर्स सुरू केला. पुढे १९५२ साली वडील बंधूंपासून विभक्त झालो व तो कोर्स संध्याकाळच्या कॉलेजात पुरा करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. दुसऱ्या वर्षाच्या अभ्यासक्रमानंतर पुढे प्रगती होईना ! तेव्हा सायन्सला रामराम ठोकून आर्टस्‌कडे मोर्चा वळविला. संस्कृत विषय घेऊन लंडन विद्यापीठाची बी. ए. पदवी मिळविली. नोकरी करून अभ्यास करीत असताना इंग्रजी नाटके, सिनेमा, पाश्चात्य खानदानी संगीत व इंग्रजी वाङ्‌मयातील वेचक पुस्तके यांचाही मनसोक्त समाचार घेतला. हा सर्व खटाटोप करीतच बी. ए. झालो. त्यावेळी मला भारत सोडून दहा वर्षे होऊन गली होती.

पदवी मिळाल्यावर भारतांत परत जाण्याचे विचार मनात आले व त्याबरोबरच काही समस्या माझ्यापुढे निर्माण झाल्या. येथील समाजात दहा वर्षे राहिल्यावर माझ्या बुद्धीवर काही संस्कार झाले होते व त्यामुळेच 'आपण हिंदु समाजात समरस होऊ शकणार नाही' अशी माझी खात्री झाली. भारताबाहेर 'कर्मभूमी' शोधून काढायची व हिंदु समाजापासून दूर राहावयाचे हा निर्णय मी बारा वर्षांपूर्वी पूर्ण विचार करून घेतला. कोणत्याही प्रकारे तो निर्णय चुकीचा होता असे मला अजून वाटत नाही. जे विचार तेव्हा मनात आले व वाढीला लागले तेच विचार मी येथे व्यक्त करीत आहे. जे खरं आहे ते लिहिलं आहे. 'सत्यमेव जयते' असा जयघोष करणाऱ्या भारतीयांना हे विचार निदान विचार करायला लावतील अशी खात्री आहे. वैचारिक वाद निर्माण झाले तर ते मला हवेच आहे, कारण अशा झंझावातामुळे शेकडो वर्षांचा रूढींचा आणि जुनाट कल्पनांचा पाचोळा जर उडून गेला तरच समाज-देव्हाऱ्यात असलेल्या सुवक मूर्तीचे दर्शन होईल. आपल्या समाजात असा पाचोळा इतक्या ठिकाणी जमा झाला आहे की, खरा देव कोणता हेच मुळी भारतीय विसरून गेले आहेत.

भारतात परत गेल्यावर नोकरी कोणती करायची अशी समस्या माझ्यापुढे उभी राहिली. शिक्षक व्हावे अशी मनापासून इच्छा होती. त्याप्रमाणें महाराष्ट्रात दोन-तीन ठिकाणी अर्जही पाठविले. दोन शाळांकडून उत्तरच आले नाही. एका विद्यालयाच्या मुख्याध्यापकांकडून उत्तर आले. मला ते दरमहा दीडशे रुपये पगार द्यायला तयार होते. तसेच मी आणखीन दीडशे रुपयांपर्यंत खाजगी शिकविण्या केल्यास त्यांची हरकत नव्हती. म्हणजे महिन्याचे तीनशे रुपये घेऊन पुन्हा सक्तीची गुलामगिरीच. तेवढ्या मिळकतीत मी वडिलांना व लहान भावंडांना कसली मदत करू शकलो असतो? साधे अन्नवस्त्र मिळायची मारामार पडली असती.

पुण्यास इंग्रजीचे वर्ग काढावेत अशीही कल्पना डोक्यात येऊन गेली. पण माझी पदवी संस्कृतमधली. भारतात त्या पदवीला कोण विचारतो! इंग्रजीवर प्रभुत्व आहे की नाही हे पाहण्याऐवजी पदवी कोणत्या विषयातली आहे याकडेच आपण जास्त नजर घालतो. मला इंग्रजीचे वर्ग काढायचे होते पण 'स्वतंत्र भारतात इंग्रजी भाषेला कसली आली आहे किंमत?' असा समज झाला व तो विचार बाजूला ठेवला. पदवी मिळवायची ती, केवळ चांगली नोकरी मिळवायलाच ही भारतीय विचारसरणी मला माहिती होती. पदवी मिळविल्यामुळे 'स्वतंत्र विचार करण्याची पात्रता येते' ही गोष्ट कित्येक भारतीय पदवीधरांच्या गावीही नसते. कोणत्याही विषयात पदवी मिळविण्यापर्यंत अभ्यास केला म्हणजे बुद्धीवर जे, 'ज्ञान आत्मसात करून घेण्याचे संस्कार होतात' त्या संस्कारांमुळे इतर दुसऱ्या विषयांचे वाचन, अभ्यास करून तो विषय समजून घेता येतो ही गोष्ट निर्विवाद. पण जर अशी पात्रता अंगी यावयाची असेल तर पहिल्या विषयातल्या पदवीपरीक्षेचा अभ्यासही एका विशिष्ट पद्धतीनेच करावा लागतो. गाइड् बुकांची पारायणे करून, केवळ पुस्तकी ज्ञान मिळवून बी. ए., एम्. ए. झालेले सुशिक्षित भारतीय कोणत्या तऱ्हेची वैचारिक मजल गाठू शकतात हे भारताने केलेल्या गेल्या वीस वर्षांच्या प्रगतीवरून दिसून येतेच.

मी भारतात परत गेल्यावर, नोकरी व राहण्याची जागा या दोन गोष्टी निश्चित झाल्यावर, "आता लग्न करा." असा उपदेश मला सगळ्यांनी केला असता. पहिल्या दोन गोष्टी मी कशातरी पार पाडल्या असत्या. जीव मुठीत धरून किंवा नाक मुठीत धरून वावरलो असतो, परंतु विवाहासारख्या वैयक्तिक गोष्टीत माझे सर्वांशी मतभेदच झाले असते. प्रचलित पद्धती किती किळसवाणी आहे ही खात्री झाली व म्हणूनच मला ती पद्धती मुळीच पटली नसती असे मी ठासून सांगू शकतो.

वयात आलेल्या मुलीचे लग्न एका अनोळखी तरुणाबरोबर लावून द्यायचे ही पद्धत ज्या समाजात मुख्यत्वेकरून पाळली जाते, त्या समाजातली जुनी पिढी हृदयशून्य आहे असेच म्हणावे लागते. देवपूजेचे सर्वांना संपूर्ण स्वातंत्र्य. पारमार्थिक सुखाच्या चर्चेचा घोळ घालायला सर्वांना मोकळीक, पण लग्नासारख्या ऐहिक बाबतीत मुलींना स्वतःचा सहचर निवडण्याचे स्वातंत्र्य नाही. हे असे का? मुलाची बौद्धिक वाढ, त्याची आर्थिक व नैतिक पातळी यांचा विचार करणे जरूर आहे; पण पती-पत्नींमधील मानसिक व बौद्धिक अनुरूपता हीच वैवाहिक जीवनाचा महत्वाचा पाया आहे हे आम्हा भारतीयांना केव्हा समजणार? ज्या पुरुषाच्या मनात काय विचार आहेत, त्याच्या स्वभावात काय गुणदोष आहेत याची अंधुक कल्पना नसतानासुद्धा तरुण स्त्रियांना त्या पुरुषाबरोबर—त्या अनोळखी पुरुषाबरोबर—शारीरिक उपभोग घ्यायला लावायचे यापेक्षा हृदयशून्यतेचा कळस आणखी किती वर जाणार? आणि असल्या पद्धतीबद्दल किती भारतीय तरुणांनी आत्तापर्यंत बंडे केली आहेत? पत्रिका पाहून लग्न जमवायचे आणि एकमेकांचा सहवास एकमेकांवर लादून त्यांना शारीरिक उपभोग घ्यायला लावायचे म्हणजे त्या तरुणींवर तो कायदेशीर बलात्कारच!

मी एका वेल्श युवतीबरोबर, आम्ही परस्परांना अनुरूप आहोत हे समजल्यावर, विवाह केला. "अहो दोन वर्षात ती तुमच्यापासून घटस्फोट घेऊन जाईल" असे भविष्य बऱ्याच लोकांनी केले. एकोणीस डिसेंबर सत्तर या दिवशी आमच्या लग्नाला बारा










वर्षे होतील, आमचे प्रेमाचे मतभेद होतात, पण तसेच प्रीतिसंवादही होतात. मानसिक, बौद्धिक व शारीरिक अनुरूपता असेल तर ते मतभेद क्षुल्लक प्रकारचे असतात. अशा विवाहात धुसफुस्, रडारड, आदळआपट नसते. बोचणारे काटे नसतात. खुपणाऱ्या मनाच्या जखमा नसतात. मुका मार नसतो. जे असते त्याला म्हणतात 'प्रीतिषडाष्टक' जीवाशिवांची एकी झाल्यावर जात, धर्म, रंग वगैरे गोष्टी गौणच ठरतात. स्वतःचा सहचर निवडण्याचे स्वातंत्र्य भारतातल्या तरुणींना ज्या दिवशी मिळेल तो भाग्याचा दिवस ठरेल. अर्थात् असे स्वातंत्र्य अजीबात नाही असे मला म्हणायचे नाही. पण तसे स्वातंत्र्य सर्वांना नाही ही गोष्ट कबूल करावीच लागेल. प्रचलित विवाह संस्थेतला मोठा दोष—जो गुण म्हणून दाखविला जातो—तो म्हणजे 'विवाहोत्तर प्रेम' ते प्रेम नव्हे. 'पदरी पडले आणि पवित्र झाले' या विचार-सरणीवर आधारलेले हे समर्थन. दैवात, नशिबात जे भोग असतील ते मुकाटयाने सोसावे आणि वटसावित्रीचं व्रत करावं अशी शिकवण हिंदु स्त्रियांना दिली जाते. पण मुळातच प्रेम नसले, किंवा घरातले प्रेम नाहीसे झाले तर ते दारासमोरच्या वडाची पूजा करून का परत मिळणार? काय म्हणून हिंदु-स्त्रियांनी ही मुस्कटदाबी सहन करावी? कशासाठी? कोणासाठी? किती दिवस?

"मी भारतात गेलो तर मला व्यक्ति-स्वातंत्र्य किती मिळेल?" असा एक प्रश्न माझ्यापुढे उभा राहिला. जे स्वतःच्या बुद्धीला पटेल ते निर्भयपणाने आचरणात आणावयाची सवय मला लागली. असे वैचारिक स्वातंत्र्य भारतीय तरुणांना कमी मिळते. "बाबा वाक्यं प्रमाणम्" अशी परंपरा आपल्या समाजात असल्याने तरुणांना चुका करण्याचे स्वातंत्र्य मिळत नाही. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे समाजातल्या नियमांचे आणि संयमांचे उद्दामपणाने केलेले उल्लंघन नव्हे! व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे जे बुद्धीला पटेल ते बिनधोकपणाने आचरणात आणण्याची मुभा, संधी. काही गोष्टीत दुसऱ्यांचा अनुभव उपयोगी पडत नाही. स्वतः मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही असे आपण म्हणतो पण, "तरुण पिढीला ते काही जमायचे नाही. आम्ही सांगतो त्या-प्रमाणेच काही गोष्टी केल्या पाहिजेत." अशी वृद्धांची भूमिका असल्याने, आयुष्यात स्वर्ग आणण्यासाठी तरुणांना अनुभवाचे स्वातंत्र्य मिळत नाही. तसे स्वातंत्र्य न मिळाल्यामुळे माझ्या मनाची, बुद्धीची फार कुचंबणा झाली असती.

व्यक्तिस्वातंत्र्याहून ही फार महत्त्वाची गोष्ट मला भेडसावीत होती ती म्हणजे भारतातल्या शहरातले, गावातले आणि खेड्यातले सार्वजनिक आरोग्य. इंग्लंडमध्ये दहा वर्षे काढल्यानंतर शहरातल्या स्वच्छ वातावरणात राहण्याची सवय झाल्यावर पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणी जाऊन गलिच्छ वातावरणात जन्म काढायला मन धजावेना! सामाजिक सौख्यासाठी सार्व-जनिक आरोग्य उत्तम असणे आवश्यक आहे. मोठ्या शहरांत, जिल्ह्याच्या गावी किंवा खेडेगावात, ज्या ठिकाणी माणसे एकत्र राहतात, त्या ठिकाणी काही गोष्टी अस-ल्याच पाहिजेत. समाजामध्ये सार्वजनिक भागात स्वच्छता असणे हे आरोग्याच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक. भारतातल्या शहरा-गावातली अशी सार्वजनिक ठिकाणे म्हणजे, चाळीमधले जिने, खाजगी रस्ते, व्हरांडे व समाईक शौचकूप, सार्वजनिक रहदारीचे रस्ते, देवळे, सिनेमा थिएटरे व नाटचगृहे, सार्वजनिक उद्याने, समुद्रा-काठची चौपाटी (बीच्) किंवा नदींच्या काठावरचे घाट व वाळवंटे ही होत. सिनेमा किंवा नाटचगृहात आता धूम्रपानाला बंदी आहे ही चांगली गोष्ट आहे. पण इतर जागा स्वच्छ आहेत का? पानाचा तांबडा रंग जागोजागी दिसतो. विचारवंत माणसांना गलिच्छ वातावरणात राहावे लागते हीच का भारतीय संस्कृतीची योग्यता?

मुंबई हे मोठे पुढारलेले व अद्यावत् शहर समजले जाते, पण तेथल्या चाळींना जी कळा प्राप्त झाली आहे ती पाहून, 'माणसे' असल्या वातावरणात कशी जीवन जगू शकतात याचे आश्चर्य वाटते. केरकचरा तर सर्वत्र दिसतोच, पण लहान मुलांची विष्ठाही दिसते. पाण्याची टंचाई का भासते? स्वच्छता पाळायची असेल किंवा ती मुळा-तच आणायची असेल तर चोवीस तास पाणी-पुरवठा हवा हे मुंबईकरांना अजून कसे समजत नाही? संप करा की! कॉर्पोरेशनने चोवीस तास पाणी पुरवण्याची चांगली सोय करण्याचे प्लॅनस् प्रसिद्ध

केल्याशिवाय घरपट्टी देऊ नका.

व्ही. एस्. नैपॉल् या लेखकाने भारतातल्या स्वतःच्या अनुभवांचे पुस्तक प्रसिद्ध केले. ते पुस्तक भारतीयांना आवडले नाही, कारण त्यात अस्वच्छतेबद्दल रास्त टीका होती. भारत सरकारने ते पुस्तक भारतात विकू नये असे बंधन घातले. "सरकारचे डोके ठिकाणावर होते का ?" असा लोकमान्यांचा प्रश्न पुन्हा विचारावासा वाटतो.

एका फ्रेंच कलावंताने भारतीय जीवनावर काही चित्रपट केले व ते चित्रपट या देशात टेलिव्हिजनवर दाखवले. त्यामुळे भारतीयांच्या भावना दुखावल्या गेल्या. मूळ कारण नाहीसे करण्याचे सोडून त्यांनी बी. बी. सी. ला भारतातून हाकलून दिले. किती पोरकटपणा !

भारतीय संस्कृतीच्या पोकळ गप्पा न न मारता, जर सार्वजनिक आरोग्य, स्वच्छ, शुद्ध पाणीपुरवठा, गटारे, फ्लशचे संडास, या गोष्टी जर भारतीयांनी केल्या तर मला भारताबद्दल खरा अभिमान वाटेल. चीन देशात ज्या सुधारणा होऊ शकतात किंवा जपानमध्ये ज्या झाल्या त्या हिंदुस्थानात का होत नाहीत ? लोकशाही सरकार राखूनही या सुधारणा होऊ शकतील. त्यासाठी कम्युनिझम् नको. काय हवे आहे ती गोष्ट म्हणजे अशा गलिच्छतेबद्दल चीड.

मला भारतात परत जाण्याची इच्छा होती पण माझ्यापुढच्या समस्यांना मला भारतात उत्तरे सापडली नाहीत म्हणून दूर राहिलो आहे. भारतीय मनाची 'मार्ग पाहण्याची' प्रवृत्ती जेव्हा जाईल व जेव्हा भारतीय वाटेल तेथे 'विधी' करण्याचे सोडून देतील तेव्हा कदाचित् मी भारतात परत जाईनही . . . पण तो दिवस केव्हा उगवणार ? त्या दिवसाची मी वाट पहात आहे. भारतीय संस्कृतीची मौलिकमाला उराशी बरून, पंख कापलेल्या जटायूप्रमाणे, मी रामचंद्राची वाट पहात बसलो आहे. असा रामचंद्र भारतात निर्माण व्हावा, महाराष्ट्रात निर्माण व्हावा, हीच मनोमनीची इच्छा आहे. ● ● ●

---

(पान २४ वरून–**पाहुणी**)

माझा मूड ऑफ झाला. माझ्या मनासारखे कुणी केले नाही की, मी गप्प होतो तसा गप्प झालो. माझे गप्प होण्याचे कारण तिला समजणे शक्य नव्हते. पण गप्प झाल्याचे लक्षात आले असावे.

"थंडी वाजते का तुम्हाला ?" तिने विचारले.

शैलाला वहिनीचा गुलाबी टॉपकोट दिला होता. माझा ओव्हरकोट मी घरी विसरून आलो होतो.

"अं. . . . नाही. सकाळच्या ड्रायव्हिंगने जरा पाठ स्टीफ् झालेय्."

ही थाप होती. मला थंडी वाजत होती पण माझी पाठ वगैरे दुखत नव्हती. मोटर वे वरच्या भरधाव गाड्यांचा सकाळचा भणभणाट शांत वातावरणात मनात जागा झाला.

"मग बसू या जरावेळ. समोरच्या बाकावर ?"––तिने म्हटले.

बाकाजवळ आलो तर नेमके एका जोडप्याचे प्रियाराधन शेजारी रंगात आले होते. युरोपमधला रस्त्यावरचा प्रणय पाहणारा प्रथम उगाचच स्वतःशी वरमतो,

"तुम्हाला रॉयल फेस्टिव्हल हॉलच्या अकॉस्टीकची माहिती आहे?" बाकावरच्या दृश्याकडे तिचे लक्ष गेल्यावर तिला अवघडल्यासारखे झाले असते. काहीतरी बोलायला विषय पाहिजे म्हणून मी म्हटले. पण तिचे प्रणयी युगुलाकडे लक्ष गेलेच असणार. आम्ही बाकावर बसलो नाही.

"अकॉस्टिक् म्हणजे काय ?"––तिने विचारले.

"अकॉस्टिक् म्हणजे. . . . म्हणजे मराठीत काय म्हणतात. . . आवाजाचे शास्त्र ?"

"हं. म्हणजे ध्वनितंत्र ?"

"हो. फेस्टिव्हल हॉलमध्ये जगातील सर्वात आधुनिक ध्वनितंत्र वापरलंय्. कन्सर्टस्साठी. सर्व आंतरराष्ट्रीय कीर्तीचे कलावंत येतात. रविशंकरचे तर नेहमी कार्यक्रम होतात. मोठ्ठी सुट्टी घेऊन आला असता तर, गेलो असतो आपण एखाद्या कन्सर्टला. खूप अगोदर बुकिंग करावे लागते. . . . या कट्ट्यावर बसूया ?"

टॉपकोटाची खालची दोन बटणे सोडून ती चट्कन् बसली. मी नंतर बसलो. मला थंडी वाजत होती.

मिनिट दोन मिनिटं गप्प गेली. माझे नाही म्हटले तरी आतापर्यंत बरेच वक्तव्य झाले होते. शैला बोलायला मनमोकळी होती. पण स्वतःच भाडभाड बोलणाऱ्यांपैकी नव्हती.

वेस्टमिन्स्टरहून घरी परतताना मी दोन दिवसांचा कार्यक्रम आखला.

"उद्या आपण लंडनमध्ये भटकू. परवा केंब्रिजला जायचं ?"

घरी पोहोचायला मध्यरात्र झाली. लिव्हिंगरूममधल्या सोफ्याचा बेड केला आणि पडल्याबरोबर मला झोप लागली. गाढ.

सकाळी जाग आली तेव्हा किचनमधून टोस्टचा वास येत होता. खरपूस. घड्याळात पाहिले फक्त साडेसात झाले होते. इतक्या लवकर उठून काय करायचे ? झोपायचे परत ? छेः उठलं पाहिजे. कालच्यासारखा आजचा दिवस पण हेक्टिक् जाणार. तरीही लोळत पडलोच. कालच्या दिवसातल्या घटना आठवत.

भराभर सर्व आटोपले. मनात म्हटले, ब्रेकफास्ट तयार असणार आयता.

"गुड मॉर्निंग." मी मुडात येऊन साहेबी थाटात वंदन केले.

"मॉर्निंग." माझ्याकडे न पाहता वंदनाला उत्तर मिळाले.

"सगळ्या मिळाल्या गोष्टी ? ब्रेड, लोणी, ज्याम, अंडी, चहा, साखर, दूध ? वहिनी सर्वांची यादी ठेवून गेलेय्. मिळाली ती. . . . ?"

काल दुपारी घाईत फेकून दिलेले वहिनीचे पत्र टेबलावर तसेच पडले होते. एकदम चपापलो. शैलाने वाचले असणार पत्रातले सर्व ? 'भावोजी, पुण्याच्या मुली वस्ताद असतात बरं.

जरा सांभाळून.' आणि शरदचे 'Best of Luck Mate.'

शैलाकडे पाहिले. तिचे माझ्याकडे लक्ष नव्हते. कपाटातली ज्यामची बाटली काढत होती. वहिनीचे पत्र घाईने खिशात टाकले. ब्रेकफास्ट झाला. गाडीत येऊन बसलो. सकाळच्या थंडीत पहिल्या फटक्याला सुरू व्हायला गाडीने कुरकूर केली. पण नंतर ठीक. टॉवर ऑफ लंडनकडे जायला निघालो. पण मघाची शंका मनात चुकचुकत होती.

'शैलाने पत्र खरंच वाचलं असेल ? सर्वच्या सर्व ?'

दुसरा दिवस पहिल्या दिवसापेक्षा गडबडीत गेला. झक्क ऊन होते. टॉवर ऑफ लंडन, मादाम तुसा, प्लॅनिटोरियम, जी.पी.ओ. टॉवर, ट्राफालगार, बकिंगहॅम, पॅलेस, चेंज ऑफ गार्डस् सर्व आख्ख्या एका दिवसात संपवले. रस्ते फारसे चुकलो नाहीत. गर्दी वाटली होती तेवढी नव्हती. युरोपमधले टूरीस्ट यायला अजून इतकी सुरुवात झाली नव्हती.

रविवार असल्यामुळे एखादेच दुकान उघडे होते. शैलाला कॅमेऱ्यात फिल्म विकत घ्यायची होती. रंगीत की साधी फिल्म घ्यायची तिला लगेच ठरवता येईना.

"कुठली घेऊ ?" तिला निर्णयासाठी पुरुषी सल्ला हवा असावा.

"रंगीत घ्या. परत परत थोडयाच तुम्ही इंग्लंडला येणार ?"

मागितलेला सल्ला मी दिला. तिच्या पर्समध्ये पौंडाच्या किती नोटा आहेत त्याचा मला अंदाज घ्यायचा होता. फिल्मचे पैसे देताना मुद्दाम तिच्या पर्सकडे पाहिले. फारशा नोटा नसाव्यात.

मादाम तुसा प्रदर्शनाजवळच्या एका लहानशा दुकानात बॅगपाईप घेतलेल्या स्कॉटिश हायलॅंडरची प्रतिमा तिला आवडली होती. पण तिने घेतली नाही. जी. पी. ओ. टॉवरच्या तळमजल्या-वरच्या दुकानात टॉवरच्या प्रतिकृतीची तिने किंमत विचारली. दुकानदाराने सांगितली एकवीस शिलिंग.

"अगोबाई !" करून तिने खांदे हालवले आणि घेतली नाही.

"दोन दिवस फार भरकन् गेले नाही ?" रात्री जेवण झाल्या-वर मी म्हटले.

"खरंच. पण तुम्हाला किती दिवस सुट्टी ते विचारलंच नाही." ती म्हणाली.

मला खरं म्हणजे मंगळवारी दुपारपर्यंत तरी ऑफीसला परत जायला हवं होतं. पण जावंसं वाटेना.

"तुमची किती दिवस सुट्टी आहे ?" मीच तिला उलटा प्रश्न विचारला.

"पाहुण्यांचा कंटाळा आला नसेल तर बुधवारपर्यंत." म्हण-ताना तिने डोळे टप्पोरे केले. असे हे डोळे टप्पोरे करायची तिला सवय असावी. परत कॅमेरा हातात असता तर टप्पोऱ्या डोळ्यातल्या ठिणग्या टिपल्या असत्या.

"बस्. एवढीच सुट्टी ? हजारो मैलांवर जाण्यासाठी 'एअर इंडिया' एवढीच सुट्टी देते ?"

"सुट्टी आहे अजून तशी आठ दिवस. पण रविवारी माझ्या भावाचे लग्न आहे. नागपूरला. येणारच नव्हते अगोदर. सगळं आयत्या वेळी ठरलं. पास पण फुकट गेला असता नाहीतर."

आता मला दोन दिवस तरी रजा घेतली पाहिजे. मंगळवारी आणि बुधवारी. बुधवारी संध्याकाळी शैलाला विमानतळावर सोडायचे आणि परत मोटर वे पकडायचा. मॅंचेस्टरसाठी. दोन दिवस भरकन् निघून गेले. उरलेले तीन दिवस पण भरकन् निघून जातील. मॅंचेस्टरला जायला मग अवघड वाटेल–आणि शैलाला विमानतळावर निरोप देताना पण ?

शैला आल्यापासून निवांतपण बोलायला मिळालेच नव्हते. टेलिव्हिजनवर कसलीशी रटाळ फिल्म चालली होती. व्हॉल्युम कमी केला.

शैलाचे आई–वडिल पुण्याला असतात. परांजपे महाराष्ट्र बँकेचे मॅनेजर आहेत. शैलाचा मोठा भाऊ इंजिनिअर आहे. त्याचेच लग्न येत्या रविवारी आहे. शैलाची भावी वहिनी हेमावहिनीची मैत्रिण. कुंदा गोगटे. शैला फर्ग्युसन कॉलेजमधून बी. ए. झाली. मुंबईला मामाकडे राहते. दादरला. फोर्टला तिचे ऑफीस. मामा डेप्युटी डायरेक्टर आहेत महाराष्ट्र राज्य सरकारच्या खात्यात. शैला पुण्याला अधुनमधून जाऊन येत असते. त्यांचे आपटे रोडवर

घर आहे. आपटे रोड कुठे आला ते मला माहीत नाही. तिने मला समजावून सांगायचा बराच प्रयत्न केला. पण माझ्या डोक्यात काही आपटे रोड शिरला नाही.

सकाळी उठल्यावर सर्व आटोपून जिन्यावरून खाली आलो. कालच्यासारखा आजही मोठ्ठा गुडमॉर्निंग करायचा ठरवून किचन-मध्ये शिरलो. फ्रीजच्या खालच्या खणातले शैला काहीसे वाकून शोधत होती. नॉयलॉनची पिन्क साडी ती नेसली होती आणि गुलाबी स्लिव्हलेस् ब्लाऊझ. तिच्या गोऱ्यापान दंडावर इंग्लंडच्या थंडीने काटा उठवला होता. वाकल्यामुळे कुरळ्या केसांचे झुपकेदार शेपटे एका बाजूला आले होते.

"काय हवंय् तुम्हाला ?" गुडमॉर्निंग करायला पार विसरून गेलो. ती दचकली.

"बटर शोधतेय्. संपलं असावं बहुतेक."

"संपलंय् ? घेऊन येतो पट्कन. आणखी काय हवंय् ?"

"अं.... ब्रेड आणला तर चालेल. सँडविचेस् नेता येतील आपल्याबरोबर."

काल लंचच्या वेळी सहज मी म्हटले होते, 'सँडविचेस आणले असते तर, लंचमध्ये वेळ नसता गेला.'

बँक हॉलीडे म्हणून कोपऱ्यावरचे फक्त एक ऑफ लायसेन्स शॉप तेवढे उघडे होते. गाडीने बरोबर दहा मिनिटात मिनी शॉपिंग उरकले. आजपण नशिबाने झक्क दिवस होता. गाडीचे दार लॉक् करताना बागेतल्या गुलाबाकडे लक्ष गेले. कोपऱ्यातल्या झाडावर एक मस्त कळी दिसली. शैलाच्या गुलाबी साडीवर शोभणारी.

ब्रेकफास्ट संपवून बाहेर आलो. मघाशी स्टार्ट करताना गाडीने आजपण त्रास दिला. चोक्‌ची केबल् सैल झाली असावी. चट्कन् घट्ट करावी म्हणून बॉनेट उघडले. पक्कडीने केबलचे टोक पिरगळून टाकले. बाकी सर्व ठीक दिसले. स्पार्क प्लग्ज नवीनच होते. आता स्टार्टिंगचा त्रास व्हायला नको होता. गाडी स्टार्ट करून पाहिली एकदम परफेक्ट. फायरींग उत्तम होते. एंजिन बंद केले. बॉनेट मिटून टाकले. ओल्या फडक्याने कांचा पुसून टाकल्या. शनिवारी धुतल्याने गाडी स्वच्छ दिसत होती. आत शैलाचे सँडविचेस् चालले होते. घरात शिरताना कोपऱ्यातल्या गुलाबाची कळी खुडली.

"झालं, आटोपलं ?" ती तयारच होती. गुलाबी लिप्स्टीक तिने नुकतीच लावली असावी. टॉपकोट आणायला वर बेडरुममध्ये चालली होती.

"हं. ही तुमच्यासाठी." मी कळी तिच्यापुढे धरली. ती टप्पोऱ्या डोळ्यांनी पहात होती. नेहमी पाहते तशी. झुपकेदार शेपटे पुढे घेऊन ती चटकन् पाठमोरी उभी राहिली. तिच्या कुरळ्या केसांच्या वेणीत मी अलगद कळी खोवली. तिने नुसतेच माझ्याकडे पाहिले. 'थँक्स' म्हणाली नाही. टप्पोरे डोळेच 'थँक्स' म्हणून गेले.

गोल्डर्सग्रीन रोडवर आलो आणि आठवले ओव्हरकोट विसरला.





अनुक्रमणिका

# एफ. डब्ल्यू. वुलवर्थ
## (–कोईभी चीज उठाव)




**ब्रिटनमधले कुठलेही मोठे Shopping Center पहावयास गेले की एक विशिष्ट 'दुकान' किंवा 'स्टोअर' तिथे असतेच असते. त्याचं नांव Wool worth अत्यंत स्वस्त आणि अनेक तऱ्हेचा माल मिळणारी ही स्टोअर्स सर्वसाधारण जनतेत फार लोकप्रिय आहेत. पूर्वी ही दुकान Sixpenny Stores म्हणून प्रसिद्ध होती असे म्हणतात अजून सुद्धा Woolworth च्या दुकानातून काही काही वेळेला There are 1,000 ways to spend Sixpence अशी पाटी दिसते. खाद्यपदार्थ, नित्योपयोगी वस्तू, इलेक्ट्रिकचे सामान, विशेषतः छोटी छोटी हत्यारे ह्या दुकानांत चांगली मिळतात. लंडनमध्ये Woolworth च्या १२४ शाखा आहेत.**

**— चित्रकार यशवंत माळी.**

"अरेच्चा, आजपण ओव्हरकोट विसरलो." गाडीचा वेग कमी करत मी म्हटले.

"चला घरी परत. विसराळू माणसाला शिक्षा हवीच." ती खट्याळपणे पाहत म्हणाली.

गाडी थांबवली. बाजूच्या गल्लीत रिव्हर्स करणार होतो.

"काही नको घरी जायला. घेतलाय् मी." म्हणताना शैला माझ्याकडे पहात नव्हती. तिचे लक्ष समोरच्या घरावरच्या टेलिव्हिजन एरियलकडे होते. मागल्या सीटवर वळून पाहिले तर गुलाबी टॉपकोटच्या शेजारी माझाही ओव्हरकोट घडी करून ठेवलेला दिसला.

"ओऽह थँक्स." विलायती रिवाजाप्रमाणे मी आभारप्रदर्शनाचा कार्यक्रम उरकून टाकला.

केंब्रिज काय फक्त पन्नास मैलांवर. दोन एक तासांची राईड्. आख्खा दिवस बाकी होता. सावकाश जायचे ठरले होते. थांबत थांबत.

किंग्ज कॉलेजच्या दालनातून पाठीमागे आलो. हिरवीगार हिरवळ पाहिल्यावर मला माझ्या काव्याच्या टिचभर ज्ञानाचे प्रदर्शन करण्याचा मोह अनावर झाला. तिला नाही का वेस्टमिन्स्टर ब्रिजवर वर्डस्वर्थ आठवला? मी म्हटले,

"तुम्हाला गोविंदाग्रजांची कविता ठाऊक आहे?
हिरवे हिरवे गार गालिचे हरित तृणांच्या मखमालीचे
त्या सुंदर मखमालीवरती.........."

पुढले आठवेना. सबंध कविता म्हणण्याच्या आवेशाने सुरुवात केली पण दुसऱ्या ओळीवरच कोलमडलो.

"अरे वा, आर्किटेक्टसाहेबांनी 'फुलराणी' लिहिणाऱ्या गोविंदाग्रजांचा पण खूप अभ्यास केलाय्. आणखी कुणाकुणाचा अभ्यास आहे? 'शाकुंतल' लिहिणाऱ्या भास कवीचा? की 'ज्ञानेश्वरी' लिहिणाऱ्या तुकारामाचा?"–ती हसत होती. भयंकर मिस्किल.

कॉलेज बघून झाले. हिरवळीच्या बाजूने कॉलेजच्या पाठीमागच्या कॅम नदीकडे जात होतो. केंब्रिजच्या या जगप्रसिद्ध हिरवळीवरून चालायला टूरिस्टना मनाई होती. फक्त कॉलेजच्या फेलोज्चा तो मान होता.

"रँग्लर परांजपे, रँग्लर महाजनींसारख्या मराठी स्कॉलर्सच्या पदस्पर्शांनी पवित्र झालेय् ही हिरवळ."

वास्तविक 'रँग्लर' पदवी मिळवायला केंब्रिजला किंग्ज कॉलेजमध्ये यावे लागते की ऑक्सफर्डला, याची मला खात्री नव्हती. पण दिले ठोकून.

दगडी कमानीच्या पुलावरून कॅम नदी पाहिली. किंग्ज कॉलेजची चॅपेल (चर्च) पाहून झाले होते. केंब्रिजच्या बाजारपेठेतून दुपारीच मटकून आलो होतो. फोटो पण काढून झाले होते.

मी नदीकाठावरच्या उतरणीवर पाय लांब करत पसरलो. यावेळी तिची संमती विचारली नाही. तीही बसली. माझ्यापासून तीन फूट अंतर ठवून. जणू काही एवढे अंतर ठेवायलाच हवे होते. मी चक्क हिरवळीवर पसरलो. गार नव्हते विशेष. ती काहीसे सांगत होती. माझे लक्ष नव्हते, पण आहे असे दाखवत होतो. पाचएक मिनिटे शांत पडलो. डोळे मिटून.

टूरीस्ट लोकांची गर्दी बरीच कमी झाली होती. कॅम नदीच्या काठावर तिन्हीसांजा होत होत्या. घर सोडून परदेशात खूप दिवस राहिलेल्या माणसाला ही संध्याकाळची कातरवेळ उगाच होमसिक करते.

"माझा पुढल्या वर्षी घरी जायचा विचार आहे. थिसिस सबमिट् केल्यावर. पार्टटाईम अभ्यास चाललाय् सध्या." मी म्हटले. आता ती मला कोणत्या परीक्षेचा अभ्यास, कोणत्या डिग्रीसाठी







अनुक्रमणिका

वगैरे सर्व विचारील असे वाटले. पण तसे काही तिने विचारले नाही. मी पण सांगितले नाही. तिच्याबद्दल तिला विचारले तेवढेच ती सांगते. मग माझ्या अभ्यासाच्या कशाला आपणहून मी बढाया मारू?

तिने नुसतेच हुं: केले. एक दोन मिनिटे कुणीच बोलले नाही.

"तुम्हाला गाता येते?" टेम्सवर विचारायला विसरलेला प्रश्न विचारला.

"चांगलं नाही. पण येतं."

"आम्हाला मग गाणं ऐकायचंय्."

"म्हणू? कुठलं?"

"हिंदी नको. कुठलंही मराठी गाणं चालेल. फार नवीन नको. नवीन गाणी मला माहीत नाहीत." विचारली म्हणून माझी फरमाईश् सादर केली.

तिने गाण्याच्या ओळी मनात जुळवल्या.

अजून नाही जागी राधा
अजून नाही जागे गोकुळ

गाणं म्हणताना पर्सच्या बक्कलशी ती चाळा करत होती. मी ओव्हरकोट उशाला घेऊन नदीच्या उतरणीवर पडलो होतो. तिचा आवाज साधा होता. फार् उत्तम नव्हता. माझ्या स्वतःसाठी म्हटलेल्या गाण्याला लताच्या गळ्याची अपेक्षा नव्हती.

"थँक्स्. माहीत नव्हतं इतका सुंदर असेल तुमचा आवाज. लंडनला जाताना गाडीत आणखी एक म्हणावं लागेल."

अंधार पडायला लागला होता. मी उठून उभा राहिलो. हात पुढे केला. म्हटले,

"निघूया आता?"

ती माझ्या हाताला धरून उठली. हात माझ्या हातातच राहिला.

"किती भरकन् गेला दिवस केंब्रिजमधला." ती म्हणाली.

केंब्रिजमधून आता लंडनच्या रस्त्याला लागलो. मनात आले, 'शैला मँचेस्टरला येईल?'

तिला विचारण्यासाठी नेमकी कशी सुरूवात करावी ते समजेना. शेवटी म्हटले,

"मी एक सुचवू का तुम्हाला?"

"काय?"

"तुम्ही मँचेस्टरला याल? लंडन म्हणजे इंग्लंड नव्हे! नॉर्थ-मध्ये खूप पहाण्यासारखं आहे."

तिच्या चेहऱ्यावर फरक दिसतोय् का पहाण्यासाठी थांबून म्हटलं,

"नॉर्थमध्ये खूपच बघण्यासारखं आहे. वाटेत जाताना ऑक्स-फर्डला थांबू. शेक्सपिअरच्या स्ट्रॅटफर्डला थांबता येईल. बर्मिंग-हॅमचं बुल्रींग शॉपिंग सेंटर प्रेक्षणीय आहे. चेशायरमधली जॉड्रेल बँकही वाटेवरच आहे."










तिच्या चेहऱ्यावरच्या भावात फरक दिसला नाही. पण मी बोलणे चालूच ठेवले.

"आमच्या मँचेस्टरला पण पिकॅडिली आहे. लिव्हरपूल लांब नाही. लिव्हरपूलचं कॅथिड्रल, मर्सी टनेल, ब्लॅकपूलचा बीच, लेक्डिस्ट्रिक्ट, तुमच्या आवडत्या वर्डस्वर्थचं ग्रासमेअरचं घर. . . ."

मला यादी मोठी करायची होती. पण यादीत आणखी नांवं सुचेनात.

"सर्व पहायचं ? मग मोटारीला पंखच बसवायला हवेत."

"फार नाही हे. एखाद शंभर मैलांचा आणखी प्रवास. नाही-तरी मी मँचेस्टरपर्यंत जाणारच. आमची गाडी काय इतकी खटारा नाही. सहज होईल दोनतीन दिवसात पाहून."

आता ती काय उत्तर देते ते पहायचे होते.

"नको. एवढं पहायला लंडन टॉवरमधला राणीचा खजिना कुठंय् आपल्याकडे ? नको. पुनः केव्हातरी."

तिच्या उत्तरात निश्चय दिसला. माझा विरस झाला. मी गप्प झालो.

गुरुवारी ऑफिसला येईन सांगण्यासाठी सकाळी प्रथम फोन केला केन् लिडझेला.

दहा वाजता बँक उघडल्यावर गोल्डर्सग्रीन स्टेशनजवळच्या बँकेत गेलो. पंधरा पौंड काढून आणले.

"तुम्हाला शॉपिंगसाठी ठेवा"—मी एकेक पौंडाच्या पंधरा नोटा पाकिटात घालून शैलाला देत म्हटले. तिला न विचारता हे सर्व केल्यामुळे अनपेक्षितच होते. पैसे हातातच दिल्यामुळे तिला लगेच 'नको' म्हणवेना.

"पाहिजे तर याचा हिशोब मी पुढल्या वर्षी घरी आल्यावर द्या. ओ. के. ?"

तिला पैसे घ्यायला अगदीच अवघड वाटू नये म्हणून म्हटले.

"बरं—" म्हणून तिने पैसे घेतले. मला फार बरं वाटलं. तिने घेतले नसते तर, माझा परत विरस झाला असता. पैसे पर्समध्ये ठेवायला ती वर गेली.



आज पाऊस पडत होता. बाहेर जास्त भटकता आले नसते. शैलाला ऑक्सफर्डस्ट्रीटला शॉपिंगला न्यायचे होते. नंतर स्विंगींग लंडनच्या फॅशनची बाजारपेठ 'कार्नबी स्ट्रीट' दाखवायचा होता. दुपारी तिला ब्रिटीश म्युझियम् पहायचे होते आणि रात्री वेस्ट-एण्डमध्ये गेली पंधरा सोळा वर्षे चालू असलेले 'माऊस ट्रॅप' हे अगाथा ख्रिस्तीचे नाटक दाखवणार होतो. चार दिवस राहणाऱ्या पाहुण्यां-जवळ लंडन पहायचा खूप उत्साह होता. नव्हता फक्त वेळ.

मी म्युझियम् दोनदा पाहिले होते. आज तिसऱ्यांदा पहाणार होतो, पण शैलाबरोबर पाहताना कंटाळा आला नसता.

"ब्रिटीश म्युझियमबद्दल वाचलय्त तुम्ही ?"—तिचे ब्रिटीश म्युझियमचे ज्ञान मला अजमावयाचे होते. जगातले हे सर्वात मोठे म्युझियम खूपजण पहातात. बरेचजण 'आम्ही ब्रिटीश म्युझियम पाहिले' सांगण्यासाठी केवळ.

"फार नाही. पण वाचलंय् थोडंसं. मला कॅप्टन स्कॉटची डायरी पहायची आहे. दक्षिण ध्रुवाच्या मोहिमेत ठार झालेल्या—"

मला वाटलं होतं, 'संगम' चित्रपटात ब्रिटीश म्युझियम दाखवलं नसणार. मग शैलाला कुठून माहीत म्युझियममध्ये काय काय ठेवलंय् ते ? खरं म्हणजे, दोनदा म्युझियममध्ये जाऊन कॅप्टन स्कॉटची डायरी मी पाहिली नव्हती.

'माऊस ट्रॅप'ची तिकिटे आयत्या वेळी मिळतील की नाही शंका होती. पण मिळाली. शैलाला ऑक्सफर्ड स्ट्रीटवरच्या सेल्फ्रि-जेस्च्या दुकानाजवळ सोडले आणि गाडी पार्क करायला गेलो. परत आलो तेव्हा तिची खरेदी चालू झाली होती. पर्समध्ये निळ्या कागदात गुंडाळलेले एक लहानसे पॅकेट् दिसले. बायका ? आणि शॉपिंगला कंटाळल्यायत् कधी ? वाटले, आता सर्व दिवस शॉपिंग-मध्येच जाणार बहुतेक. तिची पर्स पण पैशांनी गच्च भरलेय. काहीच नाही तरी एक दोन नॉयलॉनच्या साड्या तरी घेईल ? सेल्फ्रि-जेसच्या सर्व मजल्यांवर जाऊन आलो. तिने फक्त एक टाय आणि नॉयलॉनचा शर्ट घेतला. साडे पंधरा इंच कॉलरच्या साईझचा. शर्ट-टायचे सर्व मिळून तीन पौंड अकरा शिलिंग झाले होते.

"निघूया आता ?"—ती म्हणाली.

"काय ? संपली खरेदी ?" मला आश्चर्याचा धक्काच बसला.

"हो."

"साडी वगैरे नाही घ्यायची ?" मी न राहवून विचारले.

"नको." तिने हसून उत्तर दिले.

पण तिच्या 'नको'मध्ये ठाम निश्चय वाटला. बायकी द्विधा मन दिसले नाही.

माऊस् ट्रॅपचा पहिला भाग एवढा चांगला वाटला नाही. सर्वसाधारण आहे. कथानक गती घेत होते. शेवट माहीत नव्हता. पण खूप नाटयमय आहे हे ऐकून ठाऊक होते. शैला रंगून गेली होती. मी हात तिच्या सीटवर नेला आणि अलगद तिच्या खांद्यावर ठेवला.








तिने पुढे घेतलेल्या गुबगुबीत शेपटचाचा स्पर्श झाला आणि माझा हात तसाच खांद्यावर राहिला. पण ती माझ्याजवळ सरकली नाही. थोड्या वेळाने पर्समधला रुमाल काढायचे निमित्त करून ती वाकली. रुमाल घेतल्यानंतर सीटला टेकून वसली नाही. मी सीट-वरचा हात काढून घेतला.

मध्यंतर झाले. संध्याकाळचे जेवण गच्च झाले होते. माझं डोकंही जरा जड वाटत होतं.

"आपण घेऊया काहीतरी?" तिला विचारले.

तिने नुसतेच 'हुं:' केले. आम्ही बारमध्ये आलो.

"ड्रिंक चालेल?"

"हो."

"काय घेणार?"

"अं.... तुम्ही काय घेणार?"

तिला ड्रिंक्सची फारशी नावं माहीत नसावीत. माझा व्हिस्की घेण्याचा विचार होता.

"मी? व्हिस्की?"

"अं.... मलाही."

"डबल?"

"हो."

'वुईथ् आईस्? ऑर विदाऊट?" माझे विलायती ड्रील पाठ होते.

"वुईथ." ती पण ऐटीत म्हणाली.

व्हिस्कीचा ग्लास तिच्या हातात दिला.

"चिअर्स" मी म्हटले.

ती व्हिस्कीचा पहिला घोट घेईपर्यंत मी जरा थांबलो. तिने घोट घेतला. मला वाटलं, ठसका लागणार आता. पण नाही लागला. मनात आले,

'अरे वा, आपटे रोडवरची वामणीण वाटली तेवढी सोवळी नाही.'

मी व्हिस्की संपवली. तिला जरा उशीर लागला. सीटवर येऊन बसेपर्यंत अंधार झाला होता. पडदा उघडला.

आता कथानकातला सस्पेन्स रंगत होता. व्हिस्कीमुळे मला खूप तरतरीत वाटत होते. तिच्या खांद्याजवळ हात परत न नेण्याचा माझा मघाचा निश्चय बदलला नव्हता. मी सावरून बसलो. थोड्या वेळाने तीच माझ्याजवळ सरकली. आणि डोकं माझ्या खांद्यावर ठेवलं. तिचा हात माझ्या हातात घेत हळू आवाजात म्हटलं.

"काय ग, आय् मीन, काय हो, ठीक नं? ड्रींकचा त्रास होतोय्?"

"नाही. थोडंसं गरगरतंय्." ती हसून म्हणाली.

मी तिला आणखी जवळ घेतलं. तिच्या हाताची लांबसडक बोटं गरम गरम झाली होती. ती मला बिलगून बसली.



## जे. लायन्स

(चला जेवायला—)

लंडनच्या कुठल्याही भागात तुम्ही फिरत असताना, दमलात अन् भूक लागली असेल तर J. Lyons ह्या हॉटेलमधे जरूर जा. ७५ वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या ह्या कंपनीची सुमारे १६० हॉटेल्स ब्रिटनमध्ये आहेत. पैकी १०३ एकटया लंडनमध्ये आहेत. ३५००० नोकर असलेली ही हॉटेल्स दरवर्षी २८ कोटींचे वर 'जेवणे' बनविते.

८ ऑगस्ट १९२५ रोजी ह्या कंपनीने एक प्रचंड खाना आयोजित केला होता. त्यावेळी उपस्थित असलेल्या ८००० पाहुण्यांच्या जेवणांची टेबले एकाला एक लागून ठेविली असती तर त्याची लांबीच मुळी ५ मैल इतकी भरली असती. ७०० आचारी आणि १३६० वेटरेसेस् पाहुण्यांचा पोटाचा प्रश्न सोडवीत होत्या. ८६,००० ग्लासेस वापरण्यात आले, पैकी ३,५०० फुटले.

बहुतेक हॉटेल्समधून Self Service असल्यामुळे दर माफक असतात व विशेषतः पाहुण्यांना परवडतात.

—चित्रकार यशवंत माळी

नाटक संपलं. शेवट खरोखरच उत्कृष्ट होता. पडदा तीनदा वर गेला. पात्रांनी तीनदा वाकून प्रेक्षकांना वंदन केले. रसिक प्रेक्षकांनी टाळ्यांचा तीनदा कडकडाट केला.

खुर्च्यांच्या रांगांतून बाहेर पडल्यावर शैला हळूच म्हणाली, "माझा हात धरता का?.... प्लीज."

मला हसू आलं. पण दाखवलं नाही.

गाडीत बसल्यावर ती बोलत होती. पण अगदी कमी. नेहमीसारखे नाही.

"मायक्रोफोन नसूनसुद्धा सगळ्या पात्रांची भाषणं कशी खणखणीत वाटत होती!"

"युरोपियन रंगभूमीवर कधीच वापरत नाहीत मायक्रोफोन." —मी ठोकून दिले.

तिला ड्रिंकची चांगलीच किक् आली असावी. पण आपल्याला काहीच होत नाही असं दाखवायचा प्रयत्न चालला होता. जिन्यातून तिला मी हात धरून वर बेडरुममध्ये नेले. तिने टॉपकोट काढून पलंगाच्या पायथ्याशी टाकला आणि चक्क बेडवर पसरली.

"कॉफी करू गरम गरम? ब्लॅक कॉफी घेतलीत तर बरं वाटेल." मला अजून हसू येत होतं.

"नको. मला काही नको. मी.... मी झोपत्ये."

तिने डोळे अगोदरच मिटले होते.

सकाळी मी जागा झालो तो शिका देत. किचनमधून भांड्यांचा आवाज येत होता. ती उठली असावी. मी ताडकन् उठलो. गाऊन चढवला. परत मला दोन शिका आल्या. किचनमध्ये डोकावले,

"काय ठिक?"

"हो. एकदम ठीक." ती ओशाळून हंसली.

"गाडीची किल्ली देता का जरा?"

"हो." मी खुर्चीवर टांगलेल्या जॅकेटच्या खिशातून किल्ल्या काढल्या.

ती किल्ली घेऊन बाहेर गेली. जाताना लिव्हिंगरुमचे दार ओढून घेतले. तिच्या हातात निळा कागद गुंडाळलेले पॅकेट होते. काल सेल्फिरजेस्‌मधून विकत घेतलेले. काहीतरी काल पडले असेल गाडीत म्हणून आणायला गेली असेल असा मी तर्क केला आणि पुन: पेपरात लक्ष घातले. सात आठ मिनिटे झाली तरी ती आली नाही. मला जरा आश्चर्य वाटले. बाहेर जाऊन बघावे असे म्हणतोय् इतक्यात ती आत आली.

मी सारखा सारखा नकळत 'थँक्स' आणि 'एक्सक्यूज मी' करतो हे तिच्या आतापर्यंत लक्षात आले असावे. माझे पेपरातले लक्ष वेधून घेण्यासाठी म्हणाली,

"एक्सक्यूज मी."

"काय?"

"थँक्स." तिने माझ्या हातात किल्ल्या ठेवल्या.

किल्ल्या देताना ती टप्पोऱ्या डोळ्यांनी पहात होती. वाटले, हिच्या मनात काहीतरी आहे. एरव्ही ती अशी मनीमाऊसारखी उगाच टप्पोरे डोळे करून पहाणार नाही.

शैला किचनमध्ये गेली. मी बाहेरचे दार उघडून गार्डनमध्ये आलो. वाचत असलेला पेपर तसाच हातात होता. गाडीकडे पाहिले. गाडीच्या पाठीमागच्या खिडकीत एक लहानशी डॉल टांगलेली दिसली. गाडीजवळ आलो. कुरळ्या केसाच्या बाहुलीने गुलाबी झगा घातला होता. हातात पर्स घेतली होती. गाडी चालू झाल्यावर तिने झोके घेतले असते. मनात म्हटले,

'अरेच्चा, निळ्या कागदात गुंडाळलेली सेल्फिरजिसेस्‌मधली खरेदी ही होती तर!'

मी किचनमध्ये आलो. तिचा स्वयंपाक चालला होता. 'कशाला घेतला हा डॉल आणण्याचा त्रास?' म्हणावे असे वाटले. पण नाही म्हटले.

"छान आहे बाहुली. आवडली मला. 'थँक्स.'"

ती नुसतीच हंसली.

अडीचला जेवण झाले. तिने पुऱ्या आणि बटाटयाची भाजी केली होती. एका डब्यात थोडी भाजी आणि पुऱ्या अगोदरच बाजूला काढून ठेवल्या.

"मँचेस्टरला गेल्यावर. तुमच्यासाठी." माझ्या हातात डबा देत म्हणाली.

"थँक्स."

मला माझ्या थँक्सखेरीज दुसरे काहीच बोलायला सुचले नाही.

सहा वाजता तिचे विमान सुटणार होते. साडेतीनला घरून निघालो तरी चालण्यासारखे होते. जेवण झाल्यावर आम्ही लिव्हिंग-रुममध्ये येऊन बसलो.

"लंडनला बदली होईल तुमची? इथल्या एअर इंडियाच्या ऑफीसमध्ये?" —मी विचारले.

"कुणास ठाऊक काय नियम आहेत ते आमच्या ऑफिसचे." एवढेच ती म्हणाली.

वेळ भराभर चालला होता.

ती वरून सूटकेस घेऊन आली. मी लिव्हिंगरूममध्ये माझी सूटकेस लावत होतो. खोलीत आली त्यावेळी तिच्या दुसऱ्या हातात कालचे नोटा घालून दिलेले पाकिट होते. पैशाचे पाकिट माझ्या हातात देत म्हणाली,

"हे पहा. तुम्ही दिलेल्या पैशातले दोन पौंड मी संपवले. बाकीचे पैसे खर्च करायला वेळच आणू दिली नाहीत तुम्ही.... किती त्रास दिला मी? खूप महत्त्वाकांक्षा घेऊन इंग्लंडला आलेल्या विद्यार्थ्याने असा भरमसाट खर्च करायचा असतो? चार दिवस राहायला आलेल्या पाहुण्यासाठी?..

मी निरुत्तर झालो. आजीसारखे तत्त्वज्ञान शिकवणाऱ्या शैलाला काय उत्तर देणार? एनव्हलप्‌मधल्या नोटा निमूट पाकिटात घातल्या.

मी बराच वेळ गप्पच होतो. माझी शांतता तिच्या लक्षात आली असावी,

"रागावलात तुम्ही?"

"नाही.छे:"

एअरपोर्टवर यायला पावणेपाच वाजले. मी फारसा बोलत नव्हतो. माझ्या मनातली व्यथा तिने ओळखली असावी.

"नागपूरचा पत्ता नाहीत दिला तुमच्या ताईंचा? शनिवारी जाईन मी नागपूरला दादाच्या लग्नासाठी. ताईंना खुशाली सांगेन तुमची."

तिला ताईचा पत्ता लिहून दिला. मनात आलं, हे काय बायकांसारखं वाकडा चेहरा करून बसलोय्? मनावरचं दडपण कमी करायला पाहिजे.

समोर बार होता. उघडला नव्हता; अद्याप. बारकडे बोट दाखवलं आणि नाटचगृहातल्या बारजवळच्या कालच्या संभाषणाची जशीच्या तशी नक्कल करत म्हटले,

"ड्रिंक चालेल?....काय घेणार?...व्हिस्की?.....डबल?....वुईथ् आईस्?...ऑर विदाऊट?"

वाटलं, आता ती डोळे टप्पोरे करून पाहील.

प्रवाशांना कस्टम एन्ट्रन्सकडे जाण्याची घोषणा झाली. इतक्यात मी तिची हँडबॅग उचलली. आम्ही रांगेत उभे राहिलो.

तिचा आवाज जड झाला होता. मला सांगत होती,

"किती धावपळ करत होता...मी आल्यापासून.....आणि केवढी काळजी घेतलीत माझी. मँचेस्टरला जपून जा....जोरात चालवू नका गाडी. केंब्रिजहून येताना चालवलीत तशी...सर्दी झालेय् तुम्हांला. सकाळी शिंकत होता...औषध घ्या काहीतरी. आणि....आणि ओव्हरकोट विसरू नका सारखा सारखा....'

तिचे डोळे एकदम डबडबून आले.

"हे काय शैला? वेड्यासारखं?"

मला नेमके काय करावं ते सुचेना. मी तिचे दोन्ही हात हातात घेतले. आता मला तिची समजूत घालायला पाहिजे होती. पण तिने एकदम तिचे हात माझ्या हातांतून सोडवून घेतले. डोळे कोरड करत म्हणाली,

"तुम्ही पुढल्या वर्षी घरी याल तेव्हा मी डेहराडूनला असेन. आमच्याकडे या....डिसेंबरमध्ये माझं शुभमंगल आहे. कॅप्टन रानड्यांशी....."

ती कॅप्टन रानड्यांची माहिती सांगत होती. मी ऐकत होतो. कस्टम्सच्या दाराजवळ आलो एव्हांना.

"यस् प्लीज ?—"

प्रवेशद्वारावरचा ऑफीसर तिचे लक्ष वेधून घेण्यासाठी म्हणाला. तिने माझ्याजवळून हँडबॅग घेतली. पासपोर्ट तिकिट दाखवले आणि आत गली. काचेपलिकडून हात हलवून ती माझा निरोप घेत होती.

विमानात चढताना पण ती हात हालवत होती. विमान वळले. रनवेवर गेले. एअर इंडियाच्या बोईंगने आकाशात वेगाने झेप घेतली. चार दिवसांची पाहुणी परत गेली.

एअरपोर्टच्या टनलमधून मोटर वे च्या रस्त्यावर आलो. मँचेस्टर आता दोनशे मैलांवर. समोरच्या कारला ओव्हरटेक् करणार होतो. गाडी उजवीकडे मधल्या लेन्मध्ये वळविण्यापूर्वी आरशात पाहिले. गुलाबी पोषाख केलेली, पर्स घेतलेली, कुरळचा केसांची बाहुली दिसली आरशात. झोके घेताना.

● ● ●

---

(पान २६ वरून—फक्त पाहुण्यांसाठी)

"काय साहेब, काही Drink वगैरे घेणार का?"—गृहस्थ.

"मी काही नियमित पीत नाही, पण तुम्हाला Company पाहिजे तर आनंदाने देऊ"—मी.

"नाही, नाही, म्हणजे तसं नाही. मला विमानात २५ शिलींगाला व्हिस्कीची बाटली मिळाली आहे. बाहेर मला वाटते ४७।४९ शिलींग पडतात; परंतु तुम्ही मला ४० शिलींग दिलेत तरी चालतील" —गृहस्थ

"माफ करा! परंतु अशा तऱ्हेने "व्हिस्की घेणे मला परवडणार नाही. वरे Drinks शिवाय माझे चालत नाही असेही नाही. काहीही असलं तरी तुम्ही देऊ केलेल्या Offer बद्दल थँक्स्"—मी.

आता ह्याच सद्गृहस्थांजवळ दुसऱ्या दिवशी लंडन बघण्यास निघत असताना झालेला संवाद ऐका

"तुम्ही दहा-बारा पौंड मला उसने देऊ शकाल का? मुंबईला गेल्याबरोबर तावडतोब तुमच्या घरी मी त्यांचे रुपये नेऊन देईन"—गृ.

"अगदी आनंदाने! फक्त एकच. बाहेर ३० ते ३२ रुपये पौंडाचे कुणीही देतो. आणि सरकारी भाव ३८ रु. आहे. पण तुम्ही २५ च्या भावाने माझ्या घरी रुपये नेऊन देणार असाल तर दहाच काय वीस पौंडही तुम्हाला आत्ता देतो"—मी.

तात्पर्य सांगावयाची आवश्यकता आहे असे मला वाटत नाही. लंडनला येण्यासाठी सर्वात चांगले दिवस जून, जुल, ऑगस्ट हे तीन महिने. ह्या काळात 'दिवस' मोठे असतात. हवा चांगली असते. म्हणजे थंडी नसते. बागा फुललेल्या असतात. अर्थात ज्यांना थंडीची, बर्फाची मजा चाखावयाची आहे, दुपारी ४ वाजता अंधार बघावयाचा आहे त्यांनी मात्र डिसेंबर-जानेवारी हे महिने पसंत करावेत. एक मात्र लक्षात ठेवावे. येथील हवामान अत्यंत चंचल व बेभरवशाचं असं आहे. हवेत सतत बदल होत असतो. येथील हवामानाबद्दल विश्वासाने एकच सांगता येईल आणि ते म्हणजे ते अगदी 'अविश्वसनीय' असे आहे. मागे T.V. वर एक मनुष्य सांगत होता, 'If you don't like English weather, wait a minute!' यात काय ते समजा. ह्याखेरीज कुणाला Derby, Grand National सारख्या घोड्यांच्या शर्यती, क्रिकेटचे सामने, Motor-Show, Boat show, Dog show, Flower show, इत्यादी बाबतीत खास् गम्य असेल तर त्यासंबंधी माहिती तेथील British Embassy मधे चौकशी केल्यास मिळू शकेल.

ह्याखेरीज सार्वत्रिक निवडणुका किंवा Apollo चे कार्यक्रम T. V. वर बघण्यात एक प्रकारचे नावीन्य असते. त्यांच्या तारखा वर्तमानपत्रात बरेच दिवस आगाव् प्रसिद्ध होतात त्याही साधता आल्यास साधाव्यात.

खरे म्हणजे १।२ दिवसात लंडन शहर बरेच पाहून होते. अर्थात तुम्हाला किती वेळ आहे? तुम्हाला कशात Interest आहे! आणि तुमचे पाकीट किती भरलेलं आहे या सर्व गोष्टींवर तुम्हाला

आणखीही कार्यक्रम आखता येईल. २।४ दिवस सवड असेल तर शेक्सपीअरची जन्मभूमी, बर्मिंगहॅम, मँचेस्टर, एडींबरा, यापैकी कुठेतरी जाणं जमेल. रसिक असाल तर थोडंसं Night life बघा.

Red Rover नावाचे बसचे एक ७ शिलींगाचे तिकीट मिळते. ह्या तिकीटावर तुम्हाला लंडनच्या सुमारे १५०० मैल लांबीच्या रस्त्यावर फिरणाऱ्या कुठल्याही बसने प्रवास करता येतो. कुठल्याही अंडरग्राऊंड स्टेशनच्या Booking Office मधे मिळणारे हे तिकीट लंडन पहाण्याच्या दृष्टीने फारच सोयीस्कर व स्वस्त असते. ज्यांना आठवडाभर रहावयाचे आहे त्यांच्यासाठी बस व Unperground असे जोड तिकीट २ पौंड १० शि. चे एक तिकीट असते. पहाण्याची मुख्य ठिकाणे, तेथे कसे जावयाचे, उघडण्याच्या आणि बंद होण्याच्या वेळा ही सर्व माहिती असलेली पत्रके अनेक ठिकाणी व विनामूल्य अशी मिळतात.

आता इथे येऊ इच्छिणाऱ्या सुप्रसिद्ध गायक वादक, नट-नटी आणि अशाच अनेक कलाकारांना थोडेसे सुचवावेसे वाटते. भारतात तुमच्या कार्यक्रमाला कितीही लोक येत असतील, महिनो न् महिने थिएटर हॉऊसफुल्ल जात असेल किंवा तुमची बिदागी चार आकड्यांच्या खाली कधीही येत नसेल तरी ते स्टँडर्ड ठेवून येथे येऊ नका. जाण्यायेण्याचा तर सोडाच, पण इथे रहाण्याचा खर्चही (अर्थात कुणा नातेवाईक किंवा मित्राकडे राहिल्यास गोष्ट निराळी) बाहेर पडणे कठीण जाईल. अगदी प्रामाणिक कल्पना असते, २।४ ठिकाणी कार्यक्रम करू. १०।१० शिलींग देऊन शंभर लोक जरी आले तरी १००।१२५ पौंड सहज मिळतील. सहा-सात वर्षांच्या अनुभवाने, तीन-चार सुप्रसिद्ध कलावंतांच्या प्रत्यक्ष सहवासात राहील्यानंतर सांगतो की, अशा अपेक्षा धरून इथे आलात तर निराशा होईल. खाजगी कार्यक्रम केला तरी २०।२५ जणांपेक्षा जास्त लोक रहातील एवढा मोठा हॉल असलेले घर मिळणे कठीण. त्यात पेटी-तबला यांना काहीतरी द्यावे लागणार. मग तुमच्या हातात काय पडणार? बरे एखादा मोठा हॉल घेऊन कार्यक्रम करावयाचे ठरले तरी तिकीटांची छपाई, हॉलचे भाडे, ज्यांच्याद्वारे कार्यक्रम करणार त्यांचे कमिशन, साथीदार यांना देऊन बाकी काय रहाणार? मुख्य कारण असे असते की, तिकीट थोडे असले तरी जाण्यायेण्याचा प्रवासखर्च, मुलांना कुठे ठेवावयाचा हा प्रश्न इ. इ. अनेक अडचणींमुळे लोक फार थोडे येतात. शिवाय यथील हवा. अनेक कार्यक्रमांचे सूत्रधार ज्यांना म्हणता येईल असे एक गृहस्थ नेहमी म्हणतात, "कार्यक्रमाला लोक दोन कारणांसाठी येत नाहीत. एक हवा वाईट म्हणून आणि दुसरे हवा चांगली आहे म्हणून" तेव्हा अशा मंडळींनी केवळ एक देश बघावयाचा, पैशाची अपेक्षा ठेवावयाची नाही, आणि चार-चौघांसारखे रहावयाची मनाची तयारी असेल तरच इथे यावे.

साहेबाच्या या देशात उठता बसता Thank you म्हणावे लागते. आपल्या सर्वांनाच ते जड जाते. उदा: बस कंडक्टर तिकीट मागावयाचे ऐवजी Thank you म्हणून हात पुढे करतो. आपण पैसे द्यावयाचे Thank you म्हणून त्याने ते घ्यावयाचे आणि आपण Thank you म्हणून तिकीट घ्यावयाचे. सर्वच जरासं अतिरेकी वाटतं; परंतु एखादी गोष्ट केल्यानंतर Thank you very much म्हणून ऐकून घ्यावयाला बरे वाटते. त्याहीपेक्षा Thanks देण्यात जास्त आनंद आहे असे मला वाटते. इथे येऊन जाणारी बहुतेक मंडळी येथून गेल्यावर साधे दोन ओळींचे पत्रही पाठवीत नाहीत. आपल्या भारताची हवाच अशी सुंदर आहे की एकदा तिकडे गेलं की इकडचं सर्व सर्व विसरावयास होतं. आता इथे एकदा येऊन गेलेल्या मंडळींची पत्रे येतात, परंतु ती वर्ष दोन वर्षांनी केव्हातरी पण त्या पत्रांची सुरवात अगदी न चुकता अशी असते—

"मागे मी लंडनला आलो असताना आपण माझे स्वागत फारच चांगल्या प्रकारे केलेत, त्याबद्दल तुमचे आभार कसे मानावे ते कळतच नाही. आता हे पत्र लिहिण्याचे कारण माझा भाऊ (किंवा मित्र) पुढील महिन्यात लंडनला येत आहे तेव्हा....

• • •










# टेलिव्हिजनचे संभाव्य दुरुपयोग

...दिल्लीतली डॉली किंवा मुंबईतली मंदाच नव्हे तर पाचोऱ्याची परकरी पपी देखील 'टेलिव्हिजन'ची आतुरतेनं वाट पाहात आहे...म्हणूनच हा धोक्याचा लाल कंदिल......

—लोकेश, लंडन



जनसंपर्क साधनाचे व लोकशिक्षणाचे एक प्रभावी माध्यम म्हणून नभोचित्राकडे (Television) भारताची नजर आता वळू पहाते आहे. युनेस्कोच्या साहाय्याने जरी १५ सप्टेंबर १९५९ पासून प्रयोगात्मक रूपात दिल्लीला चित्रक्षेपण केंद्र स्थापन झाले होते तरी आतापर्यंत या माध्यमाचा प्रसार केवळ दिल्लीपुरताच मर्यादित राहिला आहे. अमेरिका, जपान, जर्मनी, रशिया, इंग्लंड इत्यादि प्रगत देशातच नव्हे तर अन्य लहान व उद्योगधंद्याच्या दृष्टीने किंवहुना मागासलेल्या देशातही नभोचित्राचे जाळे पसरले आहे. भारतात त्या मानाने या माध्यमाचा प्रसार अगदीच कमी प्रमाणात झाला.

वास्तविक १९६५ जानेवारीमध्येच मुंबई, मद्रास व कलकत्ता या शहरात चित्रक्षेपण (T. V. Transmission) केंद्र स्थापन करायचा विचार चालू होता पण चीन व पाकिस्तान यांच्याशी झालेल्या संघर्षामुळे जे अनेक निर्णय लांबणीवर पडले त्यातला हा एक. चालू योजनेप्रमाणे १९७१-७२ मध्ये मुंबईला क्षेपण केंद्र सुरू होईल. यानंतर पुणे व श्रीनगर या दोन शहरांचा नंबर लागेल असे ऐकिवात आहे. उपग्रहाद्वारा संदेशवहनाचे (Satellite Communication) पहिले धरणी-केंद्र पुण्याजवळच आर्वी येथे थाटल्यामुळे पुण्याला याबाबतीत महत्त्व प्राप्त झाले आहे.

या माध्यमाचा शक्य तितक्या लवकर मोठ्या प्रमाणावर विस्तार व्हावा म्हणून दोन योजना प्रामुख्याने विचारात घतल्या जात आहेत.

पोस्ट व तार खात्याने संदेश जास्त संख्येत व जलद पाठविता यावेत म्हणून अति सूक्ष्म व सूक्ष्मातिसूक्ष्म लहरींच्या (Microwaves) साहाय्याने दळणवळणाचा एक देशव्यापी सांगाडा तयार करू घातला आहे. या योजनेचे बरेचसे काम झालेले आहे. नभोचित्राच्या कार्यक्रमांच्या चित्रलहरी (Picture waves) सूक्ष्मातिसूक्ष्म लहरीत मिसळून अन्य शहरी पाठविणे सहज शक्य आहे.

खेडोपाडी नभोचित्राचा संचार व्हावा म्हणून एक अभिनव प्रयोग अमेरिकेच्या 'नॅशनल एरोनॉटिक्स् अॅण्ड स्पेस अॅडमिनिस्ट्रेशन' या संस्थेच्या मदतीने मूर्त स्वरूपात आणला जातो आहे. या प्रयोगाची आधारभूत कल्पना अशी——

नभोचित्र माध्यमाच्या मदतीने व्यापक प्रमाणावर जनशिक्षण साधण्याकरिताच केवळ एक खास उपग्रह अंतराळात सोडून तो आकाशात एका जागी स्थिर करायचा. या प्रयोगासाठी योग्य असे धरणी केंद्र उभारून तिथून अनेक चित्रलहरी मिसळलेल्या सूक्ष्मातिसूक्ष्म लहरी उपग्रहापर्यंत पाठवून व त्यांचे योग्य ते रूपान्तर करून निरनिराळ्या परंतु विशिष्ट दिशांनी परावर्तित करून देशभर व विशेषतः खेडोपाडी पोहोचवायच्या. अर्थात् खेड्यामधून सामुदायिक पद्धतीने 'टीव्ही' ठेवले जातील व अशा तऱ्हेने बहुसंख्य जनतेला नभोचित्र कार्यक्रमांचा व त्यातून मिळणाऱ्या शिक्षणाचा फायदा प्राप्त होईल. एवढ्या व्यापक प्रमाणावर उपग्रहद्वारा नभोचित्र माध्यमाचा जनशिक्षणाच्या दृष्टीने जगातला पहिलाच प्रयोग असल्या-





अनुक्रमणिका

मुळे इतर देशातले लोकसुद्धा या प्रयोगाकडे अभ्यासात्मक व टीकात्मक दृष्टीने पहात आहेत. काही जाणकारांचे म्हणणे असे की, भारताने सद्यःपरिस्थितीत हा उपद्व्याप करू नये.

सरकारची नभोचित्र माध्यमाचा विस्तार करण्याची वरीलप्रमाणे तयारी चालू आहे तर सर्वसाधारण जनतेचे नभोचित्राबद्दलचे कुतुहल वाढत्या प्रमाणावर आहे. १९६६ च्या अखेरपर्यंत भारतात 'टीव्ही'चे ४५०० परवाने दिले गेले होते. आता तर भारतात तयार झालेले 'टीव्ही'सुद्धा मिळायला लागले आहेत व गिऱ्हाईकांच्या मोठ्या याद्या तयार झालेल्या आहेत. सरकारने परदेशातून 'टीव्ही' आणण्यावर इतके निर्बंध घातले असले तरी लंडनमधल्या एका दुकानदाराच्या अंदाजाप्रमाणे दर महिन्याला सुमारे ५०० 'टीव्ही' भारतात पोहचत आहेत. याशिवाय हंगेरी वगैरे देशातून सरकारी परवानगीने भारतात येणारे व विकले जाणारे 'टीव्ही' वेगळेच.

दिल्लीत अदमासे सव्वादोनशे 'टीव्ही' क्लब स्थापन झाले असून त्यांची सदस्य संख्या काही हजारांवर गेली आहे. प्रत्येक कार्यक्रम अंदाजे २५-३० हजार लोक पहात असावेत. सध्या हे कार्यक्रम फक्त संध्याकाळी दोन तास चालतात. याव्यतिरिक्त शहरातल्या शाळांमधून एकंदर ५१७ 'टीव्ही' आहेत. व शाळांकरिता शैक्षणिक कार्यक्रम आयोजित करण्यात आले आहेत. हे कार्यक्रम पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, सामान्यविज्ञान व इंग्रजी या विषयाकरिता तयार केले असून त्यांचा सुमारे १ लक्ष ३२ हजार विद्यार्थ्यांना फायदा होतो आहे.

नभोचित्र माध्यमाच्याद्वारे जे कार्यक्रम सादर केले जातात त्यातले जिवंत चित्रदर्शन दाखवणारे कार्यक्रम फारच कमी असतात. पुष्कळशा कार्यक्रमांच्या चित्रपटासारख्या फिल्म्स् बनविल्या जातात; किंवा टेपरेकॉर्डरवर अगोदरच मुद्रित करून ठेवलेले कार्यक्रम सोयीचे निवेदन व संपादन करून प्रक्षेपित केले जातात.

कोणत्याही प्रसंगाचे चित्रण करीत असताना ते कोणत्या बाजूने, कसे व किती करायचे हे कुणीतरी सूत्रधार ठरवीत असतो. हे चित्रण ज्या दूर-दृश्य कॅमेऱ्याच्या (T. V. Camera) साहाय्याने केले जाते त्यात भरारी-भिंग (Zoom Lense) हा एक जादुगार बसविलेला असतो. या जादुगाराच्या साहाय्याने एक प्रकारचा आभास निर्माण करता येतो; असा की, जणू काय कॅमेराच चित्रवस्तूपासून दूर जात आहे किंवा तिच्याजवळ येत आहे. म्हणूनच घटना स्थळापर्यंत दूर कॅमेरा ठेवूनसुद्धा सूत्रधाराला एखाद्या प्रसंगाचे ओझरते किंवा ठळक चित्रण करता येते. अर्थात् हे सगळे चित्रण चालू असताना सूत्रधाराला स्वतंत्रपणे निर्णय घेण्याची मुभा असते.

कोणत्याही प्रसंगाचे चित्रण केले जाते तेव्हाच निवेदन व संपादन सहसा होत नाही. त्यामुळे चित्र, निवेदन व संपादन यांचा वस्तुस्थितीशी मेळ असतोच असे नाही. परंतु 'टीव्ही'वर कार्यक्रम पहात असलेला हजारांचा जनसमुदाय मात्र या कार्यक्रमाकडे संकलित म्हणूनच पहात असतो. अर्थात लोकांच्या मनावर जे दिसते तेच प्रतिबिंबीत होते व स्मरणात रहाते.









म्हणूनच नभोचित्राचे कार्यक्रम संकलित करीत असताना संबंधित अधिकाऱ्यांवर एक जबाबदारी येऊन पडते की त्यांनी प्रसंगांचे चित्रण, तत्संबंधी निवेदन आणि संपादन जितके यथार्थ करता येईल तितके केले पाहिजे.

अंतर्गत व जागतिक समाचार हा कोणत्याही नभोचित्रावरचा ठरलेला कार्यक्रम आहे. नभोचित्रावर समाचार सांगत असताना एक तर प्रसंगाचे घेतलेले चित्र किंवा पार्श्वभूमी म्हणून सोयीनुसार दाखविलेले चित्र असते. पण दुसऱ्या एखाद्या देशाच्या मंत्रिमंडळाचा निर्णय सांगत असताना त्या देशाच्या पंतप्रधानांचा अथवा प्रधान कार्यालयाच्या इमारतीचा फोटो पार्श्वभूमी म्हणन न दाखवता जर त्या देशातल्या सायकल रिक्षाचेच चित्र दाखविले गेले तर त्याचा जनमनावर काय परिणाम होईल?

अमेरिका, इंग्लंड आदि तथाकथित प्रगत देशांतले रहिवाशी, ज्यांना भारतासारख्या देशात जाण्याचा कधीच योग आलेला नसतो, ते बऱ्याच वेळा नभोचित्रावर दाखविल्या गेलेल्या दृश्यावरून किंवा सांगितल्या गेलेल्या निवेदनावरून, "तुम्ही असेच झोपडयातून आणि गलिच्छ वस्त्यांमधूनच भारतात राहता का?" असा खुळचट प्रश्न विचारत असतात.

दाखविले जाणारे चित्र व निवेदकाचे निवेदन यात बऱ्याच वेळा तफावत असते. याचे उत्तम उदाहरण 'लुई माल' यांच्या 'भारतात' सापडते. नभोचित्रावर इंग्लंडमध्ये दाखविल्या गेलेल्या भारतासंबंधी या आणि इतर कार्यक्रमांवर भारतात बरेच वादळ झाले हे सर्वांना माहीत आहेच.

कार्यक्रमांची एकसूत्रता व पार्श्वभूमी सांधत असताना पुष्कळ वेळा अनवधनाने सत्यस्थिती नजरेआड केली जाते. उदाहरणार्थ 'भारत–एक गोंधळलेला राक्षस' हा कार्यक्रम सादर करीत असताना सुरवातीचे संपादकीय कथन होते– "लेखक सोळा वर्षांच्या पाश्चात्य आणि सुसंस्कृत शिक्षणानंतर मायभूमीला भेट देता झाला." यात तथाकथित लेखकाने आपले भारतीय नागरिकत्व केव्हाच झुगारून दिले होते ही सत्यस्थिती संपादकाने नजरेआड केली.

पुष्कळ वेळा कार्यक्रमांच्या चित्रात किंवा निवेदनात खास चूक किंवा तफावत नसते, परंतु ज्या पद्धतीने कार्यक्रम सादर केले जातात त्यावरून प्रेक्षकांचा सहज गैरसमज होण्याचा संभव असतो. 'इंग्लंडच्या इतिहासातला पर्वाचा दिवस (१९४५-५९)' असा एक कार्यक्रम दाखवत असताना सर विन्स्टन चर्चिल यांची युद्धोत्तर काळातली एकूण कामगिरी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. मला वाटतं चर्चिल यांना नंतरसुद्धा त्यांचे चाहते "प्राईम मिनिस्टर" म्हणूनच संबोधत असत. अर्थात वर उल्लेखिलेल्या कार्यक्रमातही त्यांचा उल्लेख १९५६-५७ चा काळ दाखवत असताना असाच केला आहे; पण तो कार्यक्रम पाहून, एका १९४८ मध्ये जन्मलेल्या इंग्रजी तरुणाचा असा ग्रह झाला की चर्चिल १९५६ ते ५७ या काळातही पंतप्रधान होते व मॅकमिलन आणि ॲन्थनी ईडन हे त्यांच्या मंत्रिमंडळात कुणीतरी मंत्री होते.

नभोचित्र माध्यमाचा शैक्षणिक उपयोग व्हायचा असेल तर असे गोंधळात टाकणारे प्रसंग टाळणे अगत्याचे आहे.

ज्या दोषांची वर चर्चा केली आहे ते दोष वर्तमानपत्र, चित्रपट व रेडिओ आदि माध्यमातूनही आढळतात मग नभोचित्र माध्यमावरच एवढी चर्चा का? असा प्रश्न विचारला जाईल; पण पाश्चात्य समाजाकडे पाहिल्यावर नभोचित्र माध्यमाच्या गंभीर परिणामांची कल्पना येते. पाश्चात्य नागरिकांचा फुरसतीचा वेळ बहुतांशी 'टीव्ही' बघण्यात जातो. नभोचित्र माध्यमाच्या मर्यादा कळत असूनही 'टीव्ही'वर पाहिलेले कार्यक्रम लोकांच्या मनावर चिरस्थायी परिणाम करू लागले आहेत. 'टीव्ही'वरचे सगळेच खरे अशी सर्वसाधारण जनतेची समजूत होऊन बसली आहे.

हीच परिस्थिती नभोचित्राचे देशभर जाळे पसरल्यावर भारतातसुद्धा निर्माण होईल. 'टीव्ही'चे आकर्षण सगळ्यांनाच असावे, तरीपण मुलांना नावीन्यात नेहमीच आकर्षण असते म्हणून ती नभोचित्रक्षेपण केंद्र स्थापन व्हायची उत्सुकतेने वाट पहात आहेत. आजच दिल्लीतील डॉली किंवा मुंबईतली मंदाच नव्हे तर पाचोऱ्यातली परकरी पमी सुद्धा ओळखून आहे की खेडोपाडी टेलिव्हिजन आला म्हणजे, "किती किती मजा येईल! घरच्या घरी नुस्ते सिनेमाच नाही तर अमेरिकेतल्या सौंदर्यस्पर्धासुद्धा बघायला मिळतील आणि सगळ्या नटनटचांची दर्शनं घडतील." आणि शाळेतून बाहेर पडू पाहणारा चौकस विठू तर मानवाची चंद्रावरची सफर प्रत्यक्ष स्वरूपात पाहायला मिळेल म्हणून किती उत्सुकतेने मुंबईत नभोचित्रक्षेपणकेन्द्र स्थापन व्हायची वाट बघतो आहे. मात्र मुलांची अनुकरण करण्याची प्रवृत्ती लक्षात घेतल्यास या लेखात जे 'टीव्ही'चे दुरुपयोग सांगितले, त्या दृष्टीने प्रसंगांच्या चित्रिकरणाची व संपादनाची खबरदारी संबंधित अधिकाऱ्यांनी घेणे हितावह होईल. लंडनमध्ये वास्तव्य करणारी लहान लहान मुले आपल्या आईबापांना 'टीव्ही'वरचे अनुकरण करून दाखवतात. उदाहरणार्थ "डॅडी आय् वॉन्ट ए गन् ॲण्ड हॉर्स, आय् वील् शूट यू. किंवा "अंकल हाऊ मेनी गर्ल फ्रेण्डस् यू हॅव?" असले प्रश्न अर्थ न कळताही अनुकरणप्रिय होतात. मुलांच्या मनावर योग्य संस्कार कसे होतील? हे ध्येय समोर ठेवून कार्यक्रम आखले गेले तर 'टीव्ही'चे दुरुपयोग टाळता येण्यासारखे आहेत.

● ● ●










मधुकर घाटे, लंडन

# लंडनमधील कला विद्यालये व शिक्षण पद्धती

कलेच्या उच्च शिक्षणाकरिता जगाच्या सर्व भागातून कित्येक विद्यार्थी दरवर्षी लंडनला येत असतात. येथील कलाविद्यालयात प्रथम, द्वितीय, तृतीय अशा वर्गातील विद्यार्थी एकत्र बसतात. २० जणांची एक तुकडी अशा अनेक गटात हे विद्यार्थी विभागलेले असतात. प्रोफेसर्स विद्यार्थ्यांच्या वैयक्तिक पातळीनुसार त्याला मार्गदर्शन करीत असतात. एकत्र-वर्गपद्धतीमुळे नवीन विद्यार्थ्यास कोणत्या पद्धतीने काम करायचे ते वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांची कामे पाहून शिकता येते, जलद गतीने शिकता येते हा एक मोठा फायदा होतो.

येथे कलेला फार महत्त्व दिले जाते. प्राथमिक शाळांपासून एखाद्या मोठ्या कलाविद्यालयापर्यंत सर्व शिक्षणसंस्थांतून, कमर्शियल आर्ट, फाईन आर्ट, हॅण्डीक्राफ्टस, वर्कशॉपमॉडेलिंग, एम्ब्रॉयडरी, पॉटरी असे अनेक कलाविभाग असतात व ते शिकविणारे खास शिक्षकही असतात. एकच ड्रॉइंगमास्तर सर्व विषय शिकवत नाही. थोडक्यात म्हणजे प्रत्येक शिक्षणसंस्थेमध्ये एक छोटेसे कलाविद्यालय असते.

कसबी कलांकरिता पुढे अनेक स्वतंत्र कलाविद्यालये आहेत. तेथे निरनिराळ्या डिप्लोमांकरिता विद्यार्थी तयार केले जातात; परंतु याहीपेक्षा अधिक कसबी विद्यार्थ्यांकरिता जगप्रसिद्ध अशा विशेष संस्था इथे आहेत. (१) कमर्शियल आर्ट (ग्राफिक डिझाईन) साठी सेंट्रल स्कूल ऑफ आर्टस् ॲण्ड क्राफ्टस्, (२) पेन्टिंग व मॉडेलिंगकरिता स्लेडस्कूल ऑफ आर्टस्, (३) प्रिन्टिंगकरिता लंडन कॉलेज ऑफ प्रिंटिंग, (४) ग्राफिक आर्ट व पेन्टिंग यासाठी रॉयल कॉलेज ऑफ आर्टस् अशा संस्था प्रसिद्ध आहेत. या संस्थांतून अगदी उच्च दर्जाच्या विद्यार्थ्यांना खास कसबाचे शिक्षण दिले जाते. येथे प्रवेश मिळणे अत्यंत अवघड काम आहे. कामाचा दर्जा विशिष्ट असल्याखेरीज असा प्रवेश मिळत नाही. या संस्थांचा स्वतंत्र ॲकॅडेमिक डिप्लोमा आहे. तसेच सोसायटी ऑफ इंडस्ट्रियल आर्टिस्ट, मिनिस्ट्री ऑफ एज्युकेशन व युनिव्हर्सिटी डिप्लोमा यासाठीही विद्यार्थी तयार केले जातात. परंतु संस्थांचा स्वतःचा डिप्लोमा इतर अभ्यासक्रमांपेक्षा अधिक उच्च दर्जाचा असून, विद्यार्थ्यांना त्यासाठी अधिक मेहनत करावी लागते. या डिप्लोमाकरिता प्रत्येक विभागातून साधारणतः आठ ते बारा विद्यार्थ्यांना परवानगी मिळत असते. त्यातही डिप्लोमा कॉम्पिटिशनच्या चाचणीतून उतरलेल्या अशा चार-पाच विद्यार्थ्यांनाच अंतिम परीक्षेसाठी निवडले जाते.

(१) सेंट्रल स्कूल ऑफ आर्टस् ॲण्ड क्राफ्टस्, (२) स्लेडस्कूल ऑफ आर्टस् व (३) रॉयल कॉलेज ऑफ आर्टस् यांचे डिप्लोमा समान दर्जाचे समजले जात असून, युनिव्हर्सिटीच्या प्रथम पदवीच्या दर्जाचे हे शिक्षण आहे असे मानले जाते. विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याची या संस्थांची पद्धती विशेष अशीच आहे. पेंटिंगचा जर वर्ग असेल तर विद्यार्थ्याने लाईफवरून केलेल्या पेंटिंगवर प्रोफेसर चर्चा करतात व त्याने केलेल्या चुका त्याच्या निदर्शनास आणून देतात. समजा लाईफ पेंटिंग हा विषय आहे, त्यात विद्यार्थ्याने नाक, कान, डोळे, ओठ हे अवयव स्पष्ट काढलेले नाहीत, अशा वेळी प्रोफेसर विद्यार्थ्याने काढलेल्या ड्रॉइंगला स्पर्श न करता बाजूच्या कॅन्व्हॉसवर कोपऱ्यात लहानसे ड्रॉइंग काढून दाखवतात व प्रत्येक भाग स्पष्ट करून सांगतात. त्या विवरणातून विद्यार्थ्याला विषयाची मूलतत्त्वे कळत जातात





अनुक्रमणिका

व तो त्या चित्राला निश्चित आकार देण्याकरिता झगडत राहतो. त्याला स्वत:च्या प्रगतीबद्दल विश्वास वाटू लागतो. आपल्या कामाचा दर्जा काय आहे याचीही जाणीव त्याला होते. विवरणासाठी स्केलेटन्स व मसल्स स्टडीजचे स्टॅच्यूज यांची मदत घेतली जाते व मॉडेल्सवरून मोल्डिंग, शेड व लाईट यांचे पृथक्करण केले जाते. इथे लाईफ पेंटिंगचा वर्ग म्हटला की, तेथे सर्व वास्तवावर आधारलेले काम हवे, 'मॉडर्न आर्ट' चालत नाही, मूलतत्त्वांवर विशेष भर दिला जातो व विद्यार्थ्यांना नीट समजावे म्हणून शिक्षकवर्ग प्रयत्नशील असतो.

कॉम्पोझिशनच्या वर्गात मात्र ॲबस्ट्रॅक्ट पेन्टिंग्ज केली जातात. तेथे बंधन असे काही नाही. काही विद्यार्थी 'रिॲलिस्टिक वर्क' पण करतात; परंतु जर ते काम मूलतत्वांना धरून नसेल तर विद्यार्थ्यांना परीक्षेत उत्तीर्ण होण्याची शाश्वती नसते.

ग्राफिक डिझाईन (कमर्शियल आर्ट)च्या वर्गात विद्यार्थ्यांना त्यांचे शिक्षक निरनिराळ्या विषयांवरील वीस ते पंचवीस प्रश्नांची यादी देतात. त्यातील एका विषयाची निवड करून त्यावर एक स्केचेस व लेआऊट करण्यास सांगतात. विद्यार्थ्याने केलेल्या अनेक रफ लेआऊटस्मधून प्रोफेसर त्याला त्यातील काही लेआऊटस् निवडण्यास सांगतात. निवडीचे स्वातंत्र्य विद्यार्थ्यांना असते. अमुकच निवड का केली त्याची कारणे विद्यार्थ्यांना द्यावी लागतात व त्यावर शिक्षकांशी चर्चा करावी लागते. अशा चर्चांतून लेआऊटस्मधील दोष विद्यार्थ्याला कळून येतात व ते तो दुसऱ्या स्टेजमधील लेआऊटमध्ये दुरुस्त करून घेतो. पुन: चर्चा, पुन: निवड अशा पद्धतीने विद्यार्थी फायनल डिझाईनपर्यंत पोचतो. पूर्वतयारी करण्यासाठी, संदर्भ मिळवण्यासाठी ग्रंथालये, म्युझियम्स, आऊट डोअर स्केचिंग व फोटोग्राफस् यांची मदत विद्यार्थ्याला घ्यावी लागते. आऊट डोअर स्केचिंग आवश्यक असल्यास त्यासाठी अध्यापकांच्या परवानगीने बाहेर जाता येते. अध्यापकांचे मार्गदर्शन फायनल डिझाईन पूर्ण होईपर्यंत मिळत असते. अमुक विषय ठराविक वेळात संपविला पाहिजे असे बंधन नसते. विविध प्रयोगातून, चाचण्यातून पार पडून पूर्ण होण्यास एका डिझाईनला तीन ते चार महिने लागतात. यातूनच प्रयोगशील विद्यार्थ्यांच्या कल्पनाशक्तीला चालना मिळते व तो अधिक जिज्ञासू बनतो.

स्कूल ऑफ आर्टस् अथवा कलाविद्यालयांमधून निरनिराळ्या विषयांवर परदेशी अगर स्थानिक जाणकारांची व्याख्याने होतात, स्लाईडस् दाखविल्या जातात. विविध प्रदर्शने व जुन्या प्रसिद्ध कलाकारांची पेंटिंग्ज पाहावी असा आग्रह असतो.

ठराविक अभ्यासक्रम पूर्ण झाल्यानंतर काही डिप्लोमांकरिता परीक्षा व प्रबंध असतात; परंतु उच्च प्रतीच्या कलाशिक्षणाकरिता ठराविक परीक्षा नसते. ज्या विद्यार्थ्याचा अभ्यास कलाविद्यालयाच्या नियमात बसणारा असेल त्यालाच डिप्लोमाच्या चढाओढीत भाग घेता येतो.

कलाविद्यालयांचे जे खास असे ॲकॅडेमिक डिप्लोमाज् असतात त्यांच्याकरिता वेगळ्या पद्धतीने परीक्षा घेतल्या जातात. त्या अशा : फायनल डिप्लोमा परीक्षेपूर्वी तीन महिने विद्यार्थ्यांनी केलेल्या तीनचार वर्षांच्या कामाचे नमुने परीक्षक-मंडळाकडून तपासले जातात व पात्र ठरणाऱ्या विद्यार्थ्यांनाच फायनल डिप्लोमाकरिता परवानगी दिली जाते. साधारणत: परवानगी दिलेल्या ४ ते ६ विद्यार्थ्यांपैकी एखादादुसरा विद्यार्थी फायनलमध्ये नापास होतो.

वरील परीक्षेसाठी परवानगी मिळालेल्या विद्यार्थ्यांच्या चित्रांच्या नमुन्यांचे प्रदर्शन कलाविद्यालयातील प्रदर्शनगृहात भरवले जाते. नंतर परीक्षकमंडळ त्याची पाहणी करीत असतात. ज्या विद्यार्थ्याच्या चित्राचे निरीक्षण केले जात असेल त्याच्या गेल्या तीनचार वर्षातील कामाच्या प्रगतीबद्दल विभागप्रमुख परीक्षक मंडळास माहिती देत असतात. त्याचवेळी परीक्षकमंडळ विभागप्रमुख व विद्यालयाचे प्राचार्य चर्चा करुन आपले निर्णायक मत देत असतात. त्याच दिवशी उत्तीर्ण उमेदवारांची यादी विद्यार्थ्यांना फलकावर पाहायला मिळते. "डिप्लोमा विनर्स म्हणून या विद्यार्थ्यांचे अभिनंदन सर्व विद्यालयभर सर्वांकडून होत असते.

यशस्वी उमेदवारांच्या चित्रांचे प्रदर्शन साधारणत: दोन आठवडे जाणकारांच्या निरीक्षणासाठी खुले असते. विद्यार्थ्यांच्या कामाचा दर्जा बाह्य जगाला कळावा हाच त्यात हेतू असतो.

पदवी (डिप्लोमा) वितरण हा एक फार मोठा सोहळा असतो. अध्यक्षस्थानी रॉयल सोसायटी ऑफ आर्टस्चे अध्यक्ष अथवा शिक्षणमंत्री अशासारखी अधिकारी व्यक्ती असते. निमंत्रितात सर्व परीक्षकमंडळ, मोठमोठ्या क्षेत्रातील प्रमुख मंडळी असतात. यशस्वी विद्यार्थ्यांच्या स्वागताची भाषणे होतात. प्रत्येक विद्यार्थ्याचा स्वतंत्र उल्लेख होतो व त्याला अध्यक्षांच्या हस्ते पदवी प्रदान केली जाते. अशी ही येथील कलाविद्यालयांची शिक्षणपद्धती आहे.

• • •



# दुखावलेल्या कळ्या

कु. नलिनी निमकर, लंडन

लंडनपासून तीस मैल दूर असलेल्या या 'बिघडलेल्या मुला-मुलींच्या' शाळेत मला जेव्हा प्रवेश मिळाला तेव्हा माझ्या सर्व मैत्रिणींनी माझी चेष्टा केली. मी इथं विद्यार्थिनी म्हणून आले नाही, तर, एक शिक्षिका म्हणून व दुसरे म्हणजे शिक्षण घेण्यासाठी म्हणून अशा दुहेरी हेतूने आले आहे हे त्यांना समजावून सांगता सांगता माझी अगदी पुरेवाट झाली.

घरीदारी किंवा शाळेतही नीट नांदू शकत नाहीत अशी मुलं ह्या विलक्षण 'शाळेत' आहेत. ही मुले का बिघडली असावीत, त्यांना आमच्या शाळेत येण्याची का पाळी आली असावी ह्या गोष्टींचा साहजिकच आम्हांला अभ्यास करावा लागतो आणि तो करीत असताना ह्या देशातील सामाजिक व कौटुंबिक जीवन जरा खोलात शिरुन पहाण्याची संधी मला मिळाली. बऱ्याच मुलांच्या घरातील वातावरण समाधानकारक नाही असे मला आढळून आले.

आता ही 'मेरी'च बघा. नऊदहा वर्षाची सुंदर आणि खरोखरच बुद्धीमान मुलगी. तिने आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला म्हणून तिला आमच्या शाळेत दाखल करण्यात आले. तिच्या घरातील मंडळींची चौकशी करताना मला असं समजलं की, मेरी ३।४ वर्षाची असताना तिच्या आई-वडीलांनी एकमेकांशी न पटल्याने घटस्फोट घेतला व तिच्या आईने एका परदेशी माणसाबरोबर लग्न केलं. साहजिकच ती दोघे आपल्या नव्या संसारात रमून गेली अन् मेरीकडे दुर्लक्ष झालं. मेरीलाही आपण कुणाचे आहोत? हे कळेना. जगात आपले कुणीही नाही. आपण ह्या वाईट जगातून नाहीसं झालं तर बरं! ह्या निराशेनं तिनं जीव देण्याचा प्रयत्न केला.

रॉबीन व मार्क! दोघांच्या वडिलांनी बायकांशी न पटल्याने, त्यांना आणि मुलांना सोडून दिले व दुसरे विवाह करून नवीन संसार थाटले. बिचाऱ्या आयांवर ३।४ मुलांचे पोषण करण्याची जबाबदारी आली. करणार काय? नोकरी करणे भाग आले. त्या सबंध दिवस बाहेर असतात. दिवसभर काम करून, रात्री मनोरंजनासाठी 'पब'मध्ये किंवा इतर ठिकाणी जातात. मित्रमैत्रिणींबरोबर वेळ कसा जातो कळत नाही. मग रात्री बेरात्री घरी परत येतात. बिचारी मुलं दिवसभर एकटीच घरी असतात. घरात कधी कधी खेळत असतात. कधी मारामारी करतात. टेलिव्हिजन असला तर तो बघतात. लहान मुलांनी बघू नयेत अशा गोष्टी बघतात. आता सांगा, अशा परिस्थितीत मुलं द्वाड झाली, बिघडली, तर त्यात त्यांचा काही दोष आहे का?

सुट्टीत घरी गेल्यावर स्वतःला नेहमी भाजून अगर इजा करून घेणारा 'रिचर्ड' बघितला की प्रथम विचार येतो तो त्याच्या घरचा. त्याच्या घरातील वातावरणाचा. ह्या सर्वाला आपण जबाबदार आहोत अशी 'रिचर्ड'ची समजूत झालेली आहे. आपण वाईट आहोत आणि हेच सर्वांचं कारण. म्हणून स्वतःला शिक्षा करून घेण्याचा प्रयत्न तो नेहमी करीत असतो.

एकदा त्याला विश्वासात घेऊन हळूच त्याच्याकडून घरातील माहिती काढली. त्याच्या आई-वडीलांचे एकमेकांशी मुळीच पटत नाही. आई नोकरी करते. वडील मनाला शांती मिळावी म्हणून Drugs घेतात. बऱ्याच वेळा हे जास्त प्रमाणात घेतले जाते. बिचारा रिचर्ड कधी आईशी





अनुक्रमणिका

बोलावयास गेला तर ती रागाने "तू माझा मुलगा नव्हेस. तू माझ्याशी बोलू नकोस" वगैरे बोलते. रिचर्डला त्याबद्दल वाईट वाटते. आपणच वाईट आहोत, आपल्याबद्दल कुणालाही जगात प्रेम नाही ही भावना त्याच्यात निर्माण होते व तो स्वतःला शिक्षा करून घेतो.

वरील तऱ्हेची अनेक कुटुंबे येथे आहेत. घरातील व समाजातील अस्वस्थ वातावरणात मुलं द्वाड न झाली तरच नवल. ह्या माझ्या शाळेतील मुलांना कुणाबद्दलही आदर नाही. कुणाबद्दल प्रेम नाही. जगात कुणी कुणी मित्र नाही.

निळ्या डोळ्यांचा, देखणा, बुद्धिमान अशा या सात वर्षांच्या पॉलच्या उलाढाली बघितल्या की त्याची दयाच येते. कोणतीही वस्तू दिसली की त्याने ती खिशात टाकलीच समजा. तो खोलीत आला की माझे पहिले काम त्याचे खिसे तपासणे. सुट्टीसाठी घरी जाऊन आला की तो जास्तच पिसाळल्यासारखा करतो. एकदा त्याला जवळ घेऊन विचारलं.

"पॉल! तू नेहमी काहीतरी शोधत असतोस. आणि प्रत्येक गोष्ट खिशात घालण्याचा प्रयत्न करीत असतोस. असं का? मला सांगणार ना!"

"हो! माझ्या घरी माझे वडील रोज दहा सिगरेटस् व थोडेसे पैसे "पॉकेटमनी" म्हणून देतात. ह्या सिगरेटस्, काडेपेटी– आणि पैसे मी घरी नेहमी खिशात ठेवतो. इथे आलो की मला खिशात ठेवावयास काही मिळत नाही. आणि सवयीने हात खिशात जातो" अगदी सहज, शांतपणे आणि निर्विकार मुद्रेने पॉलने उत्तर दिले.

आपण जरी बंदी केली तर हे चिरंजीव चोरून मारून सिगरेटस् ओढणारच. त्यापेक्षा त्याला स्वातंत्र्य देऊन, त्यानं स्वतः होऊन धूम्रपान बंद केले तर ते जास्त चांगलं अशी त्याच्या वडीलांची विचारसरणी. आईवडीलांच्या बरोबरीने मुलांना सिगरेटस् ओढताना बघितले की, वाईट वाटते. मुलांनाही आपल्यात आणि आईवडीलात काही अंतर आहे याची जाणीवच रहात नाही

**...विज्ञानाच्या दृष्टीने भारत मागासलेला असेल, पण मानवतेच्या दृष्टीकोनातून आपण फार फार पुढे आहोत...... या विषयात पाश्चात्य देशांना आपल्यापुढे जाण्याची संधी दिली पाहिजे......**

आणि याचे दुष्परिणाम फार फार होतात. या वागणुकीतूनच पुढे चोर गुन्हेगार निर्माण होतात.

एकदा काय झालं! थोडसं नेहमीचं Shopping करावयास गेले होते. एक लहानसा गटगुटीत मुलगा समोर दिसला. त्याच्या छातीवर एक पांढरा पट्टा होता आणि त्याला लगामासारखा दुसरा पट्टा बांधला होता. आणि त्याचे दुसरे टोक परमपूज्य मातोश्रींच्या हातात होतं. तो मुलगा इकडे तिकडे पळावयास लागल्यावर लगेच त्याची आई त्याला आवरत होती. मला लहानपणचे "चल मेरे घोडे टिक् टिक् टिक्" हे गाणं एकदम आठवलं. थोडसं हसू आलं. वरचसं वाईट वाटलं. सोयीच्या दृष्टीने हा प्रकार ठीक असला, तरी मानसशास्त्राच्या दृष्टीने विचार केला तर तो तितकासा बरोबर नाही. 'मानवी स्पर्श' हा आपल्या जीवनात फार महत्त्वाचा भाग आहे. ह्या मानवी स्पर्शातूनच, लहान मुलांना मायेची ऊब मिळते. ह्याच स्पर्शातून तरुणपणी 'प्रेमाची' जाणीव होते. आपलं कुणीतरी आहे, आपण एकटे नाही आहोत, आपल्याला कुणीतरी आधार आहे याची खात्री पटण्यास म्हातारपणीदेखील हाच मानवी स्पर्श उपयोगी पडतो. स्पर्शसान्निध्यातूनच मुलं लहानाची मोठी झाली पाहिजेत. स्वतःच्या बोटाला धरून जेव्हा आई मुलाला बरोबर नेते, तेव्हा त्याला आपली आई आपल्याबरोबर आहे याची जाणीव असते. एक प्रकारचं अमोल असं संरक्षण, प्रेम त्याला मिळत असते. असं प्रेम लहानपणी मिळालं तर त्याची देवाणघेवाण ती पुढील जीवनात सहज करू शकतात. आईच्या मांडीवर खेळणारं मूल मी अजूनतरी इथं पाहीलं नाही. मुलाचा बराचसा वेळ झोपण्यात आणि जागेपणी विविध प्रकारच्या खेळण्यांच्या सान्निध्यात जातो. आणि हे सर्व बाबागाडीत. आई अधूनमधून हॅलो–डार्लींग इ. इ. करून जाते. मी म्हटले तसा Human Touch किंवा आपण त्याला मायेची ऊब मुलाला लहानपणी मिळत नाही. मोठेपणी साहजिकच त्यालाही कुणाबद्दल आपुलकी वाटत नाही. सर्व जग हीच मुले केवळ पैसा आणि सुखसोयी या दोन डोळ्यातूनच बघत असतात.

दोन महिन्यापूर्वीचा एक प्रसंग. शाळेला सुट्टी असल्यामुळे, माझ्याबरोबरच काम करणाऱ्या एका इंग्लीश मैत्रिणीबरोबर तिच्या घरी रहावयास गेला. तिचं घर मोठे असल्यामुळे माझी सहज सोय होऊ शकली. आम्ही गेलो त्या दिवशी नेमका मैत्रिणीला 'फ्ल्यू' झाला आणि ती बिचारी आजारी पडली. तिच्या वृद्ध आईची आणि तिची देखभाल करण्याची जबाबदारी माझ्यावर आली. अशा वेळेला कुणीही केले असतं तेच मी केलं. भराभर सर्व कामे केली. थोडसं शॉपिंग करावयाचं होतं ते केलं. जेवणखाण सर्व उरकलं. २।३ दिवसांनी माझ्या मैत्रिणीचा ताप उतरल्यावर आम्ही दोघी शाळेत परत यावयास निघालो त्यावेळी माझ्या मैत्रिणीने मला पाच पौंड असलेलं एक पाकीट दिलं. मी हे पैसे कशासाठी असं विचारल्याबरोबर बाईसाहेब एकदम गरम झाल्या. मी पैसे घेण्याचे नाकारल्यावर "ही नोट परत मला दाखवू नकोस" असे बजावून मैत्रिण आपल्या खोलीत निघून गेली.

मला अगदी वाईट वाटलं. ३।४ दिवसाच्या कामाबद्दल पैसे घ्यावयाचे. कल्पनाच चमत्कारिक वाटली. परंतु जेव्हा त्यांच्या दृष्टीकोनातून विचार करू लागले तेव्हा मला हळूहळू उलगडा होऊ लागला

(पान ९० वर पहा)

मुकुंद बवाथे, लंडन 

# असे आहे आमचे 'महाराष्ट्र मंडळ'

चार मराठी लोक जगाच्या पाठीवर कोठेही एकत्र आले की त्यातून 'संघ' किंवा 'मंडळ' निर्माण झाले नाही तरच नवल. लंडनमधील मराठी समाज त्याला अपवाद नाही.

अभ्यासासाठी व धंद्यासाठी मराठी लोक लंडनमध्ये फार काळापासून आलेले आहेत. असे म्हणतात की इंग्लंडमध्ये येणारा रंगो बापूजी गुप्ते हा छत्रपतींचा वकील हाच पहिला भारतीय महाराष्ट्रीय होता.

१९३२ च्या ऑक्टोबरमध्ये साहित्यसम्राट कै. न. चिं. केळकर लंडनमध्ये गोलमेज परिषदेसाठी आले असता त्यांनी येथील मराठी जनतेला चहासाठी पाचारण केले. Knights bridge ह्या भागातील Hans Crescent Hotel मध्ये ही चहा पार्टी झाली व त्यातून महाराष्ट्र मंडळाचा जन्म झाला. ह्या मंडळाचे पहिले कार्यवाह श्री. द. वि. ताम्हनकर आज मंडळाचे आजीव सभासद असून तरुणांना लाजवेल अशा जोमाने समाजकार्य करीत आहेत.

ह्या पहिल्या सभेला हजर असलेल्या व्यक्तींमध्ये बॅ. मुकुंद-राव जयकर, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, फलटणचे राजेसाहेब, महाराष्ट्र शाकुंतलचे लेखक श्री. व सौ. गोडबोले, कोल्हापूरचे दिवाणबहादूर सुर्वे व डॉ. पारधी हे मान्यवर लोक होते.

परंतु मंडळाला मूर्त स्वरूप येण्यापूर्वीच दुसऱ्या महायुद्धाने मंडळ बंद पडले. दुर्दैवाने ह्या काळात झालेल्या कार्याची नोंद कोणा-जवळच नाही व त्यामुळे त्याबाबत काही लिहिणे अशक्यच आहे.

दुसऱ्या महायुद्धात ब्रिटनमध्ये सर्वच गोष्टी विस्कळीत झाल्या होत्या. नंतर भारताला स्वातंत्र्य मिळाले व येथे येणाऱ्या लोकांची संख्या थोड्या प्रमाणात वाढली. ह्याच सुमारास भारताचे राजदूत म्हणून कै. बाळासाहेब खेर यांची नेमणूक झाली.

मराठी लोकांना हे एक प्रकारचे आवाहनच होते आणि १९५२ च्या दिवाळीला भारत भवनाच्या समोरच्याच एका अद्ययावत हॉटेलमध्ये मंडळाचे पुनरुज्जीवन झाले. पहिल्या मंडळाचे पहिले कार्यवाह नवीन मंडळाचे पहिले अध्यक्ष झाले.

पहिल्या ह्या जेवणास सुमारे १५० लोक हजर होते. त्यात जुन्या लोकांपैकी श्री. ताम्हनकर व डॉ. पारधी हे मान्यवर पाहुणे होते. "मराठी असे आमुची मायबोली" ह्या श्री. चंद्रहास पैंगणकर ह्यांच्या गाण्याने कार्यक्रम सुरू झाला. श्री. खेरांनी आपल्या भाषणात मराठी लोकांच्या भाषेवरील व महाराष्ट्रावरील प्रेमाचे कौतुक केले.

ह्या काळात येथे असलेले मराठी लोक बहुसंख्येने २५ च्या आतील होते व येथे फार काळ राहिलेले नव्हते. त्याचप्रमाणे भारतीयांची एकूण संख्याही त्या मानाने कमी होती. एकंदरीत काळ एकोप्याने राहण्याचा होता व त्यामुळे मंडळाची भरभराट होण्यास फारसा वेळ लागला नाही.

कोणताही कार्यक्रम असो, १०० ते १५० लोक हमखास हजर. Earls Court ह्या विभागात त्याकाळी एक भारतीय विद्यार्थीभवन होते व तेच मंडळाचे निवासस्थान झाल्यासारखे होते. दर दोन महिन्यांनी काहीतरी कार्यक्रम असे आणि त्या निमित्ताने आम्ही लोक जमत असू.

५३ सालची गोष्ट आहे. काळेकुट्ट धुके– Smog–पडले होते. श्री. चिंतामणराव देशमुख लंडनला होते व त्यासाठी कार्यक्रम ठेवला होता.–दोन हातावरचे दिसत नव्हते, बसेस बंद. रस्त्यावरची रहदारी बंद. फक्त भुयारी गाड्या थोड्या चालू होत्या. स्वतः चिंतामणराव येऊ शकले नाहीत; परंतु १०० च्या वर लोक हजर राहिले आणि आनंदात वेळ गेला. ५३ सालपर्यंत आमच्यातील वयाने व मानाने मोठी अशी माणसे पदाधिकारी होती.

मंडळाची पहिली सहल Whipsned Zoo ह्या ठिकाणी नेण्याचे ठरले व त्याप्रमाणे निमंत्रणे गेली; परंतु सहलीच्या आधी दोन दिवसपर्यंत फक्त २–४ नावेच आली होती. बस ४० लोकांची ठरवलेली होती. सहल रद्द करण्याचा प्रसंग आला होता. ह्यावेळेस आम्हा तरुण मंडळींपैकी श्री. गोपाळ चिटणीस पुढे आला. दोन दिव-सात अनेक ठिकाणी फोन करून व समक्ष भेटून बसची भरती केली व सहल यशस्वी झाली. ५३ सालच्या वार्षिक निवडणुकीत कमिटीत तरुण व उत्साही लोकांची बहुमताने निवड झाली. हा पायंडा अजून चालू आहे. मंडळात जे नवजीवन आले ते तेव्हापासून !

मंडळाची वार्षिक सहल हा आता एक महत्त्वाचा कार्यक्रम झाला आहे. लंडनला नवीनच येणारे लोक सहलीला जास्त असतात.

लंडनपासून बसने २–३ तासात पोहोचू शकू अशा ठिकाणी ही सहल जाते. जरी प्रेक्षणीय स्थळ असले तरी त्याला भेट हा उद्देश मात्र सहसा नसतो.

लंडन सोडल्यावर बसमधील 'अनुभवी' लोक भेंड्याच्या कार्यक्रमास सुरवात करतात. नवीन लोक जरा जपूनच भाग घेतात. मुक्कामावर पोहोचेपर्यंत तोंडओळखी झालेल्या असतात.

मुक्कामावर पोहोचल्यावर ऐसपैस जागा बघून जेवणासाठी पंगतीची तयारी. प्रत्येक घरातून काहीतरी नवा पदार्थ आलेला

असतो च. देवाण-घेवाण होऊन जेवण होते व नंतर मुख्य कार्यक्रमास सुरवात.

लंडनला आल्यानंतर मराठी खेळ खेळावयास मिळणे दुरापास्त तेव्हा सहलीचे खरे कारण तेच! फुगडी आणि झिम्मा ते हुतुतू-पर्यंत सर्व खेळ खेळून होतात. वर्षभर व्यायाम न करणाऱ्या लोकांना दुसऱ्या दिवशी अंग कसे भरून येणार ह्याची त्यावेळेस कल्पना नसते म्हणनच सुटाच्या पँटवर हिरीरीने सगळेजण खेळत असतात.

एकदा सगळेजण दमले म्हणजे मग सुरवात होते ओळखी करून देण्याच्या कार्यक्रमास. एखादे वेळेस हाच खरा करमणुकीचा कार्यक्रम होतो. एका वर्षी एकाने ओळख करून देताना 'आत्मस्तुती' पुराण जवळ जवळ अर्धा–पाऊण तास चालविले होते. तर दुसऱ्या एकाने एका वर्षी आपण 'नोबेल प्राईझ'चा अभ्यास करण्यासाठी येथे आलो असल्याचे जाहीर केले.

सायंकाळी परतताना सर्वांनाच कंठ फुटतो. जुन्या–नव्या मराठी गाण्यांची उजळणी होते आणि इंग्रज ड्रायव्हर केव्हा एकदा बस लंडनला आणून सोडतो ह्याचा विचार करत असतो.

सहलीनंतरचा महत्त्वाचा कार्यक्रम नाटकाचा.

मराठी लोकांचे नाटकाचे वेड तर प्रख्यात आहेच. ५४ साली अशाच गप्पा चालू असताना नाटक करावयाचे ठरले. अनुभवी मंडळी कोणीच नव्हती; परंतु उत्साह मात्र दांडगा. आचार्य अत्र्यांचे 'लग्नाची बेडी' करण्याचे ठरले. संन्याशाच्या लग्नाला...... एका अनुभवी दिग्दर्शकाऐवजी दोन थोडा थोडा अनुभव असलेले दिग्दर्शक मिळाले–श्री. विश्वनाथ म्हसकर आणि डॉ. शेणोलीकर.

पुरुष पात्रे कशीबशी मिळाली. पण 'स्त्री पात्रे' काही केल्या मिळेनात. मुख्य कामासाठी–रश्मीच्या–एक बाई तयार झाल्या. व झाली तालमींना सुरवात. परंतु नाटकाच्या आधी एक महिना काही घरगुती अपरिहार्य कारणाने 'रश्मी' काम करू शकणार नसल्याची वार्ता आली. पुन्हा धावाधाव! शेवटी लंडनपासून बऱ्याच दूर राहणाऱ्या दुसऱ्या एक बाई तयार झाल्या.

इतके दिवस एका 'ब्रह्मचाऱ्याची' खोली हे तालमीचे ठिकाण होते. ६ वाजल्यापासून एकेक जण हजेरी लावत. गप्पा-गोष्टी विनोद होईपर्यंत ७ वाजत व नंतर तालीम! पण आता सर्व बदलले. बाईंना लंडनला येणे कठीण असे म्हणून एक–दोन 'पात्रे' त्यांच्याकडे जाऊन तुकड्या तुकड्याने तालीम सुरू झाली व असे करता करता रंगीत तालमीचा दिवस उगवला.

ज्याप्रमाणे दिग्दर्शक नवे त्याचप्रमाणे नट नटी व स्टेजवरील मदतगार. ज्यांनी ज्यांनी रंगीत तालीम पाहिली त्यांना हसावे का रडावे हे कळेना. पात्रे मनाला येईल तिकडून प्रवेश करत होती. eve लाईन्सना अर्थच नव्हता आणि स्टेज प्रॉपर्टीपैकी अर्ध्या अधिकाचा पत्ता नव्हता.

नाटक दोन दिवसांनी–जाहिरात झालेली. शेवटी रात्री १० वाजता सर्वजण खोलीवर परतले आणि रात्रभर बसून प्रत्येक अंकाची–नव्हे–प्रत्येक ओळीची छाननी झाली.–याद्या–नोटस् व कामाची वाटणी झाली. कामाला दांडग्या मारून सामानाची जमवा-जमव व जादा तालमी केल्या.

नाटकाचा दिवस उगवला. कामे करणारांना फुकटचे पासेस तर राहोतच पण मंडळाला तोटा येऊ नये म्हणून जास्तीत जास्त दराचे एकेक तिकीट काढावे लागले.

मध्य लंडनमधील unity थिएटरात युरोपमधील भारतीय भाषेतील पहिले तीन अंकी संगीत नाटक यशस्वीरीत्या सादर केले गेले.

मंडळाच्या नाट्यमालिकेतील १६ वे पुष्प १९७० साली सादर झाले. ५४ सालच्या नाटकात काम केलेल्या श्री. हेमंत कानिट-कर ह्यांनी लिहिलेल्या 'अनुरूपता' ह्या त्यांच्या पहिल्या नाटकाचा पहिला प्रयोग ३ ऑक्टोबर १९७० ला मंडळाने मोठ्या अभिमानाने सादर केला. मंडळाने आतापर्यंत एकूण १६ नाटके लंडनच्या रंग-मंचावर आणली ती अशी—लग्नाची बेडी, साष्टांग नमस्कार, निशीकांताची नवरी, खडाष्टक, राणीचा बाग, माझे घर, अंमलदार, वेड्याचा चौकोन, ससा आणि कासव, काका किशाचा, तुझे आहे तुजपाशी, आशिर्वाद, वेगळं व्हायचंय मला, लेकुरे उदंड जाली, प्रेमा तुझा रंग कसा? व अनुरूपता.

नाटकानंतरचा मोठा कार्यक्रम म्हणजे दिवाळी जेवणाचा. लंडनमध्ये 'ब्रह्मचारी' विद्यार्थ्यांचा जमाव बराच मोठा होता तोपर्यंत 'जेवणास' बरेच महत्त्व होते. "....हरहर महादेव"च्या घोषात पंगत बसली की एकीकडे जेवणावर हात तर दुसऱ्या बाजूने 'श्लोकांची' चढाओढ.

नाटकांच्या गंमती सांगू लागलो तर पुस्तक भरेल. तीच कथा दिवाळी जेवणाची! आमचे मराठी लोक कोठेही गेले तरी मराठीच!

म. म. पोतदार येथे आले तेव्हाची गोष्ट. जेवणाची आमंत्रणे गेली. अगोदर कळवा म्हणून लिहिले.

पन्नास-एक लोकांनी येतो म्हटले. नेहमीच्या अनुभवानुसार आम्ही १०० लोकांसाठी बासुंदी–पुरी केली. आले लोक १५० च्या वर. बसायला जागा नाही. अन्न कमी पडले. स्वतः पोतदारांनासुद्धा व्यवस्थितपणे जेवण मिळाले की नाही ही शंकाच? शेवटी काम करणाऱ्या स्वयंसेवकांना येथील खाद्य Fish & Chips–खावे लागले.

आता महाराष्ट्र कुटुंबीय लोक वाढले आहेत. म्हणून ७० सालच्या दिवाळीला जेवणाऐवजी फराळाची प्रथा सुरू केली. लाडू, शंकरपाळ्या, शेव, चिवडा इ. भरलेल्या प्लेटस् पाहून पुन्हा घरची आठवण आली. सौ. नलिनीबाई पंत ह्यांच्या अनुपस्थितीने कार्यक्रमास जास्तच मजा आली.

ह्या तीन महत्त्वाच्या कार्यक्रमांशिवाय जानेवारीत संक्रांती-पासून डिसेंबरमधील सर्वसाधारण सभेपर्यंत इतरही छोटे छोटे कार्यक्रम चालूच असतात. कोणी कलावंत येथे आला तर मंडळ





अनुक्रमणिका

कार्यक्रम करण्याच्या प्रयत्नात असतेच. लंडनमधील प्रेक्षणीय स्थळांना भेटी देण्याचे कार्यक्रमही झाले आहेत. मंडळातील सर्वात जुने सभासद कै. डॉ. पारधी ह्यांचा ८० वा वाढदिवस १५ जानेवारी ५५ ला मोठ्या थाटात साजरा झाला होता.

दरवर्षी येणाऱ्या नवीन कार्यकारिणीचे नवीन नवीन कार्यक्रम करण्याचे हिरीरीने प्रयत्न चालू असतात. परंतु प्रत्येक चांगल्या गोष्टीला दुसरी बाजू असतेच. महाराष्ट्र मंडळ ही लंडनमधील भारतीय संस्थांपैकी एक जुनी संस्था. परंतु दूरदर्शीपणाचा अभाव, क्षुल्लक गोष्टींवरून भांडणे आणि फुकटचे हेवेदावे हे आमच्या पाचवीलाच पुजले अहेत असे म्हणावेसे वाटते.

आमच्यानंतर येथे अनेक संस्था निघाल्या. चांगल्या मातवरही झाल्या. येथील अवांतर राजकीय व सामाजिक क्षेत्रात त्यांनी मान मिळवला तर काहींनी स्वतःची घरे केली; परंतु आम्ही सर्वच बाबतीत मागे. येथे टेलिव्हिजनवर आठवड्यातून एकदा होणाऱ्या कार्यक्रमात अजून आमचे नाव नाही. बी. बी. सी. चा मराठी कार्यक्रम केव्हाच बंद पडला. गेल्या वर्षी निघालेला महाराष्ट्र वृत्तपत्रिकेचा पहिला अंक लोकांच्या औदासिन्याने शेवटचा ठरला.

येथे कार्य फार मोठे आहे. लहानपणापासून येथे राहिलेल्या आपल्या मुलांना भाषेचे ज्ञान मोडकेतोडकेच असते. त्यांना शिकवण्याची मोठी जबाबदारी मंडळावर आहे.

आज अनेक वर्षे दूरदेशी राहिलेल्या लोकांना आपल्या घराशी पुस्तके–मासिके अथवा वर्तमानपत्रांच्या द्वारे संबंध ठेवण्यास आम्ही मदत केली पाहिजे.

अभ्यास, नोकरी अथवा केवळ प्रवासासाठी येणाऱ्या लोकांना अजून मित्रांवरच अवलंबून रहावे लागते. त्यांना मदत करणे हेही एक कर्तव्य आहे.

जेव्हा जेव्हा भारतावर आणि विशेषतः महाराष्ट्रावर आपत्ती आली, तेव्हा तेव्हा मंडळाने पुढाकार घेऊन जास्तीत जास्त मदत केली आहे. पण अशी मदत इतर वेळी का होऊ नये? आपल्याकडील शाळा कॉलेजमधील पुस्तकांचे दुर्भिक्ष्य आणि येथील त्याच वस्तूंची नासधूस पाहिली की ह्यांची जास्त जाणीव होते.

पुनरुज्जीवित मंडळाला आता १८ वर्षे पूर्ण झाली आहेत. येथील कायद्याप्रमाणे ते आता सज्ञान झाले आहे. मंडळाचे व पर्यायाने त्याच्याशी संबंधित असलेल्या येथील व महाराष्ट्रातील लोकांचे भले व्हावे अशी इच्छा असणारे उत्साही कार्यकर्ते येथे आहेत.

सर्व गोष्टींवर मात करून हे कार्यकर्ते, मंडळ यशस्वी करतील ह्याची मात्र खात्री आहे.

––असे आहे आमचे महाराष्ट्र मंडळ. आमच्यातील बहुसंख्य लोक येथे स्थायीक झालेले आहेत. दैनंदिन व्यवहारात इंग्रजीपणा–वेश आणि भाषा–आला आहे. बऱ्याच जणांचे विवाह इंग्रज मुलींबरोबर झालेले आहेत. परंतु सर्वांची मने महाराष्ट्रातच आहेत. अजूनही मराठी बोलल्याशिवाय चैन पडत नाही–आणि भातभाकरीची चव विसरवत नाही. मंडळ हाच आमचा एक विरंगुळा!

*

---

(पान ६६ वरून–**अनौरस पुढाकार**)

शांताबाई नि ती स्वतः ही या देशातील पहिली व शेवटची वदनशीव माणसे नव्हेत. याच समाजात उद्याची शांताबाई वाढत असेल कुठेतरी. एकतीस वर्षे उपभोग म्हणजे काय ते न समजलेली व मातृत्वाला हपापलेली सुलभाही उद्याच्या समाजाचा एक कोपरा धरून वाढणार आहे. आपल्यासारखी लग्न होऊन असहाय झालेली उदाहरणेही कमी असणार नाहीत. उद्याच्या समाजातील या स्त्रियांना आधार देण्यासाठी आजच्या या अनौरस अपत्यांचाच कदाचित उपयोग होईल. शांताबाईची पोरगी कदाचित सुलभाच्या मुलाशी लग्न करील. दामल्यांच्या मुलीची मुलगी कदाचित आपल्या अपत्याच्या वाटचास येईल. औरस जन्म घेतलेल्या समाजाला हा अनौरस समाजाचा कोपरा हवा आहे.... आपले विचार आपण सुलभाला नि शांताबाईला पटवून दिले पाहिजेत... पुढाकार घेतल्यासारखी ती प्रथम घरात शिरली. मग तिने सुलभाला व शांताबाईला आत घेतले.

बाहेर स्वच्छ ऊन पडले होते. काळवंडलेले ढग कुठच्या कुठे गडप झाले होते. ● ● ●

---

(पान ८७ वरून–**दुखावलेल्या कळ्या**)

आणि अगदी निघताना माझ्या मैत्रिणीने जेव्हा आपल्या आईला आमच्या दोघींच्या रहाण्या-जेवणाचे पैसे देऊ केले तेव्हा तर चक्क प्रकाश पडला. मायलेकी, बापलेक, अगर सासूसासरे कुणीही असोत. व्यवहार रोख. पैसे देण्यात आणि त्यापेक्षाही घेण्यात, कुणालाच कमीपणा वाटत नाही.

अशी ही येथील संस्कृती. पुरुषांना एवढ वाटत नसावं पण स्त्री-मनाला मात्र फरक फार जाणवतो. अस्वस्थ करतो. विज्ञानाच्या दृष्टीने आपला भारत मागासलेला असेल कदाचित; परंतु मानवतेच्या, आपुलकीच्या दृष्टीकोनातून आपण फार फार पुढे आहोत, श्रेष्ठ आहोत. आमच्यात अजून एकमेकांबद्दल प्रेम आहे. वृद्धांबद्दल आदर आहे. एकत्र कुटुंबपद्धती थोडीशी कमी होत असली तरी आई-वडीलांबद्दल अजून ओढा वाटतो. म्हणून मला आपलं नेहमी वाटतं आपण विज्ञानात याची बरोबरी करावी नव्हे पुढेही जावं आणि मानवता, आपुलकी, प्रेम, आदर इत्यादी बारीकसारीक विषयात ह्या राष्ट्रांना पुढे जाऊ द्यावे––

● ● ●

( लेखातील नांवे अर्थातच काल्पनिक आहेत, प्रसंग मात्र खरे आहेत. )















अनुक्रमणिका

# गोमंतकाचे नाट्य-स्वरूप-दर्शन

**. . . 'धि गोवा हिंदु असोसिएशन' या संस्थेचा सुवर्ण-महोत्सव नुकताच थाटाने साजरा झाला . . . असोसिएशनच्या विविध सामाजिक कार्यामध्ये नाट्यसेवेचाही अंतर्भाव आहे त्या निमित्ताने श्री. मणेरकर या अनुभवी सामाजिक कार्यकर्त्याने गोमंतकातील नाट्य-परंपरेचा घेतलेला हा आढावा . . .**

—सीताराम गणपती मणेरकर

गोमंतकीय समाजाने मुंबईत स्थापन केलेल्या व सर्वांगीण समाजोपयोगी कार्य करीत असलेल्या 'धि गोवा हिंदु असोसिएशन' या संस्थेचा सुवर्ण–महोत्सव नुकताच डिसेंबर १९७० मध्ये मोठ्या उत्साहाने नि थाटाने साजरा झाला. ही संस्था मुंबईत स्थापन झाली तेव्हा गोमंतकीय हिंदु समाजातील गरजवंत विद्यार्थ्यांना शिक्षणार्थ अनुदान, वाचनालय, स्त्रियांचे सांस्कृतिक समारंभ, मुलींकरिता शिवणकला वर्ग, मुलामुलींचे सांघिक खेळ, स्पर्धा, पारितोषिक–समारंभ, प्रसंगी अडलेल्या गोमंतकीयास काही द्रव्यसाहाय्य करणे इ. कार्य संस्थेपुढे होते. असे कार्य करीत संस्थेने रौप्यमहोत्सव साजरा केला.

पुढे या संस्थेने "कलाविभाग" ही शाखा निर्माण केली. गायन–वादन शिक्षणाचे वर्ग काढले, विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाचेही कार्य केले. रुग्णांकरिता तज्ज्ञ डॉक्टरांचा सल्ला, वैद्यकीय उपकरण पुरविणे असे कार्य चालविले. 'कला–विभाग' या शाखेने नाटच-कार्य स्वीकारून प्रथम महाराष्ट्र राज्य नाटचस्पर्धेत भाग घेतला व संस्थेला पहिल्या पारितोषिकाचा मान मिळाला. पुढे कला-विभागाने व्यावसायिक नाटके करण्याचे कार्य चालविले ते संस्थेला अत्यंत लाभदायी ठरले. अखिल महाराष्ट्रातच नव्हे, तर भारताची राजधानी दिल्ली नगरीपासून मद्रास नगरीपर्यंत 'धि गोवा हिंदु असोसिएशन' संस्थेच्या नाटचकृतींची वाहवा झाली. संस्थेला महान सुकीर्तीचा लाभ झाला. गौरवास्पद भरभराट झाली. 'कला–विभागाने' हे नाटचकार्य गोमंतकाच्या प्राचीन परंपरेप्रमाणे, निःस्वार्थी, निरपेक्षतेने चालविले हे संस्थेच्या महान यशाचे गमक आहे.

गोमंतकातील प्रत्येक प्रांताच्या प्रमुख ग्राम–नगरात व उपग्रामातून जी जी दैवतस्थाने आहेत, त्यांना पूर्वापार, निदान पाच शतक वर्षापूर्वीपासून 'श्री दैवत संस्थाने' असे संबोधण्याचा प्रघात चालू आहे हे पुराव्यानिशी सिद्ध आहे. उदाहरणार्थ श्री देव मंगेश–संस्थान, मंगेशी; श्री देवी शांतादुर्गा–संस्थान, धारगळ; श्री दामोदर–संस्थान, जांबावली; श्री देवी शांतादुर्गा–संस्थान, कवळे; श्री सप्तकोटेश्वर–संस्थान, नार्वे; श्री रुद्रेश्वर–संस्थान, हरवळे इ. इ.

प्राचीन व अर्वाचीन गोमंतकातील दैवत–संस्थानांची नाममालिका शतकांच्या संख्येत सांगता येईल. अशा ह्या दैवत–संस्थानांच्या अनेक कारभार विभागातील अत्यंत महत्त्वाचा, देवस्थानच्या वार्षिक उत्सव प्रसंगातील प्रमुख आवश्यकतेचा कला–विभाग म्हणजेच 'गोमंतकीय नाटच–संस्था' होत. गोमंतकीयांनी नाटच-संस्था म्हणून–आधुनिक कालातील काही अपवाद सोडून–निराळ्या निर्माण केल्या नाहीत.

दैवत–संस्थानांतील ह्या नाटच–संस्था, देवस्थानचे महाजन, ग्रामस्थ, इतर ग्रामवासी कलावान कोणताच ज्ञातिभेद न ठेवता पात्रता व शक्यतेनुसार उत्सवात सक्रीय भाग घेऊन "ती एक देव-भक्ती, देवसेवा, आद्य कर्तव्य आहे" अशा श्रद्धायुक्त सात्विक भावनेने अखंड अव्याहत चालवीत आले आहेत. आता काल–परिस्थितीनुरूप काही ठिकाणी ह्या नाटच–संस्थांमध्ये शैथिल्य आले आहे. कोठे अधिक विकासही झाला आहे.

पूर्वी हिंदुस्थानात राजे–महाराजे यांची राज्ये–'संस्थाने'–होती. प्रजेच्या सुखस्वास्थ्याकरिता संस्थानिक–राजे संस्थानात अनेक प्रकारचे कारभार-विभाग चालवीत असत. तशीच ही गोमंतकीय दैवत–"संस्थाने", त्यांची महाजन–मंडळे, तत्कालीन समाजाच्या आवश्यकतेनुरूप संस्कृत पाठशाळा, मराठी-भाषेची विद्यालये

देवालयाच्या अग्रशाळांमधून, प्राकारातून चालवीत असत. उत्सवाच्या समयी कलावंत, देवसेविका, यांची तसेच इतर ललितकलांची उणीव पडू नये; म्हणून नृत्य–गायन–वादनाचे पाठ देणारे वर्ग देव–मंदिरांच्या परिसरात गृहागृहांतून सतत चालत असत. उत्सव कार्यातील एक प्रमुख अंग म्हणजे नाटच ! रात्रीची नाटके म्हणजे तकडग्रो म कथानके व दिननाटच म्हणजे गवळण–काला, दही-काला, तसेच बदलत्या कालप्रवाहाप्रमाणे पौराणिक संगीत–गद्य–नाटके यांच्या 'झडत्या' (तालमी) त्या त्या ग्रामी सार्वजनिक जागी किंवा एखाद्या महाजनाच्या प्रशस्त गृहात वर्षातील आठ महिने चालत असताना आजही दिसतात. कारण गोमंतकात वर्षाकालातील चार महिने सोडले तर देव मंदिरातील उत्सवाची कार्ये सतत आठ महिने सारखी चालत असतात. हे उत्सव करणारी महाजन–ग्रामस्थ–मंडळे म्हणजे गोमंतकीय नाटच–संस्था आहेत हे तत्कालीन हस्तलिखितांनी व मुद्रित पुराव्यांनीही सिद्ध झालेले आहे.

हिंदुस्थानात देशी राज्ये–'संस्थाने' अस्तित्वात येण्यापूर्वी कित्येक शतक–वर्षे गोमंतकीय दैवत–संस्थाने समाजोपयुक्त अशी धार्मिक व सांस्कृतिक कार्ये करीत होती. "आपापल्या कुलदैवताची, ग्रामदैवताची ती सेवा–भक्ति आहे" अशी विशुद्ध भावना त्या उत्सवकर्त्या नाटच–संस्थांची होती व आजही असते. असे "संस्थान" हे गोमंतकीय भूषणीय ब्रीद–नाम हिंदुस्थानातील राजे–महाराजांनी आपापल्या राज्यास जोडून भूषवून घेतले असेल काय ? तसे मानण्यात काही अतिशयोक्ती आहे असे वाटत नाही. या लेखातच पुढे दिलेला गोमंतकीय नाटच–संस्थांचा इतिहास वाचून याची प्रचिती पटून येईल. अशा प्रकारे धार्मिक–संस्था, नाटच–संस्था, सामाजिक संस्था निःस्वार्थ निरपेक्ष बुद्धीने चालविण्याचे बाळकडूच गोमंतकीयांना मिळत गेले आहे.

अशा गोमंतकीय नाटच–संस्थांचा इतिहास एका लेखातून लिहून होणार नाही. तरी गोमंतकातील बारदेश प्रांताची प्रमुख नगरी महापसे (म्हापसे) येथील एका नाटच संस्थेचा–श्री देवी शांतादुर्गा, संस्थान धारगळ येथे दैवत–उत्सवातून एका घराण्यातील पुरुषांच्या नेतृत्वाखाली अडीचशे वर्षेपर्यंत अविरत अखंडित नाटच-कार्य करणाऱ्या 'श्री शांतादुर्गा प्रासादिक मंडळी'चा इतिहास या लेखातून देण्याचा प्रपंच केला आहे.

तत्पूर्वी ही भारतीय नाटचकला गोमंतक प्रांताला प्राचीन कालापासून कशी प्राप्त झाली; अखिल गोमंतकातील इतर प्रदेशापेक्षा महापसेवासीयांनाच हे नाटच–वेड विशेषत्वाने का जडले, भयंकर प्रतिकूल परिस्थितीतसुद्धा महापसेवासीयांनी चाणाक्षपणे व प्राणपणाने नाटचकलेचे संरक्षण कसे केले; महापसे नगरीचे गोमंतकातील स्थान–महात्म्य काय होते; तसेच गोमंतक प्रांताची प्राचीन माहिती इ. संबंधित इतिहास समजून घेणे इष्ट ठरेल. गोमंतक भूमि ही विविध कारणांनी प्राचीन कालापासून भरतखंडात विख्यात होती याचे पुरावे अनेक ग्रंथांतून उपलब्ध आहेत.



शांता दुर्गा – धारगळ येथील देवस्थान. १८६३ साली पोर्तुगीज प्रवाशी ऑं लॉपीश मेंदीस यानी प्रसिद्ध केलेल्या पोर्तुगीज–इंडिया या ग्रंथातून.

## गोमंतकाची विविध नावे

गोमंतक प्रांताला परशुराम–भूमी, अपरांतक, परांतक, शूर्पारक, कोंगवन, कुंकण, मध्य कोकण अशा विविध नावांनी वर्णिलेले आहे. पण त्या अतिप्राचीन काळाची साक्ष पटविणारे वास्तुविषयक किंवा सामाजिक विश्वसनीय पुरावे सध्या उपलब्ध नाहीत. तरी गोमंतक प्रांतातील पर्वत, नद्या, नगरे, ग्रामे यांची अनेक नावे संस्कृतोद्भव आहेत. उदाहरणार्थ :—

गोमंत, चंद्रेश्वर, गोमांचल प्रभृती पर्वत. गोमती (मांडवी), अघनाशिनी, (आगशी), पंचगंगा, माधवी (मार्द), अशी नद्यांची नावे; ब्रह्मपुरी (या दैवत–नगरीचा विध्वंस झाला), गोपकपट्टण (जुने गोवे), चंद्रनगर (चांदर), लत्तलपूर (लोटली), मठग्राम (मडगाव), संगम (सांगे), ऋषिवन (रिवण), नारदक्षेत्र (नार्वे), कुशस्थली (कुठ्ठाळ), पःजणि (पणजी). महापसे (महा+आपसे = म्हापसे) इ. सहस्र वर्षे पूर्वीपासून चालत आलेली ही नावे पाहून हेच त्या प्राचीन कालाचे नामरूपाने राहिलेले अवशेष का नसावेत असा विचार मनात येतो.

हा अतिप्राचीन काल सोडून ऐतिहासिक कालाकडे पाहिले तर ख्रिस्तपूर्व २५० वर्षे तो सद्यःकालापर्यंत दोन सहस्र वर्षांच्या अवधीत या गोमंतक भूमीवर शातवाहन, कदंब (वंश पहिला), राष्ट्रकूट, चालुक्य, कदंब (वंश दुसरा), यादव (देवगिरी), विजयनगर–साम्राज्य, बहामनीशाही (इस्लाम), आदिलशाही (इस्लाम), पोर्तुगीज व विद्यमान भारत राष्ट्र अशा अकरा राजवटी झाल्या.









यातील शातवाहन राजवटीपासून विजयनगर–साम्राज्या-पर्यंतच्या सात राजवटी हिंदु–संस्कृतीच्या अभिमानी होत्या. गोमंतक भूमीवर आपली शासन–सत्ता असावी या मानी हेतूकरिता अथवा काही राजकारणी शत्रुत्वामुळे लढाया होऊन त्या बदलत असत; परंतु त्या सातही राजवटींच्या कालखंडात ख्रिस्ताब्द १४७० पर्यंत गोमंतकीय हिंदु जनतेचे आचार, रूढी, धार्मिक उत्सव आणि त्या उत्सव कार्यातच नाट्यकलेची विविधांगी बीजे असलेली ती परंपरा निर्विघ्नपणे चालली होती.

पण बहामनी बादशाही व आदिलशाही या अनुक्रमे आठव्या व नवव्या इस्लामी शासनसत्तांनी गोमंतकीय हिंदु जनतेला भयंकर असहनीय दुःख दिले. सहस्रावधी हिंदु जनतेची सुंता झाली. ब्रह्मपुरीच्या पवित्र स्थानाचा विध्वंस झाला. गोपकपट्टणसारख्या समृद्ध, वैभवसंपन्न राजधानीतील हिंदु मंदिराच्या मशिदी बनविल्या गेल्या. इस्लामी राजशासकांनी गोपकपट्टण नगराचे अनाचार; अत्याचाराचे आगर बनविले. हिंदु जनतेला भोगावे लागणारे हे असह्य दुःख पाहवेनासे होऊन अमराजी नाईक आणि तिमोजा नाईक या, पदरी नौकादल असलेल्या तत्कालीन दोन बलाढ्य हिंदु सरदारांनी हिंदु जनतेचे दुःख निवारण करण्याकरिता, हिंदु संस्कृतीच्या संरक्षणाकरिता, कुयोगाने चौदाव्या शतकाच्या शेवटी पोटार्थाकरिता आलेल्या पांढ्या पायांच्या पोर्तुगीजांचे नौका-दल साहाय्यास घेऊन इस्लामी पारतंत्र्य झुगारून देण्याचा अयशस्वी प्रयत्न केला ! आणि त्यामुळेच गोमंतक भूमीच्या मानेवर पोर्तुगीज सैतानाची क्रूर पाशवी पारतंत्र्याची दहावी राजवट बसली !

इ. स. १५१० मध्ये पोर्तुगीजांनी गोमंतक भूमीवर आपले पाय रोवले. आपली राजसत्ता स्थिर करण्याकरिता कपटी शांततेने तीस-पस्तीस वर्षांचा काळ घालविला आणि त्यानंतर हिंदु जनतेच्या छळाला प्रारंभ केला. पोर्तुगीज राजाकडून हिंदु जनतेला ख्रिश्चन धर्मी बनविण्याचा अधिकार घेऊन 'धर्मसमीक्षण मंडळ' (इंक्विजीसांव) या नावाचे एक मिशन पोर्तुगालहून आले. त्यांचा म्होरक्या फादर सेंट (?) फरान्सिस झेवियर हा होता ! हिंदु जनतेला ख्रिश्चन बनविण्याकरिता त्या मिशनने जे अनन्वित अत्याचार, अनाचार केले त्या दुष्ट आणि किळसवाण्या कृतीशी जगाच्या इतिहासात होऊन गेलेली कोणतीही क्रूर कर्मे तुलनेला पुरणार नाहीत ! इतका अकल्पनीय निर्दय छळ पोर्तुगीजांनी केला. हा भीषण भयंकर दुर्धर प्रसंग केवळ पोर्तुगीज-शासित सासष्टी, तीसवाडी व बारदेश या तीनच प्रांतांवर कोसळला होता. या तीन प्रांतांतील मिळून चारशे हिंदु देवमंदिरांचा त्यांनी विध्वंस केला. हिंदूंच्या घरातील देवपूजेच्या लहानशा घंटेचा आवाज, प्रेतदहन–विधी इ. अनेक गोष्टींवर बंदी घालण्यात आली. इतकेच नव्हे तर विवाहासारखे सात्त्विक मंगल विधीही 'पोर्तुगीज' गोमंतक–भूमीवर न करता वधुवर, पुरोहित व वधुवर-मातापिता यांनी नदीत होड्यांवर जाऊन करावेत असले पिसाट कायदेही केले होते. अशा प्रकारचा धर्मछळाचा वरवंटा सासष्टी व तीसवाडी प्रांतावर फिरवून इ. स. १५५२ या वर्षी मिशनने बारदेश प्रांताकडे आपली दृष्टी वळविली. आणि येथील हिंदु जनतेच्या धर्मछळास आरंभ झाला. त्यावेळी महापसेवासीयांनी आपली ग्रामदेवता श्री देवी शांतादुर्गा हिची मूर्ति (इ. स. १५५४), शेजारच्या सावंतवाडीकर भोसले या हिंदु राज्याच्या सत्तरी प्रांतातील साखळी ग्रामी नेली व देवस्थानचे पावित्र्यरक्षण केले.

### खलप घराण्याने सांभाळलेली परंपरा

गोमंतकातील अकरा प्रांतांपैकी पूर्व–दक्षिण दिशेकडील फोंडे, सांगे, केपे, अग्रहार व काणकोण हे पंचमहाल (प्रांत) राजे सौंधेकर, संस्थान बांदिवडे या हिंदु राजाच्या अधिकारात होते आणि उत्तर–पश्चिम दिशेचे भतग्राम, पेडणे, सत्तरी हे तीन प्रांत सावंतवाडीकर भोसले या हिंदु राजाच्या अधिपत्याखाली होते. या आठ प्रांतांवरील अधिकारी–देसाई, सरदेसाई, देशप्रभु, देशपांडे हे सर्व हिंदु धर्मीय होते. केवळ परिस्थितीमुळे आदिलशहाचे किंवा पोर्तुगीजांचे वर्चस्व ते मानीत असत. यामुळे त्या आठही प्रांतांतील देवस्थाने, वार्षिक उत्सव, इ. ललित कार्याची परंपरा सुरळित चालत होती. हिंदुधर्मीयांचा छळ; हिंदु संस्कृतीचा विशेष नाश झाला तो उर्वरित तीन प्रांतातच ! अशा अस्थिर परिस्थितीतही एक कर्तृत्ववान घराणे उदयास आले !

गोपकपट्टण (जुने गोवे) येथे कदंबवंशीय त्रिभुवन मल्ल राजाचे, "कालप भृत्य" या पदवीने भूषित झालेले मंत्री होते. तेच या 'खलप' घराण्याचे मूळ पुरुष होत. गोपकपट्टणच्या परिसरातील ब्रह्मपुरी या अनेक दैवतस्थानांनी गजबजलेल्या नगरीचे ते अधिकारी होते. या ब्रह्मपुरीचा इस्लामी राजवटीने विध्वंस केला. पोर्तुगीज राजवटीने गोपकपट्टण ही महान नगरी ओसाड केली. त्याकाळी पःजणि (पणजी) येथे गोमती (मांडवी) नदीच्या किनारी कदंबांच्या राज्य-अधिकाऱ्याचा वाडा होता. तोच पुढे आदिलशाही सुभेदारांनी आपला राजवाडा (पालासिय दे इदाल्कांव) बनविला. पुढे पोर्तुगीज राजवटीत त्याचीच पोर्तुगीज गव्हर्नरांची पॅलेस झाली. सद्यःकाळी याच ठिकाणी गोवा राज्य शासनाची सचिवालयाची इमारत आहे. तेथून पन्नास हातावर गोवा शासनाने प्रवाशांकरिता बांधलेली जी टूरिस्ट हॉटेलची इमारत आहे; तेथेच कदंब–राजमान्य खलपांचा वाडा इ. स. १८९८ पर्यंत उत्तम स्थितीत होता. पुढे आकस्मिक कारणाने किंवा पोर्तुगीज कारवाईमुळे तो अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडला असे तत्कालिन जाणकार सांगत असत, परंतु खलप घराण्यातील पुरुषांना पणजीत राहावयाचे नव्हते. त्यांचा राजकारणी संबंध सुटल्यामुळे त्यांनी उद्योगपती होण्याचा विचार ठरविला. त्याकाळी गोमंतक प्रांताची मुख्य उद्योगनगरी असलेली महापसे येथे दोन चौसोपी मोठी प्रांगणे असलेला विशाल वाडा बांधून त्या ठिकाणी ते स्थायिक झाले.

खलप घराण्यातील कर्त्या पुरुषांनी परिश्रमपूर्वक पोर्तुगीज भाषा आत्मसात केली; पोर्तुगीज सत्ताधीशांकडे आपले



अनुक्रमणिका

व्यक्तिमत्व प्रस्थापित केले. मोठ्या चतुराईने व मुत्सद्दीपणाने आपल्या घराण्याला हिंदु धर्मछळकांची किंचित झळ लागू न देता अखिल जगात ज्या ज्या ठिकाणी पोर्तुगीज राष्ट्राच्या वसाहती आहेत तेथे आपली व्यापारी जहाजे पाठवून प्रचंड उद्योग-कार्यास प्रारंभ केला. पोर्तुगाल (युरोप), ब्राझिल (अमेरिका), लोरेंस मार्क, मोसांबिक (आफिरका), दीव–दमण, माकाव (आशिया) आणि पॅसिफीक महासागरातील तिमोर असा पंचखंडात व्यवहार करून महान उद्योगपती तसेच धनपती बनले.

हिंदुधर्मछळक पोर्तुगीज मिशनच्या धाकाने घाई घाई करून श्री देवी शांतादुर्गा हिची मूर्ती महापसेपासून दहा कोस दूर सांखळी ग्रामी नेलेली होती; पण भजणूक, नवस, वार्षिक उत्सव, शिमगोत्सवातील नाट्यपरंपरा इ. विहित कार्ये करण्यास महापसेवासियांना ते स्थान दूर पडू लागले. त्या कारणाने त्याच सावंतवाडीकर राज्याच्या पेडणे प्रांतातील; महापसे नगरीपासून अवघ्या अडीच कोसांवर असलेल्या धारगळ ग्रामी इ. स. १५७४ या वर्षी धारगळकर मरदेसाई यांच्याकडून 'कटुवाण' पद्धतीने (कायमची) देवमंदिराकरिता जमीन संपादिली व एका डोंगर उताराच्या खिंडीत घनदाट झाडीत लहानसे मंदिर बांधून श्री देवी शांतादुर्गा संस्थानची स्थापना केली.

महापसे येथे स्थायिक झालेले उद्योगपती श्रीमंत खलप इ. स. १५८७ मध्ये महापसे ग्रामसंस्थेचे सदस्य व ग्रामस्थ झाले. तसेच त्यांनी विशेष द्रव्य-देणगीने 'कुलाचारी' हे महापसे ग्रामसंस्थेचे अधिक हक्कांचे सन्मानपदही मिळविले. महापसे ग्रामसंस्थेचे ग्रामस्थ-सदस्य झाल्यामुळे साहजिकच नियमानुसार खलपांनी महापसे नगरीची स्वामिनी श्री देवी शांतादुर्गा हिला आपली कुलदेवी मानली व तिचे प्रमुख महाजन-भक्त बनले. 'इ. स. १६४८ या वर्षी (खलपानी श्री शांता दुर्गा कुलदेवी) देव जोडला असा उल्लेख 'खलप घराण्याचा इतिहास' या पुस्तकात आहे. अखिल ज्ञात जगात व्यापारी जहाजे पाठवून उद्योग-व्यवहार करणारे खलप घराणे त्या काळी हिंदुस्थान देशात एकमेव होते असे मानण्यात अतिशयोक्ती नाही! दोनशे वर्षांवर असा उद्योग-व्यवहार करणारे, सबंध गोमंतक प्रांताला त्या काळी जीवनावश्यक वस्तू पुरविणाऱ्या महापसे उद्योगनगरीत राहणारे श्रीमंत खलप श्री देवी शांतादुर्गा हिचे महाजन झाले. त्याचबरोबर त्यांनी श्री संस्थान धारगळ येथे श्री शांतादुर्गा देवीचे वैशिष्ट्यपूर्ण गोमंतकीय बांधणीचे मोठे मंदिर तसेच उपदैवते श्री रवळनाथ व श्री दंडपाणी यांची दोन अशी तीन मंदिरे बांधली. इ.स. १७९३ मध्ये या मंदिर बांधणीच्या कार्यास प्रारंभ होऊन इ. स. १७९७ मध्ये ही उर्जितावस्था पूर्ण झाली.

पुढे एकच वर्षानंतर म्हणजे इ. स. १७९८ मध्ये श्री देवस्थानच्या सुव्यवस्थेकरिता, द्रव्यनिधी जमविण्याकरिता 'दहा जणांचे मंडळ' या नावाने एक संस्था निर्माण झाली. त्या मंडळाचे अध्यक्ष खलप घराण्यातील पुरुषच असावेत असा नियम ठरविण्यात आला. 'श्री

## —वाचकांच्या निवड-स्पर्धेचा निकाल—

'दीपावली'च्या दिवाळी अंकातील उत्कृष्ट साहित्याची वाचकांनीच निवड करावी यासाठी वाचकांकरिता प्रवेश–फी-रहित अशी खास स्पर्धा जाहीर केली होती. या स्पर्धेत दिवाळी अंकातील कूपन भरून पाठवून ११९ वाचकांनी भाग घेतला. वाचकांनी बहुमताने केलेली निवड खालीलप्रमाणे आहे :–

सर्वोत्कृष्ट कथा

**'दुर्गी'–श्री. सुरेश वेंगुर्लेकर** (३० मते)

सर्वोत्कृष्ट लेख :

**'शृंगारातील ऋतुचक्र'–श्री. आनंद साधले** (४० मते)

सर्वोत्कृष्ट कविता

**'काचेच्या पेल्यासारखे'–रमेश तेंडूलकर** (२२ मते)

सर्वोत्कृष्ट रंगीन कलाकृती

**'मालती माधव'–श्री. दीनानाथ दलाल** (३२ मते)

सर्वोत्कृष्ट व्यंगचित्र :

**'आकाशवाणी'–श्री. अशोक डोंगरे** (१३ मते)

वाचकांनीच बहुमताने ठरविलेल्या वरील निर्णयाप्रमाणे एकही प्रवेशपत्रिका बिनचूक ठरलेली नाही. त्यामुळे पहिले बक्षीस कुणालाही मिळालेले नाही. एक चूक असणारे सहा वाचक असून त्यासाठी ठेवलेले रु. ७५ चे बक्षीस त्यांना सम-प्रमाणात विभागून देण्यात येत आहे. अकरा वाचक दोन चुकांच्या तिसऱ्या म्हणजे रु. ५० च्या बक्षिसाला पात्र ठरले असून त्यांनाही ते सम–प्रमाणात विभागणी करून देण्यात येत आहे.

या उपक्रमात वाचकांनी केलेल्या सहकार्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

एक चूक असलेल्यांची नावे (बक्षीस प्रत्येकी रु. १२.५०) सौ. स्मिता वि. निजसुरे (दादर), सौ. लता के. एस. धुरंधर (मुंबई), सौ. सुषमा दिनकर देशपांडे (हैदराबाद), रमाकांत बा. पाटील (अंधेरी), विद्याधर भगवान तळेले (भुसावळ), आणि सौ. सुषमा सुभाष सहगल (नवी दिल्ली).

दोन चुका असलेल्या वाचकांची नावे (बक्षीस प्रत्येकी रु. ४.५५) : पद्माकर दामोदर मुंगळे (दादर), आ. कृ. करमळकर (दादर), सौ. सुशीला भाऊ लोळे (नायगाव), सौ. नंदिनी डोणीमठ (हुबळी), सौ. सुधा एरंडे (दादर), शशिकांत वसंत शिंदे (कल्याण), एस. डी. वाघमारे (औसा), गिरीश जयवंत दळवी (दादर), प्रदीप चंद्रकांत कोर्तीकर (गिरगाव), कांचन पंढरी नायक (पेडगाव) आणि बंडू शंकर घोडेकर (अहमदनगर).

**वरील सर्व वाचकांचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. त्यांच्या बक्षिसाची रक्कम फेब्रुवारी महिन्यात मनीऑर्डरीने रवाना करण्यात येईल. —संपादक**

अनुक्रमणिका






शांतादुर्गा प्रासादिक मंडळी' या 'दहा-जण-मंडळ' कार्यकर्त्यातूनच निर्माण झालेली नाट्यसंस्था होय.

नंतर श्री संस्थान धारगळला भव्य स्वरूप येऊ लागले. जनसमूह वाढू लागला. म्हणून देवमंदिरांच्या प्राकाराबाहेरील डोंगर उतरणीवर अत्यंत परिश्रम घेऊन तत्कालीन गवंडी-कारागीरांनी जमीन सपाट केली. दहा सहस्र जनतेला उत्सव-कार्यात सहज रममाण होता येईल असा विस्तीर्ण प्राकार सोडून चारही बाजूंस शेकडो दगडी कमानींच्या विशाल अग्रशाळा बांधण्यात आल्या. गोमंतक-यात्रेसाठी येणाऱ्या प्रवाशांनी अवश्य पहाण्यासारखी ही श्री देवी शांतादुर्गा, संस्थान धारगळ, येथील विशाल अग्रशाळांची एकमेवाद्वितीय महान वास्तू आहे. इ. स. १८१२ ते १८१५ पर्यंत तीन वर्षे हे अग्रशाळा-बांधणीचे कार्य चालले होते. नंतर इ. स. १८५४ मध्ये वार्षिक जत्रोत्सव (काला), शिमगोत्सवातील नाट्य-सप्ताहादि उत्सव साजरे करण्याकरिता, चार सहस्रांच्या जनसमुदायाला सुखेनैव बसून नाटके पाहता येईल असा व मोठ्या वर्तुळाकार दगडी स्तंभावर तिन्ही बाजूंनी प्रेक्षकांकरिता सज्जा (गॅलरी) असलेला भव्य व प्रचंड मंडप श्री शांतादुर्गा देवीच्या मंदिरासमोर श्रीमान् खलप महाजनांनी बांधला. तोपर्यंत महापसे येथे श्री शांतादुर्गा देवीच्या आद्यस्थानी 'दहा जणांच्या चौकी'वर होणारे उत्सव, तकडधोऽम कथानक-नाटके श्री संस्थान धारगळ येथे मंडपात होऊ लागली.

**धार्मिक हिंदू 'कार्निव्हाल'**

सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात इ. स. १५५२ पासून पोर्तुगीजांच्या हिंदुधर्मविध्वंसक मिशनने बारदेश प्रांतात हिंदु लोकांची 'त्राहि भगवान्' अशी दुर्दशा करून सोडली होती. हिंदु धर्मीयांचे आचार, संस्कार, उत्सव करण्याची केवळ बंदीच नव्हे, तर हिंदुधर्मीय संस्कार प्रकटपणे आचरणाऱ्यास क्रूर शासन मिळत होते. अशा बिकट परिस्थितीत श्री देवी शांतादुर्गा हिचा वार्षिक शिमगोत्सव, ती दैवत-सेवा, धारगळ येथील मंडप बांधला जाईपर्यंत प्रदीर्घ अशा अडीचशे वर्षांहून अधिक कालखंडात 'रोमटे', तकडधोऽम युद्ध-नाटचे अशा स्वरूपात पण 'इंत्रुज' किंवा 'कार्निव्हाल' अशा फसव्या नावाखाली श्री देवीच्या आद्यस्थानी 'दहा जणांच्या चौकीवर' महापसेवासीयांनी ती नाट्यपरंपरा अखंड चालविली होती.

पूर्वीपासून महापसेवासी उत्सवात जे नाट्यकार्य करीत आले आहेत, त्यामागे आपल्या आराध्य-ग्रामदैवताची कीर्तन-नर्तन-गायन व नाट्य-रूपाने आपण सेवा करीत आहोत अशी विशुद्ध श्रद्धेची भावना होती व सद्यःकालीही आहे. त्यामुळे नाट्य-सेवा-भक्तीत कोणत्याच कारणांनी खंड पडू देऊ नये असा कटाक्ष राखला जाई. सोहेर, सुतक, लहानसा आजार, ताप ही कारणे तर क्षुद्रच मानली जात. महापसे येथे एका उत्सव-प्रसंगी तकडधोऽम युद्ध-नाट्यात भूमिका करणाऱ्या 'डांगी' या उपनावाच्या गृहस्थाचे वडील प्रयोगापूर्वी थोडा वेळ रात्री नऊ वाजता वारले! तरी सर्व कुटुंबाने संयम करून सबंध रात्र मयताचे शव घरात ठेवले. त्या गृहस्थाने त्या युद्ध-नाट्यातील भूमिका पार पाडली; पण उत्सवात खंड पडू दिला नाही! प्रयोग संपल्यानंतर दुसऱ्या दिवशी सकाळी सर्व समाज, आप्तजन जमले व अंत्यविधी-संस्कार करण्यात आला!!

एका शिमगोत्सव प्रसंगी मुख्य स्त्री-भूमिका करणाऱ्या 'मणेरकर' उपनावाच्या तरुणाच्या मातोश्रीने नाट्य-प्रयोगाच्याच दिवशी इहलोक-यात्रा संपविली. दहनविधी-संस्कार, त्याच्या कुटुंबाची स्थिरस्थावरता होईपर्यंत संध्याकाळचे सहा वाजले. नंतर आप्तजन, समाजधुरीण इ. जमून सांत्वनाची तसेच उत्सवासंबंधीच्या कर्तव्य-पालनाची जाणीव देणारी भाषणे झाली. जमलेला सर्व जनसमूह भूमिका करणाऱ्या त्या तरुणासह महापसेहून धारगळीस गेला. नाट्य-प्रयोग-परंपरेचे, अखंडतेचे व्रतपालन झाले!

सभामंडप बांधून झाल्यानंतर शिमगोत्सवाची नाटके जरी धारगळ येथे होऊ लागली, तरी धारगळ येथे शिमगोत्सव प्रत्यक्ष सुरू होण्यापूर्वी; श्री शांतादुर्गा प्रासादिक मंडळीतील भंडारी समाज; फाल्गुन पौर्णिमेपासून पुढे एक सप्ताह 'रोमटे' या नावाने तकडधोऽम युद्ध-नाटके करीत असे. श्री देवी शांतादुर्गा हिच्या आद्यस्थानी राज-मार्गावर सतत सात दिवस रात्रौ नऊ ते बारा वाजेपर्यंत ते प्रचंड 'फिरते युद्ध-नाट्य' सहस्रावधी जनांच्या उपस्थितीत चालत असे. त्याची स्मृती म्हणून आजही एक दिवस तरी ते रोमट–युद्ध-नाट्य-प्रयोग–करून ती नाट्य-परंपरा चालू ठेविली जाते.

त्यानंतर संगीत नाटके करण्याचा काळ उदयास आला. तेव्हाही एका फिरत्या 'रथा'वर (गाड्यावर) रंगमंच, पडदे, विंगा असे नेपथ्य उभारून युद्ध-नाट्याबरोबरच फिरती संगीत नाटके करण्याचा उपक्रम महापसेवासीयांनी केलेला होता.

**'दीपावली' दिवाळी अंकातील बहुरंगी चित्रसेट**

| | | |
|---|---|---|
| १९५८ | ७ चित्रे | ३–०० |
| १९६० | १० ,, | ३–५० |
| १९६१ | १० ,, | ३–५० |
| १९६२ | ८ ,, | ३–०० |
| १९६३ | ६ ,, | ३–०० |
| १९६४ | ६ ,, | ३–०० |
| १९६५ | ४ ,, | ३–०० |
| १९६६ | ४ ,, | ३–०० |
| १९६७ | ४ ,, | ३–०० |
| १९६८ | ४ ,, | ३–०० |
| १९६९ | ४ ,, | ३–०० |
| १९७० | ४ ,, | ३–०० |

अधिक रजिस्टर पोस्टेज — प्रत्येक सेटकरता २–००.

हिंदु संस्कृतीचा लहानसा संस्कार वा उत्सव करुन देणाऱ्या हिंदु-धर्मद्वेष्टया पोर्तुगीजांच्या राजवटीत ही युद्ध-नाटके, फिरती संगीत नाटके इ. नाट्य-कार्य महापसेवासीयांनी कसे केले असेल हा प्रश्न उद्‌भवतो. त्यावेळी 'गुड-फरायडे' आटोपून 'दुःखाचे' दिवस संपल्या-नंतर प्रभू येशूच्या पुनरुत्थानाच्या आनंदाप्रीत्यर्थ गोमंतकातील कॅथॉलिक ख्रिश्चन समाज 'कार्नवाल', 'इंत्रुज' या नावाने तीन दिवस आनंदोत्सव करीत असत. चित्रविचित्र वेष करुन, तोंडाला मुखवटे घालून नाचरंगाचा हैदोस घालीत असत. तीच संधी साधून आम्ही हिंदुसुद्धा त्याच आनंदाप्रीत्यर्थ सात दिवस " हिंदु कार्नवाल-इंत्रुज," करतो अशा चपखल युक्तीने पोर्तुगीज शासकांची अनुज्ञा मिळवून प्राणपणाच्या जिद्दीने महापसेवासीयांनी ही नाट्यपरंपरा राखली !

महापसे व धारगळ येथे एका वर्षातील आठ महिन्यात मिळून उत्सवकार्यात एकोणीस नाटके आणि दोन दिन-नाट्ये असे एकवीस प्रयोग होत असत, श्रमविभागाच्या तत्त्वास अनुसरून श्री शांतादुर्गा प्रासादिक मंडळी आणि श्री महारुद्र प्रासादिक मंडळी ह्या दोन संस्थांनी हे नाट्यतप चालविले होते.

असा हा महापसेवासीयांचा नाट्य-तपाचा प्रचंड महायज्ञ चालण्याकरिता, तकडधोऽम-नाट्य कालापासून सद्यःकालापर्यंत, वेषभूषा पुरवणारी, तयार करणारी कलावान कुटुंबे, तकडधोऽम नाटकाला नेपथ्य लागत नव्हते, तरी दैवी चमत्कारांची दृश्ये दाख-विणारे कारागीर कलावान, त्याच संस्थांचे सदस्य होते. महाराष्ट्र प्रांतात, संस्थानिकांच्या राज्यात सुप्रसिद्धी पावलेले तवला, पेटी (हार्मोनियम) वादनकार, नृत्यशिक्षक अशा गोमंतकीय कला-तपस्वीयांचा आणि महापसेवासी नाट्य-संस्थांचा संबंध पूर्वापार अखंड जुळलेला होता.

शिवाय रंगकला विशारद नेपथ्यकार (पेंटर) वेषभूषाकार (मेकपमन) तत्कालीन प्राप्त-दीपद्वारे नाट्याला दिव्य सौंदर्य आणणारे प्रकाश योजनाकार इ. विविधांगी नाट्यकार्याला लागणारे नाट्य-तंत्रज्ञ पुरुषोत्तम त्याच नाट्य-संस्थांमधून निर्माण झाले होते. संगीत किंवा गद्य नाटकात प्रभावी पुरुष, स्त्रियांच्या भूमिका करण्यास नटांची केव्हाच उणीव पडली नाही. उलट प्रत्येक घरातील पुरुषांना, लहान मुलांनाही दैवत भक्तीचा नाट्यसेवेतून लाभ मिळावा म्हणून, पौराणिक नाटकात देव-सभांमध्ये परी-अप्सरांच्या थव्यांचे नृत्य, ऐतिहासिक नाटकातून मराठे-मुसलमान-सैनिकांची पथके कथा-नकाला अनुसरून नवीन नाट्यप्रवेश निर्माण करीत असत. एकच नाटक दोन दिवस, तीन दिवस निरनिराळ्या नटसंचाकडून करवून नाट्यकलेला उत्कर्षकारक अशा स्पृहणीय नाट्य-स्पर्धा चालवीत असत. प्रत्येक नटव्यक्ती आपल्या वेषभूषेचा द्रव्य-खर्च अमाप उत्साहाने स्वतःच करीत होती. इतकेच नव्हे तर नाटकात 'सोंग' (भूमिका) घेणे हा एक जीवनातील देव-भक्ती-कर्तव्याचा भाग महापसेवासीयांनी मानिल्यामुळे, प्रत्येक मुलाला 'खर्डा' (भाषणाची नक्कल) पाठ करता आला पाहिजे या दृष्टीकोनातून बोध करीत मुलांचेकडील जाणती मंडळी मराठी शिक्षण घेण्यास विद्यालयात पाठवीत होती.

असा ह्या नाट्य-तप-कार्य-महायज्ञाचा इतिहास स्वतंत्र लेखांनी लिहिला पाहिजे, इतका प्रदीर्घ असा तो कालखंड आहे. याव्यतिरिक्त त्या संस्था केवळ नाट्यकार्य-धर्मच पाळीत नव्हत्या तर आपण सर्व एक कुटुंब आहोत असे समजून--

एकमेकांच्या सुखदुःखात समरस होणे असा आप्तधर्म--

प्रसंग समयी साहाय्यार्थ धावत येणे असा शेजारधर्म--

कोणत्याही सामाजिक कार्यात संघटनेने कार्यरत होणे असा ऐक्यधर्म--

एकमेकांची दृष्टीभेट झाल्याबरोबर हास्यमुखाने बोलणे असा प्रेमधर्म--

आणि श्रद्धा भक्ती-युक्त निष्ठेने उत्सवात भाग घेणे असा हिंदु धर्म--

असे शुद्ध सात्विक भावनेचे धर्म त्या संस्थांमध्ये अविरत जागृत होते. हेच गोमंतकीय-नाट्यसंस्थांचे नाट्य-तप होते.

• • •



# श्री फ ल











आठवतं मला
घातलं होतं पदरात माझ्या
घरातून निघताना
एक श्रीफल
अन् मीही आनंदाने अभिमानाने
ते ओझे पत्करून
वाकून, नमस्कार करून,
दिलं होतं आश्वासन
तुम्हाला पण आठवतं ना
असंच घडलेलं
ते श्रीफल पदरात घेतलेलं
दर्यापार येताना ?
ते होतं प्रतीक,
कणखर व्यक्तिमत्वाचं
मधुनिर्भर आंतरिक माधुर्याचं
'संभाळा आता' म्हटलं देणारांनी
'होय, अवश्य' मूक प्रत्युत्तरे आमुची
पण संभाळायचं
म्हणजे काय करायचं
अभक्ष्य भक्षण, मदीरापान
परस्त्री ? सर्व कल्पना जुनाट
आता हे वारे काही ओवळे नाहीत
बोचरे नाहीत, प्रखर नाहीत
आमची संस्कृतीज्योत मालवायला
हातीच्या बांगड्या, कपाळीचे कुंकू
आंगभर लपेटलेली साडी
की नवऱ्यामागे, चार पावले चालून
उष्ट्या ताटात जेवून
संबोधनाचा वापर टाळून
करायचं आम्ही संस्कृतिरक्षण ?
की जगदंबेची मूर्ति कोपऱ्यात मांडून
मंगल ज्योतींनी पत्री फुलांनी
अर्चून प्रार्थून
मुहूर्त, पत्रिका, उपास-तापास
व्रतवैकल्याची बंधने स्वीकारून
करायचं आम्ही संस्कृति प्रदर्शन ?
पहा जरा विचार करून
हृयातलं काही एक न करता
आम्हाला आमचा नंदादीप
येतो उजळता
आम्ही सनातन संस्कृतीचे वारस
अनेक आघातांनी, प्रत्याघातांनी
हरलो नाही, पराभूत झालो नाही
प्रत्येक नवा आघात
कायाकल्पक ठरला
अनेक तत्त्वे एका
चिरंतन तत्त्वात मिसळली.
घर्षणा घर्षणात जळमटे जळाली
मृत रूढींची
संपले यज्ञयाग, संपले बलीप्रदान
मिटले शैव-वैष्णवांचे वाद.
बालविवाह, स्पृश्यास्पृश्यता
आंधळे विश्वास, जाचक रूढी
कळकट विचारांची अवगुंठनं
जळून पडली केव्हांच
म्हणून ही ज्योती
चिरंतन तेवली.
हिला सापडला, स्निग्धतेचा आधार
सर्वांभूति परमेश्वर पहाणारा
अनेक भाषा, अनेक धर्म
अनेक कला, अनेक व्यक्ती
एका छत्राखाली हिच्या नांदल्या!
पोसल्या, जोपासल्या, शत्रुत्व विसरल्या
भारतवासी आम्ही, एका महान संस्कृतीचे वारस
उगमापासून अनेक ओघ प्राशीत
आजचे हृदयंगम रूप पावलो
सिंधूकाठच्या हिंदोस्तांचे
हिंदू आम्ही—कृष्णा कावेरीला ओलांडून
कन्याकुमारीला पोचेपर्यंत
झालो हिंदी—भारती
मूळच्या चिमुकल्या ओघाचा अभिमान
बाळगूनही, मानतो संगमाचे जलप्रादान
गर्वाने फोफावत, वार्ता—आवर्तातून
जाताना प्राणपणाने गर्जून सांगतो
कुंभात भरा नाहीतर कलशात भरा
मांगल्य [अन् पावित्र्य ह्या जलाचे
बदलणार नाही
कणखर व्यक्तीत्वाच्या कवचाने
आतले मधुनिर्भर जल
अन् शुभ्रमुलायम तत्त्व
असंच जपू असंच जोपासू
अन् दिलेलं आश्वासन पूर्ण करू

—आशा दामले,
लंडन.



अनुक्रमणिका

# वा... काय चमक आहे!...
# ह्या सर्वोत्तम शुभ्रतेचे कारण टिनोपाल



प्रत्यक्ष खात्री करून घ्या. कपडे धुवून झाल्यावर शेवटी पाण्यातून काढताना थोडेसे टिनोपाल घाला आणि पहा ते कसे अगदी स्वच्छ निघतात ते! याला म्हणतात टिनोपालचा शुभ्रपणा! तुमचे सदरे, साड्या, चादरी, टुवाल... अगदी सर्व कपड्यांवर टिनोपालची झळाळी दिसल्याशिवाय रहाणार नाही!

अन् या साऱ्याला असा किती खर्च येतो? प्रत्येक कपड्यामागे एका पैशाहून कमीच! आजच टिनोपाल खरेदी करा. रेग्युलर... इकॉनमी... किंवा बकेट-फॉर-ए-बकेट् अशा तीन आकारात ते मिळते.







® टिनोपाल हा जे. आर. गायगी एस. ए., बाल, स्विस्झर्लंड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे.

सुहृद गायगी लि., पो. ऑ. बॉक्स ११०५०, मुंबई २० डीआर.

Shilpi HPMA 7A/70 Mar

अनुक्रमणिका

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JANUARY 1971

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay 4.

अनुक्रमणिका





